मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीची पुस्तकमाला

पुस्तक ७५ वें.

# रागिणी

अथवा

## काव्यशास्त्रविनोद.

[ उत्तरार्ध. ]

लेखकः

वामन मल्हार जोशी, एम्. ए.

[ द्वितीयावृत्ति. ]

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी,

गिरगांव-मुंबई.

किंमत ०-१२-०. ]



[ सन १९१

# प्रकाशकांचे दोन शब्द.

रागिणी कादंबरीचा मनोरंजनाच्या २० व्या वर्षांत क्रमशः प्रसिद्ध झालेला मजकूर गुदस्त सालीं स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध केला होता. त्याच्या पुढील, ह्मणजे मनोरंजनाच्या २१ व्या वर्षांत प्रसिद्ध झालेला मजकूर आज पुस्तकरूपानें प्रसिद्ध करीत आहों.

पूर्वार्ध आणि उत्तरार्ध असे दोन्ही भाग मिळून या कादंबरीचीं ६०० पृष्ठें झालीं आहेत. महाराष्ट्र वाङ्मयांतील स्वतंत्र (Original) कादंबऱ्यांत रागिणी बरीच मोठी कादंबरी असून तिची योग्यताहि तशीच मोठी आहे.

महाराष्ट्रांतील आबालवृद्धांनां ही कादंबरी अतिशयच आवडली आहे. अशी सुंदर कादंबरी आज स्वतंत्र पुस्तकरूपानें महाराष्ट्राला सादर करितांना आह्माला समाधान वाटतें.

गिरगांव, मुंबई,
ता. १५ मे, १९१६.

प्रकाशक.

# अनुक्रमणिका.

## आश्रमखंड.





# रागिणी

## अथवा

## काव्यशास्त्रविनोद.

## आश्रमखंड.

### प्रकरण पहिलें.

### हे स्वामी कोण?

गुहा तर खरीच, पण तिच्यांत विशेष अंधार नाहीं, किंवा पाकोळ्यांची वगैरे घाण नाहीं, किंवा हवा कोंदट नाहीं, किंवा सिंह, वाघ इत्यादि हिंस्र पशूंचीहि वसती नाहीं, अशा गुहेंत वाचकांनां आम्ही आतां घेऊन जाणार आहों. ही गुहा पश्चिमाभिमुख होती. आंत देवघरांतल्यासारखी स्वच्छता व टापटीप असून सामानसुमानहि तशाच प्रकारचें होतें. एका कोपऱ्यांत पाण्याचा एक स्वच्छ माठ; त्याच्याजवळ दोनतीन लहामोठे कमंडलु; दुसऱ्या कोपऱ्यांत व्याघ्रचर्मात गुंडाळलेली ऊर्णावस्त्रांची शय्या; एकीकडे एक साधें व अगदीं स्वच्छ ठेवलेलें देवदारी कपाट व त्यांत अनेक संस्कृत पोथ्या आणि संस्कृत छापील ग्रंथ. तुह्मीं कपाटांत जर बारकाईनें पाहिलें, तर त्यांत तुह्मांला इंग्रजी, जर्मन व फ्रेंच ग्रंथहि दिसतील. या ग्रंथाचा त्या पवित्र गुहेंत कसा प्रवेश झाला, आणि गुहेंत कपाट तरी कोणत्या उद्देशानें ठेवण्यांत आलें असावें? गुहेकडे पाहिलें ह्मणजे एकदां आद्यकालीन ऋषींची स्मृति होते, व लगेच आधुनिक कालाकडेहि मन ओढलें जातें! गुहा ह्मटली म्हणजे अस्वच्छ असावयाची, तेथील हवा कोंदट असावयाची, व वास्तविक तेथें आधुनिक संस्कृतीपैकीं कांहि चिन्हसुद्धां नसावयाचें; पण या गुहेंत हवा स्वच्छ, उजेड वगैरे जेवढा पाहिजे तेवढा, आणि एका कोपऱ्यांत आधुनिक तऱ्हेचें व सोयीचें कपाट आणि त्यांत इंग्रजी, जर्मन व फ्रेंच पुस्तकें! या गुहेंत इतस्ततः दिसणारीं व्याघ्रचर्में आणि कमंडलु एकाद्या तपस्व्याची आठवण करून देतात; पण व्याघ्रचर्मांतील सुंदर, स्वच्छ व शुभ्र धाबळ्या पाहिल्या, किंवा खडकावर लावलेल्या अनेक देवतांच्या, सिद्धपुरुषांच्या व स्वामींच्या 'फोटों'कडे पाहिलें,

किंवा एका कोपऱ्यांतील कांचेची दौत, टांक वगैरे लेखनसाहित्य आपल्या दृष्टीला पडलें, ह्मणजे मनांत कांहि निराळीच भावना उत्पन्न होते.

खरोखर ह्मटलें तर ती गुहा ह्मणजे विरोधाचें एक आगरच होतें; अथवा ते विरोध विरोधच नव्हते. कारण, तेथें अशी कांहीं जादू भरली होती, कीं, सर्व विरोधांचा तेथें परिहारच व्हावा! रघुवंशीय राजांनीं '**निसर्गभिन्नास्पद**' श्रीचा व सरस्वतीचा विरोध जसा नाहींसा केला किंवा 'नृपत्व' व 'ऋषित्व' हे परस्परविरोधी गुण '**एकसंस्थ**' असूं शकतात, असें जसें त्या राजर्षीनीं आपल्या उदाहरणांनीं सिद्ध करून दाखविलें, तसेंच या गुहेंतील स्वामींनीं येथें उपनिषत्कालीन परंपरेची व संस्कृतीची, आणि आधुनिक भौतिकशास्त्रांची व सुधारणेची उत्तम संगति लावून दिली होती.

पण असे हे स्वामी आहेत तरी कोण? आपणांला परिचित असलेले बोधस्वरूपस्वामी तर हे खास नव्हेत. स्वामींच्या शरीराकडे पहा, ह्मणजे त्यांच्या गुहेप्रमाणें तेथेंहि विरोधी गोष्टींची एकवाक्यताच झालेली तुम्हांला दिसेल. त्यांच्या अंगावर श्रीमन्ती भपकेदार कपडे नव्हते; परंतु जी कफनी होती, ती साधी, पण गरम आणि अगदीं स्वच्छ होती. ते 'स्वामी' होते: पण त्यांच्या केंसाच्या जटा झालेल्या नव्हत्या: तर उलट ते स्वच्छ धुतलेले होते. त्यांच्या अंगाला, तोंडाला, आणि पायांनां भस्म लावलेलें होतें, पण त्यांच्या चेहऱ्यावरील व अंगावरील तेजामुळें ह्मणा, किंवा दुसऱ्या कशामुळें ह्मणा, त्यांचें अंग या भस्मामुळें अधिकच स्वच्छ-होय, अधिक स्वच्छ आणि तेजःपुंज दिसत होतें. स्वामींचें शरीर तालिमबाजाप्रमाणें सदृढ होतें, पण त्यांत एक प्रकारचें कुलीन मार्दव दृग्गोचर होत होतें. त्यांच्या डोळ्यांत ज्ञानतेज होतें; जगांतील सर्व गोष्टी त्यांनां ठाऊक आहेत, सर्व शास्त्रे त्यांनां अवगत आहेत, सर्व दुःखें-पापें-लुच्चेगिऱ्या, ढोंगेंसोंगें ते ओळखून आहेत, दुसऱ्याच्या हृदयांत काय चाललें आहे हें त्यांनां आरशासारखें स्वच्छ दिसत आहे, अशी त्यांच्या मुद्रेकडे आणि डोळ्यांकडे पाहिलें म्हणजे मनाची खात्री व्हावी, व पापी लोकांनां त्यांची भीतिच वाटावी, असें त्यांचें ब्रह्मवर्चस् होतें.

पण या तेजांतहि एक प्रकारची सौम्यता होती; ती तेजःपुंज मुद्रा व ते तेजस्वी डोळे, 'स्वामी ज्ञानमयच नव्हे-तर प्रेममयहि आहेत,' असें सांगत होते. स्वामींमध्यें नीतिनिपुण राजाचें व्यवहारज्ञान किंवा त्याची व्यवसाय-

कठोरता असली, तरी त्यांच्या चेहऱ्यावर बालकाचें निरागसत्व व त्याचें कोमल-हृदयत्व दिसत होतें. त्यांच्यामध्यें ऋषीचें उग्र तप होतें, तथापि मुद्रा तपस्वि-कन्येसारखी कोमल व मोहक होती. ते ज्ञानवृद्धच नव्हे–तर वयोवृद्धहि होते, असें त्यांचे पांढरे शुभ्र केश सांगत होते. पण केश शुभ्र असूनहि त्यांच्या-मध्यें तरुणांचा उत्साह व त्यांची वीर्यचिकीर्षा स्पष्ट दिसत होती.

स्वामींच्या महानुभाव मुखाकडे व ज्ञानतेजोयुत नेत्रांकडे पाहिलें, ह्मणजे पापी मनुष्याला भीति वाटावयाची, असें मागें ह्मटलें खरें; पण हें सर्वथा खरें नाहीं. कारण, पापी मनुष्याला त्यांच्याकडे पाहून प्रथम जरी भीति वाटली, तरी त्याला क्षणानें असें वाटेल, कीं, आपण या महात्म्याजवळ आपलीं पापें कबूल करावींत: हे आपणाला क्षमा करतील; इतकेंच नव्हे, तर प्रेमपूर्ण उप-देश करून सन्मार्गाला लावतील! आपण पापें कबूल केलीं ह्मणजे हे आपणाला तुच्छ लेखतील, व तिरस्कारार्ह समजतील, असें नाहीं: तर ते आपणांला अधिक प्रेमानें वागवतील, व पिता जसा आपल्या दुराग्रही किंवा उन्मार्गवर्ती पुत्राला सत्पथावर आणतो, तशीच ही विभूतिहि आपणाला सन्मार्ग दाखवून निश्रेयस-सुखाचे वांटेकरी करील, अशी पापी मनुष्याचीहि त्यांच्याविषयीं भावना होत असे. [illegible] बालकाला भीति वाटत नाहीं, तशी या स्वामींचीहि कोणाला भीति वाटण्याचें कारण नव्हतें. निर्ढावलेले पापी लोकसुद्धां यांच्याशीं येऊन प्रेमानें गोष्टी बोलत: पण त्यांच्याशीं औद्धत्य किंवा बीभत्स भाषण करण्याची कोणाचीच छाती नव्हती. जंगली व अडाणी मनुष्यहि त्यांच्याशीं प्रेमाचें संभाषण करावयाला भीत नसत, व निर्ढावलेले पापी लोकहि त्यांच्याशीं एकांतांत घटका घटका बोलतांना आढळत. पापी मनुष्य किती का पापासक्त झालेला असेना, स्वामींच्या संगतींत कांहीं दिवस राहिल्यावर त्याची त्यालाच आपल्या पापी प्रवृत्तीची लाज वाटावयाची, आणि त्याचा आत्मा हळुहळू उच्च-तर व पवित्रतर मार्ग प्रेमानें व आनंदानें आक्रमूं लागावयाचा!

स्वामींच्या त्या तेजस्वी व आनंदी मुखचर्येची आठवण केली, ह्मणजे अद्यापि आनंद होतो; मग ज्या लोकांनां त्यांच्या पवित्र संगतीचा आणि संभाषणाचा लाभ प्रत्यक्ष व पुष्कळ वेळां घडला असेल, त्यांनां त्यात्या प्रसंगीं किती आनंद वाटला असेल! केवळ आनंदच नव्हे, तर पावित्र्य, उत्साह, निश्चय, प्रेम, सर्व कांहीं स्वामींच्या संगतींत वृद्धिंगत व्हावयाचें! त्या वेळीं जगांत आनंदी-

आनंद भरलेला आहे, हें तत्त्व तर्कानें सिद्ध करण्याची जरूर नव्हती; सर्व भूतांच्या ठायीं प्रेम कां करावें, असा प्रश्नच तेथें रहात नसे! दुसऱ्याचें मन दुखवावें, अशी स्वामींच्यासमोर कोणाला इच्छाच व्हावयाची नाहीं, व पापबुद्धि मनांत यावयाचीच नाहीं. स्वामींशीं संभाषण करतांना ब्रह्मानंदाचाच आपण स्वाद घेत आहों, असें वाटावयाचें; अथवा खरें म्हटलें तर असेंहि वाटणें अशक्य होतें. कारण, त्या संभाषणांत मनुष्य इतका गूढ होऊन जावयाचा, कीं, आपण आनंदांत आहों का कसें, याचा त्याला विचारहि येणें सर्वथा असंभवनीय होतें.

कादंबऱ्यांत आणि काव्यग्रंथांत जीं काल्पनिक उदात्त वर्णनें आढळतात, तशांतलेंच हें वर्णन नव्हे. हे स्वामी काल्पनिक नव्हे, असें सांगितलें, तर आधुनिक अतिचिकित्सक वाचक हें खरें मानणार नाहींत, व 'कादंबरीकार लिहील तें तें खरें मानण्याइतके आह्मी भोळे नाहीं,' असेंहि ते मनांत ह्मणतील. वाचकांनां प्रत्यक्ष अनुभव नाहीं, तेव्हां त्यांची वृत्ति अशी असणें साहजिकच आहे. पण नानासाहेब व उत्तरा यांच्यासारख्या पाश्चात्यसंस्कृतिपुरस्कर्त्यांनांसुद्धां स्वामींच्या संगतींत वर वर्णिल्याप्रमाणें अनुभव आला, व जनुभाऊदेखील त्यांचे भक्त होण्याच्या मार्गाला लागले, यापेक्षां लेखक तरी त्याबद्दल वाचकांची खात्री कशी करणार?

पण या विजयगांवकर मंडळीची आणि त्या स्वामींची केव्हां, कशी व कोठें गांठ पडली? आणि हे स्वामी कोण?

## प्रकरण दुसरें.

### अपघात.

मागच्या खंडांतील शेवटल्या प्रकरणांत ' कळस ' झाल्यानंतर तें प्रकरण मीं सोडून दिलें. जेथें मुळांतच कोणाच्या मनांत पाप नव्हतें, तेथें जनुभाऊं-सारख्यांनीं किती केलें तरी काय होणार ? एका घटकेच्या आंत सर्व खरा प्रकार मंडळींनां कळून चुकला. रागिणीला जनुभाऊंनीं खोलींत धाडून दिलें, व इकडे तिच्या नांवानें आपणच शंख केला, हें जेव्हां सगळ्यानां कळलें, तेव्हां जनुभाऊंविषयीं त्यांनां काय वाटलें असेल, याचें विशेष विस्तारानें वर्णन करण्याची जरूर आहे, असें नाहीं. उत्तरेकडे पाहिल्याबरोबरच डॉक्टरी शिक-लेल्या आनंदरावांनीं तिला ' फिट' आली होती हें ओळखलें, व ते लगेच तिला उपचार करूं लागले. उत्तरा सावध झाल्यावर तिला काय वाटलें असेल, याचें मी वर्णन करीत नाहीं. तिची हकीकत कोणालाहि—फार काय जनु-भाऊंनांहि—खोटी वाटली नाहीं. तिची पोळलेली पाठ, जळलेला पदर व पलंग-पोस इत्यादि गोष्टी उत्तरेच्या ह्मणण्याची सत्यता सिद्ध करीत होत्या. पण सांगतांसांगतां मी पुनः त्या प्रकरणांतच शिरत आहें. तेव्हां एकदम हात आंखडता घेतलेला बरा !

मनें शुद्ध असल्यावर तीं एक व्हावयाला कांहीं उशीर लागत नाहीं. रागिणी व उत्तरा या दोघां मैत्रिणींचें पुनः पूर्ववत् सख्य जुळलें; रागिणीविषयींचा भाऊसाहेबांचा संशय नष्ट झाला; आनंदरावांचा उत्तरेवरचा रागहि दिवसें-दिवस कमी होत जाऊन त्याऐवजीं त्यांच्या हृदयांत पूर्वीच्या अनुरागाला स्थान मिळालें. अगदीं थोडक्यांत सर्व गोष्टी सांगावयाच्या ह्मणजे पावसाची सर येण्यापूर्वी आभाळ भरून जिकडेतिकडे जरी औदासीन्य पसरलें, गडगडाट झाला, व वादळ सुटलें, आणि पाऊस पडल्यावरहि प्रथम जरी जिकडेतिकडे डबकीं, चिखल वगैरे घाण झाली, तरी पावसाची चांगली मोठी सर येऊन गेली ह्मणजे सगळी सांचलेली घाण जशी धुऊन जाऊन जिकडेतिकडे गारवा येतो, आणि नंतर सूर्योदय होऊन तो जसा पूर्वीपेक्षां अधिक आनंददायक व उत्साहजनक होतो, आणि एकंदरींत सर्व देखावा जसा अधिक नयनमनोहर होतो, तशीच स्थिति आमच्या या मंडळींची झाली. संशयमेघांची त्यांच्यावर जरी उदास कृष्णछाया पडली, मनें जरी कलुषित झालीं, कलहरूपी वादळें

गडगडलीं, आणि अश्रुवर्षावहि जरी झाला, तरी अखेर त्यांचीं मनें शुद्ध, निष्किल्मिष व प्रफुल्लित होऊन त्यांच्या हृदयांत सर्वत्र आनंदीआनंदच नांदूं लागला, व सर्व जग आनंदमयच आहे, असें त्यांनां भासूं लागलें. फार काय, त्या उदार आत्म्यांनीं जनुभाऊंनांहि क्षमा केली, व त्यांचा द्वेष न करतां त्यांच्या कोत्या मनाची ते कींवच करूं लागले. अशा मनुष्याची संगति चांगली नाहीं, अशी सर्वांची खात्री झाली; 'पण त्यांनां एकट्यांनां हिमालयांतून परत कसें पाठवावयाचें,' या अडचणीमुळें त्यांची कींव करून मंडळींनीं त्यांनां निघून जावयाला सांगितलें नाहीं.

तेथून लवकरच बिऱ्हाड उठवावयाचें, असा मात्र आमच्या प्रवासी मंडळीनें बेत ठरवला. विजयगांवांकडे एकदम परत जावें का दुसरीकडे जावें, हें त्यांचें अद्यापि नक्की ठरलें नव्हतें. पांचसहा दिवसांत येथून प्रयाण करावयाचें, एवढा मात्र त्यांचा निश्चय झाला होता.

एक दिवस् सर्व मंडळी चार वाजण्याच्या सुमाराला फिरण्याकरितां बाहेर पडली होती. मागच्या खंडांत वर्णन केलेल्या प्रकारामुळें उत्तरा व रागिणी बहुतेक आईसाहेबांजवळच असावयाच्या. उत्तरेचा व आनंदरावांचा एकमेकांवरचा राग जरी लय पावला होता, तरी त्यांचें आतां फारसें बोलणें होत नसे. फिरावयाला वगैरे जातांना तर आनंदराव मुद्दाम तिच्यापासून दूर जात, व उत्तराहि आपल्या आईची किंवा रागिणीची पाठ सोडीत नसे. तेव्हां आज स्त्रीपुरुषमिश्रित संभाषण विशेष झालें नाहीं, असें ह्मणावयाला हरकत नाहीं.

पुरुषांपुरुषांमध्यें मात्र आज कडाक्याचा वाद झाला. शास्त्रीबुवांनीं अद्वैत वेदान्ताची प्रशंसा करून 'जग ह्मणजे माया आहे,' असें सहज ह्मटलें, यावरून वादाला प्रारंभ झाला.

"जग माया आहे, तर या शेजारच्या मायाजन्य दरींत उडी टाका," नानासाहेब हंसत ह्मणाले.

यावर नेहमींचीं ठराविक उत्तरें शास्त्रीबुवांनीं दिलीं, व वाद वाढतांवाढतांच "वेदान्त तुमच्या कोत्या बुद्धीला कळला नाहीं, म्हणून तो खोटा होत नाहीं!" असें शास्त्रीबुवा ह्मणाले, व यावरून पुनः वादाला फांद्या फुटून वेदप्रामाण्याविषयीं वाद उपस्थित झाला. वेद हे अपौरुषेय–ईश्वरप्रणीत आहेत, हें सिद्ध

करण्याकरितां ‘ ईश्वर ’ शब्दाची शास्त्रीबुवांनां किती ओढाताण करावी लागली, हें त्यांचें त्यांनांच ठाऊक ! वेदांतील हास्यास्पद प्रार्थना घेऊन नानासाहेबांनीं वेदांची टवाळकी केल्यावर मग मात्र शास्त्रीबुवा संतापले. शास्त्रीबुवा बहुधा संतापत नसत; पण आज काय झालें कोणाला ठाऊक, त्यांचें माथें फिरलें, आणि त्यांनीं इंग्रजी तत्त्ववेत्त्यांनां, अज्ञेयवादी हिंदी सुधारकांनां व त्यांच्या सुधारणां'नां खूप शिव्या देऊन घेतल्या. सामाजिक सुधारणेच्या त्यांनीं आपल्या जिभेच्या पट्टयानें अगदीं चिंधड्या उडवून दिल्या ! हें पाहून गंभीरवृत्ति नानासाहेबांचें मनहि क्षुब्ध होऊं लागलें.

वादविवाद करीत चालतांचालतां आपण किती वाट चाललों याचें, व कोठें आलों याचें मंडळीला भान राहिलें नाहीं. त्यांच्या डाव्या हाताला आता उंच डोंगराचा कडा, व उजव्या हाताला खालीं घोर दरी लागली होती. वाट जेमतेम एका माणसापुरतीच होती. शास्त्रीबुवा सर्वांत पुढें, त्यांच्या पाठीमागें नानासाहेब, आनंदराव, भाऊसाहेब, व त्यांच्या पाठीमागें उत्तरा वगैरे बायका, आणि शेवटीं जनुभाऊ चोरट्यासारखे चालले होते. पुष्कळ वेळ चालल्यामुळें बायका दमून गेल्या; पण पुरुषांचें या गोष्टीकडे लक्ष्य गेलें नाहीं. कोण किती चालूं शकेल, याचें वादाच्या भरांत त्यांनां भान राहिलें असेल, तर ते या गोष्टीचा विचार करणार ना ?

वायूच्या झटक्यामुळें उत्तरा बरीच अशक्त झाली होती. ती तर या चालण्यानें फारच दमली. पण आजच्या फिरण्यानें तिचा एक फायदा झाला. नानांचा व शास्त्रीबुवांचा तो शुष्क वाद ऐकून, व या क्षुल्लक प्रश्नांबद्दल आपली मैत्री विसरून ते अगदीं हमरीतुमरीवर आलेले पाहून तिला आपल्या विवादप्रवृत्तींतील दोष चांगलाच दिसून आला. “मीसुद्धां अशीच वादामध्यें संतापतें,” असें ती मनाशीं ह्मणाली, व याउपर वादांत फारसें बोलावयाचें नाहीं, असा तिनें निश्चय केला.

उत्तरेच्या मनःस्थितीची गोष्ट ओघालाच आली आहे, तेव्हां येथें हेंहि सांगावयाला हरकत नाहीं, कीं, तिचा स्वभाव व तिचे विचार यांमध्यें आतां बराच पालट झालेला होता. पूर्वींचें तिचें धाष्टर्य जात चाललें, व त्याबरोबर दुर्दैवेंकरून तिच्या मनाचा मोकळेपणाहि जाऊं लागला. वयाला इतकीं वर्षे झालीं होतीं, तरी उत्तरा इतके दिवस पुरुषांनां विशेष लाजत नव्हती,

व कोणाला विशेष भीतहि नव्हतीं; पण मागच्या खंडांतील प्रकारानंतर तिचें मन तिला खाऊं लागून तिचा आत्मप्रत्यय गेला, व त्याबरोबर तिचा स्वाभिमान नाहींसा झाला. 'स्वाभिमान' ह्मणण्यापेक्षा 'गर्व' ह्मणा पाहिजे तर–पण तिच्यांतील 'तेज' कमी होत गेलें, हें मात्र नाकबूल करतां यावयाचें नाहीं. 'मीं कांहीं पाप केलें नाहीं, मला ब्रम्हदेवाचीहि भीति नाहीं,' अशी उत्तरेची इतके दिवस स्वाभिमानाची निर्भय व बेमुर्वत वृत्ति होती. ती जाऊन 'मी फार संशयी–मत्सरी–भांडखोर–पापी आहें,' असें तिला एकसारखें वाटूं लागून तिची वृत्ति उदास होऊं लागली व तिला सर्वांची भीति वाटूं लागली. विशेषतः आनंदरावांकडे तिनें पाहिलें, ह्मणजे तिला जीव नकोसा व्हावयाचा !

रागिणीकडे पाहूनहि उत्तरेला पहिल्यानें एकदोन दिवस असेंच झालें होतें; पण रागिणीशीं तिचें पुष्कळ बोलणेंचालणें झाल्यावर तिच्या मनांत आपल्याविषयीं द्वेष नाहीं, व तिरस्कारहि नाहीं, अवी उत्तरेची खात्री झाली, आणि त्या दोघीजणी बहुतेक पूर्ववत् मन मोकळें करून एकमेकींशीं बोलूंचालूं लागल्या, आणि प्रेमानें पूर्वीसारखीच एकमेकींची थट्टामस्करीहि करूं लागल्या; परंतु आनंदरावांचें आणि उत्तरेचें संभाषण अलीकडे विशेष होतच नसे, तेव्हां तिला त्यांचें मन अद्यापि चांगलें कळलें नव्हतें. माझ्याविषयीं त्यांनां काय बरें वाटत असेल ? असा विचार उत्तरेच्या मनांत वारंवार यावयाचा. आनंदरावांची कोणाला विशेष भीति वाटावयाची नाहीं; पण उत्तरा त्यांनां आतां भिऊं लागली. आनंदरावांच्या एकदां पायां पडून त्यांची क्षमा मागावी, असें तिला वाटे; पण त्यांच्याशीं चारचौघांत बोलण्याची लाज–तेथें एकान्तांत जाऊन पाय घट्ट धरण्याचें कसलें होतें ? पुनः तिला वाटे, कीं पत्र लिहून आनंदरावांची क्षमा मागावी; पण एकदां होरपळलेलें तिचें मन या गोष्टीलाहि कचरूं लागलें. 'न जाणों, याचा कोणीं भलताच अर्थ केला तर ?' अशी तिला उगाच भीति वाटूं लागली ! आईसाहेबांनीं आनंदरावांनां "उत्तरेचा स्वभाव रागीट आहे, ती भडभडी आहे, ती रागांत कांहीं तरी बोलून जाते," इत्यादि इत्यादि गोष्टी सांगून तिचें अर्धे अधिक काम केलें होतेंच; पण स्वतः एकदां क्षमा मागितल्याशिवाय उत्तरेच्या मनाला समाधान होण्यासारखें नव्हतें.

वास्तविक या गोष्टीची जरूरसुद्धां नव्हती. आनंदरावांचा राग त्या स्मरणीय–अथवा विस्मरणीय–रात्रींच लयाला गेला होता. आकाशांतून तारा पडावा,

व नंतर क्षणानें लुप्त व्हावा, अशा प्रकारची त्यांच्या रागाची वास्तविक स्थिति होती; पण उत्तरेला त्या वेळीं हें कोठलें समजावयाला? तिला वाटे, कीं, आनंदराव आपल्याला काय ह्मणत असतील कोणाला ठाऊक? त्यांच्या मनांत आपल्याविषयीं राग नाहीं, हें तिनें देखील चर्येवरून ओळखलें होतें; इतकेंच नव्हे, तर उलट आपल्याविषयीं प्रेम आहे, हेंहि ती जाणून होती. पण, पण— तिला काय वाटत होतें, हें मला कांहीं वर्णन करून नेमकें सांगतां येत नाहीं. "मी तुझ्यावर रागावलों नाहीं, तर उलट तुझ्यावर माझें प्रेम आहे," असे शब्द आनंदरावांच्या तोंडून ऐकण्याची तिची फार इच्छा होती, व हे शब्द ऐकण्याचें आपल्या नशिबीं आहे किंवा नाहीं, याविषयीं तिचें मन फार साशंक होतें, एवढी गोष्ट खरी. आनंदरावांची उत्तरेला आतां फार भीति वाटूं लागली होती, त्यांच्या नीतितेजापुढें तिचें बुद्धितेज कांपूं लागलें होतें, व त्यांच्या विनयापुढें तिचें धृष्टत्व लाजूं लागलें होतें, या गोष्टीहि ध्यानांत ठेवण्यासारख्या आहेत.

शास्त्रीबुवांच्या व नानासाहेबांच्या खडाजंगी तात्त्विक वाक्कलहाला कंटाळून आपण त्यांनां सोडून दिलें. ते किती जरी भांडले, तरी भांडलेल्या मुलांप्रमाणें घटकाभरानें ते पुनः एक होतील, अशी आपली खात्री आहे; पण आज त्यांचा वाद फारच माजलेला दिसत आहे. तेव्हां विषय तरी काय निघाला आहे, हें पाहूं या.

" सत्य ह्मणजे काय?" शास्त्रीबुवा ओरडत आहेत.

" आमच्या बुद्धीला जें खरें वाटतें, तें सत्य!" हा नानासाहेबांचा आवाज आहे.

" अहो, पण 'खरें' ह्मणजे तरी काय?" शास्त्रीबुवा शत्रूला शब्दांत पकडलें असें वाटून विचारतात. " 'खरें ह्मणजे सत्य, आणि सत्य ह्मणजे खरें,' हें मराठी दुसऱ्या इयत्तेंत शब्दाला प्रतिशब्द ह्मणून ठीक आहे; पण 'सत्या'ची व्याख्या कराल कीं नाहीं?"

" सत्याची व्याख्या कशी करतां येईल, शास्त्रीबुवा?" आनंदराव मध्यें पडून वादाला निराळी दिशा देण्याकरितां म्हणाले. " प्रत्येक शब्दाची आधीं व्याख्या केल्याशिवाय बोलावयाचेंच नाहीं, असें आपण ह्मटलें, तर 'व्याख्ये'ची सुद्धां आधीं 'व्याख्या' करावी लागेल, आणि असें करूं लागलों, तर अनवस्था-प्रसंग येईल!"

" खरें आहे; पण तुह्मी 'जग हें सत्य आहे,' असें ह्मणतां, तर आह्मांला 'सत्य' ह्मणजे काय, हें कळायला नको का?" शास्त्रीबुवांनीं शांतपणें विचारलें.

" तुह्मी जग खोटें ह्मणतां, तेव्हां तुह्मीच 'खोठ्या'ची व्याख्या करा." नानासाहेब ह्मणाले.

" आह्माला व्याख्या करण्याची जरूर नाहीं. कारण सगळेंच खोटें आहे, 'कांहींच नाहीं!' तेव्हां व्याख्या तरी कसली करायची?" शास्त्रीबुवा म्हणाले.

" सगळें जग खोटें असेल, पण 'मी आहें,' एवढें तर मला खरें म्हणायला नको का? मी खरा आहें का नाहीं?" आनंदराव मध्यें कलहविषय बदलण्याच्या उद्देशानें म्हणाले.

"तुमच्या या 'खरां'तला काना कां काढून टाका ना!" शास्त्रीबुवा 'खर' शब्दावर ग्राम्य श्लेष करून ह्मणाले, व आनंदरावांवर त्यांनीं क्षणभर बाजू उलटविली. आनंदराव या उत्तरानें किंचित् ओशाळले; पण लगेच त्यांनां आनंदाचें हंसूं आलें. हें स्मित शास्त्रीबुवांच्या कोटीमुळें आलें असें नव्हे; तर भांडणापर्यंत आलेल्या वादाचा विषय बदलण्यांत स्वतःला यश आलेलें पाहून त्यांनां समाधान वाटून त्यांनीं तें स्मित केलें होतें. ते आपल्याच आनंदांत आतां गर्क झाले, व चालण्याकडे त्यांचें दुर्लक्ष्य होऊन त्यांचा पाय चालतां-चालतां एकदम घसरला. हाय, हाय! आनंदराव एकदम खालीं दरींत घसरले! उत्तरेनें एकदम "नाना! नाना!" ह्मणून किंकाळी फोडली, व पुढें जाणाऱ्या नानांनां थांबविलें. रागिणी तर घाबरून जाऊन कमर खचून तेथेंच बसली, व आईसाहेब "कोणी तरी खालती जा, अहो जा–जा–" असें कांहीं तरी बडबडूं लागल्या!

खालीं जावयाचें कसें? आणि खालीं जाऊन करावयाचें तरी काय? इतक्या उंचीवरून खालीं पडल्यावर आनंदरावांचा एक कण तरी जागेवर राहिला असेल काय? हाय, हाय! आनंदराव आतां क्षणापूर्वी बोलत होते ना? क्षणापूर्वीच त्यांनीं शस्त्रीबुवांनां व्याख्येची व्याख्या करावयाला सांगितलें ना? आणि आतांच शास्त्रीबुवांनीं त्यांनां विनोदानें 'खर' ही पदवी दिली ना?

उत्तरेची बिचारीची आतां कंबरच खचली! रागिणीच्या मांडीवर तिनें डोकें ठेवलें, व ती रडूं लागली. आईसाहेब तिच्याजवळ आल्या, व तिला पुनः घेरी येत आहे असें वाटून "पाणी आणा, पाणी आणा," असें ओरडूं लागल्या.

पण पाणी कोठून आणावयाचें आणि कशांतून आणावयाचें? आणि आधीं पाणी आणावयाचें. का आनंदराव कोठें आहेत हें पहावयाचें?

# प्रकरण तिसरें.

## रुग्णशुश्रूषा.

" हा काय चमत्कार ! तो पहा दादा !" रागिणी ह्मणाली.

उत्तरा मागें वळून पहाते, तों खरोखरच आनंदराव जरासे लंगडतलंगडत त्यांच्याकडे येत होते ! त्यांनां पाहून जणूं काय आपला गेलेला जीवच परत आला, असें उत्तरेला झालें !

" हें रे काय दादा ? इकडून कुठून आलास ?" रागिणीनें विचारलें.

" कुठून नि काय, तें मागून सांगतों; पण आधीं पाणी पहा कुठें असलें तर. जखम धुऊन टाकतों अगोदर. मला तहानहि लागली आहे फार !"

उत्तरा पाण्याकरतां इकडेतिकडे पाहूं लागली. तिनें त्या वेळीं आपलें रक्त देऊनहि पाणी विकत घेतलें असतें ! लांब गेल्यावर पुष्कळ पाणी होतें, पण जवळ मात्र कोठें पाणी दिसेना ! शेवटीं " मी जातें तिकडे नि घेऊन येतें," असें ती ह्मणाली, व आनंदराव "नको, नको, एवढी कांहीं जरूर नाहीं," असें कोरड्या घशानें ह्मणत होते, तिकडे मुळींच लक्ष्य न देतां ती पाणी आणण्याकरतां निघूनहि गेली !

" माझा पाय एकाएकीं घसरला, व मी गडगडत खालीं गेलों; मृत्यु जवळ आलाच, अशी मला भीति वाटूं लागली; आईचा आणि ईश्वराचा धांवा केला; इतक्यांत ईश्वरानेंच माझी हांक ऐकली ह्मणून कीं काय कोण जाणे, मी एका करवंदीच्या जाळींत अडकलों, आणि खालीं गडगडायचा थांबलों. वाटेंत डोकें कितीदां आपटलें होतें, व पायांला किती खरचटलें होतें, याचें त्या वेळीं मला भानच नव्हतें. जीव वांचला, ह्मणून मी अतिशय आनंदानें उठलों, व वर जाण्याचा रस्ता पाहूं लागलों, आणि कसा तरी रस्ता काढीत इथपर्यंत तर आलों. इतका वेळ पाय विशेष दुखला नाहीं; पण आतां मात्र फारच कळ लागली आहे."

" मग बस तरी खालीं. " रागिणी ह्मणाली.

"बसतों; पण तुझ्या ताई कशाला तिकडे गेल्या ? अडचणींतलें पाणी आणायला जातील, आणि माझ्यासारख्या पडतील झालें !"

" तुझ्यासारखी उत्तरा कांहीं भ्रमिष्ट नाहीं !" रागिणी हंसत ह्मणाली.

" माझ्यापेक्षां अधिक आहे !" आनंदराव ह्मणाले. " बरें, नानासाहेब नि शास्त्रीबुवा कुठें आहेत ? आणि आईसाहेब कुठें गेल्या ?"

"नानासाहेब, भाऊ नि शास्त्रीबुवा खालीं गेले आहेत तुला पहायला! आणि ताईला घेरी आली ह्मणून आईसाहेबच गडबडींत पाणी आणायला गेल्या आहेत!"

"वः! चांगला आहे रोजगार!" आनंदराव अर्धवट आनंदानें व अर्धवट काळजीनें ह्मणाले. "त्यांनां घेरी आली होती, मग त्या कशाला गेल्या? तूं नाहीं का जाऊं रागिणी?"

"सगळी माझीच चूक ह्मणायची! मीं नको नको किती ह्मटलं, तरी थांबली का ती! पण मी तरी आपली वेडीच आहें! ताईची कधीं तरी चूक होते का?"

"रागिणी, तूं माझी अशी थट्टा करूं नकोस; माझीच काय, पण 'कोणाचीच' करूं नकोस. मला मुळींच लग्न करायचें नाहीं, हें तुला ठाऊक आहेना? मग मस्करी करून माझ्या मनांत तूं हे भलतेच विचार कां आणतेस? रागिणी, मला मनोविकारांचा दास व्हायचें नाहीं; देशहितार्थ देह झिजवून जन्माचें सार्थक करावें, अशी माझी इच्छा आहे. तेव्हां तूं माझी अशी थट्टा करीत जाऊं नकोस, आणि लग्नाचे विचार माझ्या मनांत येतील असेंहि कांहीं करीत जाऊं नकोस, समजलीस?"

"बरं, राहिली माझी मस्करी. ठरलं, पुनः ही गोष्ट ह्मणून काढायची नाही मी! पण तिची स्थिति काय झाली आहे हें तुला समजलं, तर तूं इतका अगदीं खास निष्ठुर होणार नाहींस. बाकी, तुझी इच्छा नसली, तर माझा कांहीं एवढा आग्रह नाहीं हो! मला आपलं वाटतं, कीं, ताईचं नि तुझं-"

"पुरे, माझें मन व्यर्थ चाळवूं नकोस रागिणी! माझा त्या बाबतींत अगदीं निश्चय झाला आहे. देशांत सभोंवतालीं चाललें आहे काय, आणि लग्नें कसलीं ग करतां?"

इतक्यांत आपली भिजवलेली शाल व हातरुमाल डाव्या हातांत धरून आणि दुसऱ्या हातांत कुड्याच्या पानांच्या मोठ्या द्रोणांत पाणी घेऊन उत्तरा तेथें आली. आनंदरावांनीं तें द्रोणांतलें पाणी हातांत घेतलें, व "तुह्मी कशाला गेलांत? मला एवढी कांहीं जरूर नव्हती," असें शुद्ध अंतःकरणानें पण शुष्क कंठानें ह्मटलें. नंतर त्यांनीं तें पाणी पिऊन टाकलें.

उत्तरेनें हातरुमाल व शाल कां भिजवून आणली, हें आनंदरावांनीं ओळखलें; पण आपली जखम धुऊन स्वच्छ करण्याला उत्तरेला सांगण्याची त्यांनां

लाज वाटूं लागली. उत्तरेनें त्याच उद्देशानें जरी एवढा खटाटोप केला होता, तरी तिचेंहि या कार्याकरितां पाऊल पुढें सरेना !

ही स्थिति रागिणीच्या लक्ष्यांत अर्धाएक मिनिट आली नाहीं; पण नंतर तिनें चतुरतेनें ती ओळखून म्हटलें " ताई, तूं तो उजवा पाय धू; मजजवळ तो हातरुमाल दे, मी डावा पाय धुतें. "

असें ह्मणावयाचीच जणूं काय उत्तरा वाट पहात होती ! तिनें लगेच पायावरचें रक्त वगैरे सर्व धुऊन स्वच्छ केलें, व दोनतीन ठिकाणीं जेथें जखमा झाल्या होत्या, तेथें रागिणीच्या व आपल्या हातरुमालाच्या पट्टया करून तिनें त्या बांधून टाकल्या, आणि त्याच्यावर आनंदरावांच्या खिशांतील रुमालाचा एक वेढा देऊन जखमांवर व्यवस्थेशीर बँडेज केलें. मेडिकल कॉलेजमधील शिक्षण तिला या कामीं अधिक उपयोगीं पडलें, कीं, तिचें प्रेम अधिक उपयोगी पडलें, या प्रश्नाचें यथार्थ उत्तर देण्याचें साधन प्रस्तुत लेखकाजवळ नाहीं !

## प्रकरण चवथें.

## साप्तपदीन सख्य.

मागच्या प्रकरणांत सांगितलेल्या गोष्टीला पांचसहा दिवस झाले. आनंदरावांच्या पायांला बरीच दुखापत झाली असल्यामुळें मंडळीला तेथेंच रहाणें भाग पडलें, व आणखी पांचसहा दिवस तरी तेथून हलणें त्यांनां शक्य नव्हतें. मध्यंतरीं पुढील हकीकतीशिवाय नमूद करण्यासारखें कांहीं घडलें नाहीं.

संध्याकाळचीच वेळ. अस्ताला जाण्याची वेळ आली ह्मणून कीं काय कोण जाणे, सूर्य मंदमंद चालत होता, व थोडासा शांत आणि उदास झाला होता. त्या धर्मशाळेभोंवतालच्या लतावृक्षांनीं मात्र अधिक रम्य, मोहक व उज्ज्वल स्वरूप धारण केलें होतें. लहान मुलांचे व मुलींचे केश जसे हलतात, तसे लतावृक्षांवरचे कोमल पल्लव हलत होते. बालकांच्या कोमल रक्तहस्तांप्रमाणें लतांचीं कोंवळीं लाल पानें सूर्यकिरणांनीं अधिकच लाल झालीं होतीं. वृक्षांच्या कांहीं कोमल शाखा डुलत होत्या, कांहीं नाचत होत्या, व कांहीं जणूं काय माना डोलवून पांखरांनां खेळावयाला बोलावीत होत्या. पांखरेंहि त्या वेळीं खेळण्याच्या रंगांत आलीं होतीं. लता झोंपाळ्याप्रमाणें डुलत आहेत, असें पाहून कांहीं पांखरें त्यांवर जाऊन बसलीं होतीं, व त्यांच्या त्या अल्पभारानेंहि त्या कोमल लता वांकून जाऊन अधिक हलूं लागल्या म्हणजे तीं पांखरें आनंदानें चिंवचिंव करून ती मजा पहावयाला आपल्या सहचरांनां अथवा सहचरींनां सांगत होतीं. कांहीं पोक्त किंवा वृद्ध पक्ष्यांनां हा लतांवरचा धाडसाचा खेळ स्वतः खेळणें जरी आवडत नव्हतें, तरी ते आपल्या मुलांबाळांच्या लीलांचें झाडांवर बसून कौतुक करीत होते. एकदोघां मननशील पक्ष्यांनां जणूं काय हा पोरखेळ अगदींच ग्राम्य वाटून ते आपले एका फांदीवर बसून गहन विचार करीत होते. कांहीं पांखरांच्या दुसऱ्याच लीला चालल्या होत्या. एक तरुण साळुंकी आपल्या प्रियकराला पाठोपाठ यावयाला सांगून दूरच्या एका फांदीवर जाऊन बसली. ती तेथें बसते न बसते, तोंच तिचा प्रियकरहि तिच्याजवळ आला; पण ती लगेच तेथून उठली, व दुसऱ्याच फांदीवर जाऊन बसली. तेथेंहि तो आल्यावर ती तेथून उठली, व प्रियकर पाठोपाठ आल्याबरोबर तिसरीकडेच जाऊन बसली! अशा रीतीनें त्या सटवीनें त्या मोहान्ध प्रियकराला इकडून तिकडे उगीच नाचविलें! एकदोन कावळे कडुलिंबाच्या झाडावर बसून त्यावरील पक्क

फळेंच अमृतरसमय समजून त्यांचा मोठ्या चवीनें आस्वाद घेत होते. कांहीं घारी एका अत्युच्च वृक्षावर बसून आनंदानें ओरडत होत्या,–त्यांचा आनंदाचा स्वर आपणांला कर्कश लागतो, ही गोष्ट अर्थात् वेगळी आहे! असो. सांगण्याचा भावार्थ हा, कीं, त्या झाडींत जिकडेतिकडे आनंदीआनंद भरलेला दिसत होता.

अशा या झाडींत आमची प्रवासी मंडळी गप्पागोष्टी सांगत बसली असतां त्यांनां वास्तविक उल्हास वाटावा; पण मनुष्याचें मन असें कांहीं चमत्कारिक आहे, कीं, तें हर्षस्थानीं विषाद मानतें, व दुःखस्थानीं सुख पावतें! बाह्य जग आनंदित असतां अंतर्मुख मनुष्य दुःखीकष्टी असतो, व बाहेर वादळ, आग, किंवा हाहाःकार चालला असला तरी आत्मसंतुष्ट मनुष्य आनंदांत राहूं शकतो!

धर्मशाळेजवळचाच वरील देखावा होता, हें वर म्हटलेंच आहे. फार लांब चालण्याची आनंदरावांच्या पायांत अद्यापि शक्ति आली नव्हती. मंडळीपैकी कोणी थकलें नव्हतें, कांहीं नव्हतें, अशा वेळीं भाऊसाहेब एकदम म्हणाले "नानासाहेब, ही सृष्टि पाहून मला उत्क्रान्तितत्त्वच खरें दिसतें. जिकडेतिकडे जीवनकलह चाललेला आहे. जीवनकलह हाच सृष्टीचा नियम! न्याय, नीति, धर्म, दया, माया हीं सर्व या नियमापुढें रद्द होत! या झाडाझाडांमध्यें कलह चालला आहे, लतालतांमध्यें आहे, या गवतागवतांत कलह आहे, पांखरापांखरांत आहे, कृमिकीटकांत आहे, आणि मनुष्यांतहि तोच कलह चालू आहे. हीं गवतें व या लता आणि हीं झाडें आपणाला जागा अधिक मिळावी, आपणाला जमिनींतील पाणी व सूर्याचीं किरणें अधिक मिळावींत, अशा खटपटींत सदोदित असून दुसऱ्याला त्याच्या जागेवरून घालवून देण्याचा प्रयत्न करीत आहेत. किडे आपल्या जीविताकरतां लतांचीं पानें निर्दयपणें खात आहेत, व झाडांच्या फळांमध्येंहि शिरत आहेत. आपला प्राण वांचवण्याकरितां साळुंक्या त्या किड्यांनां खाऊन टाकतात, आणि साळुंक्यांचें घांसभर लुसलुशीत मांस मिळावें म्हणून पारधीलोक त्यांनांच मारतात! असा हा सृष्टिक्रम आहे! ज्याच्या अंगांत जोर अधिक, तो जगेल. कमजोर लतांचें, किड्यांचें, पशूंचें, माणसांचें व राष्ट्रांचें या जगांत कांहीं काम नाहीं. 'दुसऱ्याला मारावें, व खाऊन टाकावें, पण आपण जगावें,' असें सृष्टि सांगत आहे. पण वेडा मनुष्यच धर्म, दया आणि प्रेम यांचीं बंधनें उराशीं कवटाळून बसला आहे! '**अहिंसा परमो धर्मः**' हा सृष्टीचा नियम असता, तर सृष्टीवर आजच्यासारखीं हीं अरण्यें दृष्टीला न पडतां, तेथें शुष्क खडकच दिसला असता!"

नानासाहेब ह्मणाले " सृष्टीची उत्क्रान्ति जीवनकलहाच्या तत्त्वावरच चालली आहे, असें नाहीं. प्रेम हेंहि एक सृष्टीचेंच तत्त्व आहे. पोराच्या प्रेमानें वाघीणसुद्धां सिंहाशीं लढते, व आपला प्राण देऊन आपल्या छाव्याचा प्राण वांचविते! गायीसारखा गरीब प्राणी कुणी नसेल; पण वाघ आला असतां ती वाघाच्या व वांसराच्या मध्यें पडते, आणि प्राण आहे तोंपर्यंत आपल्या वांसराचा प्राण वांचविते!"

शास्त्रीबुवा ह्मणाले "कलह व स्वार्थ हा सृष्टीचा नियम आहे, कीं, प्रेम व स्वार्थत्याग आहे, हें तर्कानें कांहीं समजणार नाहीं. तर्क तुह्मांला दोन्ही तऱ्हेचीं उदाहरणें दाखवील. सृष्टीचें अंतःस्थ तत्त्व जाणावयाचें असल्यास त्याला योगाचा मार्ग स्वीकारावा. सृष्टीचें अंतरंग बहिर्मुख तर्कानें नव्हे–तर योगनिर्दिष्ट अंतर्दृष्टीनेंच जाणतां येईल."

" खरें असेल हें; पण असे योगी आतां कोठले आणायचे? तुह्मांआह्मांला तर्काच्याच मार्गानें गेलें पाहिजे." नानासाहेब ह्मणाले.

"अद्यापि योगी नाहींत असें नाहीं—"

"पण आहेत, असेंहि नाहीं!"

"'होते, एवढें तरी कबूल आहे ना? त्यांचीं पुस्तकें आहेत, त्यांचें योगशास्त्र आहे—"

नानासाहेब मध्येंच ह्मणाले " योगशास्त्राचे ग्रंथ असले, ह्मणजे योगशास्त्र खरें होत नाहीं, व जगत्तत्त्व जाणणारे ब्रह्मवेत्ते योगी होऊन गेले, हें तर मुळींच सिद्ध होत नाहीं. तुमच्या काव्यांतील आश्रमांचीं आणि ऋषींचीं वर्णनें काव्यांत चांगलीं आहेत; पण तीं कितपत ऐतिहासिक आहेत, यची शंकाच आहे."

भाऊसाहेब ह्मणाले " ऋषि होते का नाहीं, हा निराळाच प्रश्न आहे. 'जग हें कसें आहे,' हा आपला आतांचा मुख्य प्रश्न आहे. तें आनंदमय व प्रेममय आहे, कीं, दुःखमय व कलहमय आहे, याबद्दल तुमचें योगशास्त्र काय उत्तर देईल?"

शास्त्रीबुवा ह्मणाले " अर्थात्, जग हें आनंदमय व प्रेममय आहे, असेंच उत्तर देईल. जो पूर्ण योगी झाला, त्याला जगांत सगळीकडे आनंदच आहे! या जगांत आनंदाशिवाय त्याला दुसरें दिसायचेंच नाहीं. तुह्मांलाआह्मांला जें शोचनीय वाटतें, तें आपल्या कोत्या दृष्टीमुळेंच!"

"कण्व आश्रमाचे कुलपति होते. ते योगी होते कीं नाहीं?" आनंदरावांनीं विचारलें.

"होते, अलबत् होते. कण्व जर योगी नसतील, तर मग योगी तरी कोण?"

आनंदराव ह्मणाले "पण शकुन्तला दुष्यन्ताच्या घरीं जाऊं लागली, तेव्हां त्यांनांहि दुःख झालें. त्यांचें मन '**स्तंभितबाष्पवृत्तिकलुष**' झालें; त्यांचें दर्शन '**चिन्ताजड**' झालें, व '**वैक्लव्यं मम चेदृशं यदि भवेत्स्नेहादरण्यौकसः। पीड्यन्ते गृहिणः कथं नु तनयाविश्लेषदुःखैर्नवैः**' असे त्यांच्या तोंडांतून उद्गार बाहेर पडले! यावरून कण्वऋषींनां तरी या जगांत जें आहे तें उत्तम आहे, असें वाटत नव्हतें, हें उघड आहे. त्यांनां जर ईश्वरानें नवीन जग उत्पन्न करण्याची शक्ति दिली असती, व नवीन जग उत्पन्न करायला सांगितलें असतें, तर कण्वऋषींनीं आपल्या जगांत कन्याविरहाचा दुर्धर प्रसंग कोणावरहि येणार नाहीं, अशी व्यवस्था खास केली असती!"

"छट्, असें नाहीं! समाधींत असतांना व जगाची आणि त्यांची एकतानता झाली असतां त्यांनां कन्याविरह हाहि आवश्यक वाटला असेल; किंवा, शिष्यांनां आश्रमहोमापुढें उपनिषदांचें विवरण करीत असतांना त्यांनीं 'जग आहे तसेंच असावें,' असेंच शिकवलें असावें. कन्याविरहानें त्यांनां क्षणिक दुःख झालें; पण हा विरह किती दुःखद असला, तरी जगांत आवश्यक आहे, व इष्टहि आहे, असें त्यांनीं आपल्या शिष्यांनां सांगितलें असावें, असा माझा तर्क आहे."

आनंदराव ह्मणाले "त्यांतली खरी गोष्ट अशी आहे, कीं, 'जग कसें आहे,' याचें उत्तर ज्याच्या त्याच्या ज्ञानावर, वृत्तीवर व नैतिक उन्नतीवर अवलंबून आहे. कोणी जगाकडे भगवद्गीतेंत ह्मटल्याप्रमाणें '**आश्चर्यवत्**' दृष्टीनें पहातात. कोणी नुसत्या आश्चर्यदृष्टीनें पहात नाहींत, तर विश्वरूपदर्शनानें ते अर्जुनाप्रमाणें घाबरून जातात! जे कोणी '**स्थितप्रज्ञ**' असतील, त्यांनां विश्वस्वरूपाचें आश्चर्य वाटत नाहीं, कशाची भीति वाटत नाहीं, कोणाचा राग येत नाहीं; स्थितप्रज्ञाला राग नाहीं, लोभ नाहीं!"

शास्त्रीबुवा हंसून ह्मणाले "तुह्मी कधीं बोलत नाहीं आनंदराव! पण आज तर एकाद्या व्याख्यान देणाऱ्या वक्त्याप्रमाणें तुह्मी अगदीं जोरांत आलां आहांत!"

"मला पुरतें बोलूं तर द्याल पण—"

"बोला; पण थोडक्यांत बोला. माझी संध्येची वेळ होत चालली आहे."

"अगदीं थोडक्यांत बोलतों–चार शब्दांतच."

शास्त्रीबुवा हंसून ह्मणाले "व्याख्यात्यांचे 'चार शब्द' संपायला अर्धा तास तरी निदान लागतो, असा माझा अनुभव आहे !"

इतक्यांत उत्तरेचें लक्ष्य कशानेंसें वेधलें गेलें, व तिनें विचारलें "शास्त्रीबुवा, तें काय दिसतं आहे हो? ती गुहा का आहे?"

"कोठली? ती होय? गुहाच दिसते!"

"चला तर मग–जाऊन पाहूं या ती." आनंदराव उत्साहानें ह्मणाले.

आईसाहेब किंचित् घाबरून ह्मणाल्या "नको उगाच ! आंत जनावरं वगैरे असायचीं आणि—"

"मी आपला एकटा जातों. मी पाहून येतों. मग तुह्मी या." आनंदराव ह्मणाले.

नानासाहेब ह्मणाले "चल, मी पण येतों तुझ्याबरोबर."

त्यांनीं असें ह्मटल्यावर आनंदराव उठले, व ते दोघे चालूं लागले.

"मग आह्मींतरी मागं राहून काय करायचं? तुह्मांला पुरुषांनां भयच कसलं तें नाहीं!" आईसाहेब ह्मणाल्या.

शास्त्रीबुवा ह्मणाले "भ्यायचें काय ह्मणून कोणाला? खरें ह्मटलें तर प्रत्यक्ष ईश्वराला किंवा राक्षसालासुद्धां भिऊं नये. गुहेंत जायला भीति कसली?"

आनंदराव हंसून ह्मणाले " तेथें भूतबीत, जखीणबिखीण असली ह्मणजे? "

शास्त्रीबुवा म्हणाले " असली तर ती माझें काय करणार? मीच स्वतः समंध आहें! आणि जखिणीसंबंधानें ह्मणाल, तर—"

आईसाहेब ह्मणाल्या " भलत्या गोष्टी बोलूं तरी नयेत! तुह्मांला एक भीति नाहीं वाटत, पण लहान मुली—"

" फार लहान आहेत तुझ्या 'मुली!' " नानासाहेब हंसून ह्मणाले.

" हो, त्या किती मोठ्या झाल्या तरी मला लहानच आहेत हो! "

अशा रीतीनें मंडळी बोलत चालली असतां त्यांनां जो पवित्र रम्य देखावा लागला, तो पाहिल्यावर मनोहर देखावे पाहूनपाहून थकलेल्या त्या मंडळीलाहि नवाच हुरूप वाटला! त्यांचीं मनें विलक्षण रीतीनें प्रसन्न झालीं. उत्तरेचीहि कामिनीवृत्ति निवाली. आनंदरावांच्या उच्च आकांक्षेच्या आड आपण येऊं नये, असें तिला वाटूं लागलें. संशयवृत्ति, अज्ञेयवादी भाऊसाहेबांची सृष्टीशीं एकतानता होऊन त्यांच्या शंकाकुशंका नाहींशा झाल्या. रागिणी आपलें वैधव्यदुःख विसरली.

जनुभाऊंचें हृदयहि पश्चात्ताप पावूं लागलें. त्या देखाव्यांत काय जादू होती, कोणाला ठाऊक ? पण तेथें अशी मनःस्थिति होत होती, एवढी गोष्ट मात्र खरी. तेथील प्रत्येक गोष्ट मंडळीला सुंदर भासूं लागली. वायु शीतल व सौम्य वाहत होता. एक प्रकारचा सुगंध मंडळीला आनंदवीत होता. खालील दरींतील नदीचा उच्छृंखलपणा येथें नियमित होऊन एकाद्या विनीत स्त्रीप्रमाणें लज्जान्वित होऊन ती लपतलपत चालली होती. निर्झरांनींहि आपली स्वैर वृत्ति येथें सोडून दिली होती, व ते गुरुसान्निध्यामुळेंच कीं काय, सच्छिष्यांप्रमाणें लज्जामधुर स्मित करीत अर्धवट खालीं मान घालून नम्रपणें चालले होते. हरतऱ्हेच्या विजातीय पांखरांनीं आपलें परस्पर वैर सोडून दिलें होतें, व सजातीय पांखरांनीं परस्परांमधील कामविषयक स्पर्धेचाहि त्याग केला होता. ते सर्वजण गुण्या-गोविंदानें झाडांवरील सुस्वाद्य फळें खात होते. हरिणें, गायी, म्हशी वगैरे चरत किंवा रवंथ करीत होतीं. घोड्यांचीं शिंगरें बागडत होतीं. अहिनकुलतुल्य शाश्वतिक विरोध असलेल्या पशूंचाहि विरोध येथें नष्ट झाला आहे, असें दिसत होतें. या देखाव्याकडे पाहिलें, म्हणजे पूर्ण हताश झालेल्या मनुष्याचें नैराश्य निघून जावयाचें; दुःखसागरांत बहुतेक बुडालेला मनुष्य आपलें दुःख विसरून जावयाचा, व पापी मनुष्याचें देखील मन या स्थलीं व कालीं आपला पापभाव सोडून द्यावयाचें !

या देखाव्यामध्यें हा गुण किंवा ही मोहिनी कोठून आली ? हें एकाद्या देवाचें, यक्षाचें किंवा ऋषीचें स्थान तर नसेल ना ? हिमालयांत अधिकारी ब्रह्मवेत्ते योगी व महात्मे आहेत असें म्हणतात, तें तर खरें नसेल ना ? आपण मंडळी-बरोबर जाऊं या, म्हणजे खरें काय आहे, तें आपणाला कळेलच !

पहा, त्या आनंदरावांकडे पहा ! समोरच्या शिखरावरील गुहा पाहण्याकरितां जात असतां वाटेंत त्यांनां एक गुहा लागली असून ते आणि शास्त्रीबुवा आंत शिरत आहेत. ते पहा, शिरलेच ते आंत !

गुहेंत शिरल्यावर डाव्या हाताकडे वळून ते पहातात, तों तेथें एक तपस्वी आसन घालून समाधिस्थ बसले आहेत, असें त्यांच्या दृष्टीला पडलें. शास्त्री-बुवांनीं हें पाहिल्याबरोबर ते तर घाबरले. इतक्यांत मंडळीहि आली, व आंत कोण आहे हें ठाऊक नसल्यामुळें हास्यविनोदाचा कलकल करीत आंत शिरली,

शास्त्रीबुवा आतां तर फारच घाबरले. या योगिराजांचा समाधिभंग झाला, ह्मणून संतापून हे शाप तर देणार नाहींत ना, अशी त्यांनां भीति पडली !

स्वामींकडे मंडळींचें लक्ष्य गेल्यावर त्यांचें तें तेज पाहून त्यांचा गलका एकदम बंद झाला. 'बाहेर चलूं या,' असें शास्त्रीबुवांनीं खुणेनें सुचविलें. मंडळी बाहेर पडणार, इतक्यांत स्वामींनीं डोळे उघडले. ते कोपामुळेंच कीं काय कोण जाणे, आरक्त झाले होते. "कः[1] कोऽत्र भोः" असें त्यांनीं जराशा रागाच्या स्वरानें विचारलें.

हे कोणी तरी पूर्वकालीन तपस्वी असावेत, अशी शास्त्रीबुवांची व आई-साहेबांची खात्री आली, आणि आतां आपणाला हे शाप देणार, अशी त्यांनां भीति वाटली. " अपराद्धाः[2] स्मः अकालागमनेन क्षन्तव्योऽयमस्माकमपराधः " असें शास्त्रीबुवा पुटपुटले, व त्यांनीं त्यांच्यापुढें लोटांगण घातलें. आईसाहेबांनींहि तसेंच केलें. स्वामींचें तेज असें विलक्षण होतें, कीं, नानासाहेबांनीं देखील त्यांनां उचित नमन केलें. उत्तरेनेंहि स्त्रियांनां उचित असा नमस्कार केला.

शास्त्रीबुवांचीं संस्कृत वाक्यें ऐकून स्वामींनीं मंदस्मित केलें, व ते प्रेमपूर्वक स्वरानें ह्मणाले " मी मराठी जाणतों, मराठींतच बोला, आणि मला तुह्मी भिऊं नका. मी रागावलों नाहीं. समाधि मध्येंच मोडली, म्हणून प्रथम क्षणभर राग आला होता; पण आतां तो मुळींच राहिला नाहीं. "

स्वामींच्या व आपल्या विजयगांवकर मंडळींच्या ओळखीला अशा चमत्कारिक रीतीनें जरी प्रारंभ झाला, तरी थोडक्याच अवधींत एकमेकांच्या हृदयांची एकमेकांनां ओळख पटली, व त्याच वेळीं तेथेंच त्यांच्या प्रेमसंभाषणाला सुरुवात झाली. त्याचें मी काय व कसें वर्णन करूं ? कांहीं लिहिलें, तरी वर्णन वस्तुस्थितीच्या मानानें नीरस व फिकटच होणार ! तेव्हां सविस्तर वर्णनाच्या भरीला न पडलेलेंच बरें ! या खंडाच्या पहिल्या प्रकरणांत वर्णन केलेले ते हेच स्वामी, हें वाचकांनीं ओळखलें असेलच. या प्रियब्रह्मस्वामींशीं—त्यांचें हें नांव—संभाषण करतांकरतां त्या जिज्ञासु प्रवासी मंडळीला पुष्कळ दिवसांची दाट ओळख असलेल्या स्नेह्यासारखे स्वामी वाटूं लागले. सज्जन माणसें सात पावलें बरोबर चाललीं, ह्मणजे तेवढ्या कालांत त्यांचें सख्य जमतें असें ह्मणतात, तें खोटें

---

१. कोण आहे ? २ भलत्याच वेळीं येऊन आह्मी आपले अपराधी झालों आहोंत; क्षमा असावी.

नव्हे. सच्छील आणि सहृदय माणसांची गांठ पडल्याबरोबरच एकमेकांचें हृदय एकमेकांकडे ओढलें जातें. त्यांनां औपचारिक ओळखीची जरूर लागत नाहीं. प्रियब्रह्मस्वामींच्या प्रेमपूर्ण, निष्कपट व स्मितयुक्त मुद्रेकडे पाहिलें, ह्मणजे पूर्णचंद्राकडे किंवा उत्फुल्ल कमलाकडे पाहून जसा आपणांला आनंद होतो, तसा कोणालाहि आनंद झाला असता.

गांठ पडल्याबरोबर आपल्या मंडळीला स्वामींची प्रथम भीति वाटली; पण पांच मिनिटांच्या आंतच वर ह्मटल्याप्रमाणें स्वामींशीं आपला दृढ परिचय असल्यासारखें त्यांनां वाटूं लागून ते सर्वजण हरतऱ्हेच्या गोष्टी मन मोकळें करून बोलूं लागले.

"आपण मराठी कोठें शिकलांत ?" शास्त्रीबुवांनीं बोलतांबोलतां विचारलें.

" आपण महाराष्ट्रीय खात्रीनें नाहीं !"

"मी बंगाली आहें, पण मला पुष्कळ भाषा येतात. त्या कपाटांत पाहिलेंत, तर फ्रेंच व जर्मन पुस्तकेंहि तुह्मांला दिसतील."

"आपण किती वर्षें या गुहेंत आहां ? आपलें पूर्वचरित्र—"

"मी कलकत्त्यांतील एका हायस्कूलवर हेडमास्तर होतों. पण स्वामी विवेकानंदांची गांठ पडल्यापासून संसाराचा मला वीट आला. त्यांच्या अनुग्रहानें माझी योगविद्येंत व ब्रह्मविद्येंत बरीच प्रगति झाली आहे; पण ब्रह्मपदप्राप्ति अद्यापि मला झाली नाहीं. मला पुष्कळ सिद्धि प्राप्त झालेल्या आहेत, व मी पुष्कळ चमत्कारहि दाखवूं शकेन; पण तुमच्याशीं खरें सांगायचें, ह्मणजे या सिद्धींचें नीतिदृष्ट्या कांहीं महत्त्व नाहीं."

"प्रथम मी घाबरून गेलों !" शास्त्रीबुवांनीं प्रांजलपणें कबूल केलें. "मला वाटलें, कीं, आपण कोणी तरी पूर्वींचे तपस्वी—"

स्वामी हंसून ह्मणाले "तपस्वी असलों ह्मणून भिण्याचें काय कारण ? तुह्मी तर ईश्वराला किंवा राक्षसालासुद्धां भिऊं नये असें ह्मणणारे आहांत !"

शास्त्रीबुवांनीं एका घटकेपूर्वींच उच्चारलेले हे शब्दस्वामींनां कसे कळले ? अंतर्ज्ञानानें काय ? सर्वजण आश्चर्यचकित होऊन त्यांच्याकडे पाहूं लागले.

"आश्चर्य करण्याचें कारण नाहीं." स्वामी ह्मणाले. "दुसऱ्याच्या मनांतील गोष्ट ओळखणें हें कांहींच नाहीं. मी एका क्षणांत सूक्ष्म देह धारण करून पाहिजे तेथें जाऊं शकतों ! या एक प्रकारच्या सिद्धि आहेत. या योगाभ्यासानें

प्राप्त होतात. यांच्यांत अभिमान बाळगण्याजोगें कांहीं नाहीं. जगांत ज्या अनेक 'शक्ति' आहेत, त्यांपैकींच ही एक योगाभ्यासानें प्राप्त होणारी शक्ति आहे. धबधब्यानें किंवा एंजिनानें आपल्या प्रचंड शक्तीचा अभिमान धरणें जसें अयोग्य, किंवा तीव्र बुद्धीच्या माणसानेंहि आपल्या ईश्वरदत्त बुद्धीचा अभिमान धरणें जसें अयोग्य, तसेंच आमच्यासारख्यांनींहि योगबलाचा अभिमान धरणें अयोग्य ! बाष्पशक्ति, जलयंत्रशक्ति, विद्युच्छक्ति, मत्तगज-शक्ति, मतिशक्ति, योगशक्ति इत्यादि शक्तींची धर्मदृष्ट्या एकच योग्यता आहे. अधिक 'शक्ति' आहे, ह्मणून अधिक 'पावित्र्य' आहे, असा अर्थ करतां येत नाहीं. मनुष्याची 'शक्ति' किती आहे, हा मुख्य प्रश्न नसून, आहे त्या शक्तीचा ज्ञानपुरःसर सदुपयोग करण्यांत येत आहे का दुरुपयोग, हा प्रश्न महत्त्वाचा आहे !"

प्रियब्रह्मस्वामींचें असें भाषण चाललें असतां रागिणीच्या मनांत 'यांनां कुठें तरी आपण पाहिलें असावें,' असें एकसारखें येत होतें, व 'कुठें बरें यांनां पाहिलें असावें ?' असा ती आपल्या मनाशीं विचार करीत होती. "मूर्ति तर ओळखीची दिसते !" ती मनांत ह्मणत होती. "होय, आत्महत्या करून घेण्याचा माझा निश्चय ज्या दिवशीं झाला, त्या रात्रीं ही मूर्ति मीं पाहिली. यांनींच मला आत्महत्येपासून परावृत्त केलें. तीच मूर्ति ही, यांत बिलकूल शंका नाहीं ! यांनींच सूक्ष्मदेह धारण करून मला गंभीर व प्रेमळ शब्दांनीं 'रागिणी, आत्महत्या करूं नकोस. आत्महत्येनें कर्मफल चुकेल काय ?' असें ह्मटलें."

रागिणीच्या मनांत असा विचार येत आहे, तोंच स्वामींनीं तिला नांवानें हांक मारली. "रागिणीताई !" ते ह्मणाले "तुमच्या मनांत काय चाललें आहे, तें मी ओळखूं ? आत्महत्येचा तुमच्या मनांत पूर्वी एकदां विचार आला होता, त्या काळची तुम्हाला आतां आठवण होत आहे, होय ना ?"

स्वामींनीं अशा रीतीनें रागिणीला आपल्या योगसिद्धीचा स्पष्टच दाखला दिला; पण इतरांनांहि त्यांनीं आपल्या संभाषणांत अशा कांही गोष्टी सांगितल्या, कीं, जो तो आपल्या मनांत अगदीं थक्क होऊन गेला ! बरें, हें सांगण्यांत स्वामींनां यत्किंचित् तरी अभिमान वाटत होता काय ? नाहीं, मुळींच नाहीं ! त्यांनीं आपल्या योगशक्तींची हकीकत मंडळीला सांगितली, पण त्यांत डौलाचा भाग मुळींच नव्हता. जसे पुष्कळ दिवसांचे स्नेही एकमेकांशीं बोलतात, तसे

ते आपलें हृदय उघडें करून सांगत होते. त्यांच्या भाषणांत, मुद्रेंत, व डोळ्यांत एक प्रकारची अशी मोहिनी भरली होती, कीं, त्यांच्याविषयीं सच्छील माणसाला आदरच नव्हे–तर प्रेमहि वाटावें. वास्तविक नानासाहेबांची साधुसंतांवर व स्वामींवर श्रद्धा नव्हती; पण स्वामींचें पावित्र्यतेज, त्यांचा साधेपणा, इत्यादि गोष्टी पाहून व त्यांचें निष्कपट अणि निरभिमान भाषण, त्यांचें प्रेमपूर्ण आदरातिथ्य व त्यांचा स्निग्धजनतुल्य सस्मित आग्रह इत्यादि गोष्टी प्रत्यक्ष अनुभवून सुधारकाग्रणी नानासाहेब देखील त्यांच्याशीं सप्रेम आदरानें बोलूं लागले. इतके, कीं, त्यानीं आपल्या नास्तिक्यशंकाहि त्यांच्यापुढें कबूल केल्या, व त्यांनां हरतऱ्हेचे तात्त्विक प्रश्न विचारले. प्रियब्रह्मस्वामी हे कोणी परकी आहेत, असें त्यांनां वाटलेंच नाहीं. रागिणीला तर ते जुन्या ओळखीच्या माणसाप्रमाणें वाटत होते, यांत नवल नाहीं. पण नानासाहेब, भाऊसाहेब इत्यादि मंडळींनांसुद्धां ती गुहा म्हणजे आपल्या विजयगांवच्या घरांतला दिवाणखानाच आहे, असें वाटूं लागलें. हा सर्व परिणाम कशाचा? तर त्यांच्या शुद्ध अंतःकरणांचा! हृदयाची हृदयाला एका क्षणांत ओळख पटते !

प्रियब्रह्मस्वामींनां या मंडळीला पाहून किती आनंद झाला, हें सांगतां येत नाहीं. ते या मंडळीची अपेक्षाच करीत होते, असें मला वाटतें. गाईला जसें वांसरूं भेटावें, किंवा आईला आपलें हरवलेलें मूल दृष्टीला पडल्यावर जसें व्हावें, तसें त्या वयोवृद्ध, ज्ञानवृद्ध व तपोवृद्ध प्रेमळ प्रियब्रम्हस्वामींनां रागिणीला पाहून वाटलें. उत्तरेला पाहूनहि त्यांनां असेंच वाटलें. काय असेल तें असो, या सर्वच मंडळीबद्दल त्यांनां अतिशय प्रेम वाटत होतें, एवढी गोष्ट खरी. असें प्रेम त्यांनां कां वाटावें? या प्रश्नाचें उत्तर देणें कठिण आहे. प्रेमाचें कारण कोण सांगेल ? **'तत्तस्य किमपि द्रव्यं यो हि यस्य प्रियो जनः'** या गोष्टीवर अखेर सर्व उपपत्ति येणार ! कसेंहि असो. कांहीं लावण्ययुक्त युवयुवतींची दृष्टादृष्ट होतांच त्यांचीं मनें क्षणार्धांत प्रेमनिबद्ध होतात, ही गोष्ट जशी अनुभवसिद्ध आहे, तितकीच ही गोष्टहि अनुभवसिद्ध आहे, कीं, शुद्ध अंतःकरणांच्या व सरळ स्वभावाच्या माणसांचा नमस्कार चमत्कार होतांच त्यांचें त्याच क्षणीं सख्य होतें, व ते दृढ परिचित मनुष्यांप्रमाणेंच त्या क्षणापासून एकमेकांशीं बोलूंचालूं लागतात !

# प्रकरण पांचवें.

## स्वामींच्या सहवासांत.

यानंतर प्रियब्रह्मस्वामी व आपली विजयगांवकर मंडळी यांमध्यें पुष्कळच संभाषणप्रसंग झाले. त्या सर्व प्रसंगांचें सविस्तरपणें वर्णन करण्याचें येथें प्रयोजन नाहीं. एवढें सांगितलें म्हणजे पुरे, कीं, त्यांच्या तत्त्वचर्चात्मक, विनोदी व निष्कपट प्रेमसंभाषणांसारखीं संभाषणें ज्यांनां ऐकावयाला सांपडतील, ते खरोखरच धन्य होत ! कितीतरी विषयांचा त्यांनीं त्या आठ दिवसांत ऊहापोह केला ! सामाजिक, राजकीय, धार्मिक, काव्यविषयक, ऐतिहासिक, शास्त्रीय, सर्व विषयांची तेथें हजिरी झाली. तात्त्विक चर्चा म्हटली म्हणजे ती दुर्बोध, शाब्दिक, उदास व विनोदरहित असावयाची, असा आपला ग्रह व अनुभवहि आहे; परंतु त्यांच्या तत्त्वचर्चेंत काव्य भरलें होतें, तें सुबोध व विनोदपरिपूर्ण होतें, आणि गायनाप्रमाणें तें आनंददायक होतें. त्यांच्या काव्यचर्चेंत तत्त्वज्ञान निघत असे, व इतिहासाच्या वेळीं वाङ्मयहि डोकावत असे. मधुनमधून पुराणांतील वगैरे मनोरंजक व बोधपूर्ण गोष्टीहि निघावयाच्या, व कधींकधीं तर गहन तात्त्विक चर्चा चालली असतांनासुद्धां एकादी विनोदात्मक गोष्ट किंवा चुटका अथवा कोटि निघून मंडळींत एकदोन मिनिटें हंशा पिकावयाचा ! उत्सवप्रसंगीं अत्तरगुलाबाचा वास जसा सर्व दिवाणखान्यांत दुमदुमून भरलेला असतो, तसे त्यांच्या विविधचर्चेंत विनोद व आनंद हे भरून राहिले होते. त्या दिव्य, मधुर, गहन–विनोदी संभाषणाची स्मृति जरी झाली, तरी आमच्या विजयगांवकर मंडळींनां अद्यापि किती तरी आनंद होतो; मग त्या वेळीं त्यांनां काय वाटलें असेल, याची कल्पना वाचकांनींच केलेली बरी !

प्रियब्रह्मस्वामींविषयीं आमच्या मंडळीला जरी पूज्यभाव वाटत होता, तरी स्वामींचें वाक्य म्हणजे वेदवाक्याप्रमाणें अविचारणीय, असें ते मानीत नसत. मनाला वाटेल ती शंका नम्रपणेंच–पण मनांतील भाव न लपवितां ते व्यक्त करीत असत. या गोष्टीचा प्रियब्रह्मस्वामींनांहि कधीं राग आला नाहीं. खरी गोष्ट अशी होती, कीं, वाद करतांना स्वामी व ही विमलात्म सुसंस्कृत मंडळी भेदभाव विसरून जात असत. स्वामींची कीर्ति त्यांनीं बरेच दिवस ऐकिली होती, व त्यांची ओळख अशी प्रत्यक्ष जरी फार दिवसांची नव्हती, तथापि

सात पावलांच्या संगतीनें सज्जनांचा स्नेह जमतो, या मागच्याच प्रकरणांत निर्दिष्ट केलेल्या उक्तीप्रमाणें त्या प्रयतात्म स्वामींच्या आणि या शुद्धहृदय व निष्पाप मंडळींच्या परिचयाला अल्पावधींतच स्नेहस्वरूप आलें होतें. ते अगदीं जिवलग मित्रांप्रमाणें थट्टामस्करी करीतकरीत आणि हंसतखेळत एकाद्या विषयाची चर्चा करीत असत.

एक दिवस बोलतांबोलतां 'Idealism आणि Realism (अदृश्यवाद आणि दृश्यवाद)' हा विषय निघून वाद वाहवतवाहवत जातांजातां तो 'धर्म खरा, कीं, भौतिक शास्त्रें खरीं?' या प्रश्नावर येऊन ठेपला.

"भौतिक शास्त्रें कांहींहि ह्मणालीं, तरी आह्मी ईश्वर आहे असेंच मानणार!" शास्त्रीबुवा ह्मणाले.

"'ईश्वर आहे,' असं मानायला पुरावा काय?" उत्तरेनें विचारलें.

"याला पुरावा शास्त्राचा. शिवाय, सज्जनांची अंतःकरणप्रवृत्ति हा दुसरा एक पुरावा. '**सतां हि संदेहपदेषु वस्तुषु प्रमाणमन्तःकरणप्रवृत्तयः**' या कविवाक्यावर आमची भिस्त आहे."

"कवींनीं ह्मटलं ह्मणून तें सत्य होत नाहीं!" उत्तरा ह्मणाली. "रसायनशास्त्रवेत्ता आपलं विधान जसं प्रत्यक्ष प्रमाणं देऊन सिद्ध करून देतो, तसं तुमचा कवि किंवा तुमचीं शास्त्रं—"

"जगांत जें प्रत्यक्ष दिसतं आहे, तेंच खरें मानायचें कीं काय?" स्वामी मध्येंच ह्मणाले. "त्रिकालदर्शी ऋषींचीं वचनें, प्रतिभावान् कवींची वाणी, सज्जनांची व वीर पुरुषांची अन्तःकरणप्रवृत्ति, हीं सर्व अविश्वसनीय समजायचीं कीं काय?"

"सज्जनांची उदात्त अंतःकरणप्रवृत्ति ह्मणजे वेडेपणा आणि कविकल्पनासाम्राज्य ह्मणजे मनोहर स्वप्नसृष्टि!" उत्तरा बिनदिक्कत ह्मणाली.

"अरसिक मनुष्याला कवींचें मर्म समजायचेंच नाहीं!" शास्त्रीबुवा म्हणाले. "रानटी लोकांपुढें कालिदासाचे श्लोक ह्मटले, ह्मणून त्यांनां आनंद भारीच होणार आहे!"

"मला जंगली लोकांत काढलंत, याचा मला राग नाहीं." उत्तरा शांतपणानें ह्मणाली. "पण माझं आपलं असं ह्मणणं आहे, कीं, कवींच्या काल्पनिक वर्णनांनीं जो तात्पुरता आनंद होतो, त्याची खेळांतल्या आनंदा-

इतकीच योग्यता आहे. त्यांच्या वर्णनांनीं आनंद झाला, ह्मणून त्यांचे विचार शास्त्रज्ञांच्या सिद्धान्तांसारखे मान्य होत नाहींत. प्रयोगांनीं सिद्धान्त सिद्ध करून दाखविणारे शास्त्रज्ञ कोणीकडे, आणि मनाला वाटेल तें कविताबद्ध करून गोड शब्दांत बरळणारे कवि कोणीकडे ! कवींचीं उदात्त वर्णनं घटकाभर वाचून ठेवून द्यावींत, एवढाच त्यांचा उपयोग! कवींच्या वर्णनांत पाहिजे तो वेडेपणा खपतो! कविसृष्टींत मेघांनां दूतांप्रमाणं निरोप सांगतां येतो, सिंहांनां वाचा फुटते, आणि दगडाला द्रव येतो! कविसृष्टींतील वानरं समुद्रावर सेतु बांधतात! कवीला ‘ गंगेच्या कांठचा पक्षी किंवा साप होणं बरं, पण राजा होणं नको, ’ असं वाटतं ! त्याला ‘ वनवासी फूल ’ उपदेश करतं! पुरूरव्याला लतेमध्यें जशी उर्वशी दिसत होती, तसाच कविप्रतिभेला प्रत्येक वस्तूंत ईश्वरांश दिसतो ! प्रत्येक वस्तूंत जर ईश्वरांश असेल, तर मग सापाला हातांत कां धरूं नये? कविवचनांवर जर विश्वास ठेवायचा, तर मग आपल्या प्रिय माणसांनां पोस्टांतून पत्र न पाठवितां एकाद्या राजहंसाबरोबर किंवा मेघाबरोबर आपला निरोप कां पाठवूं नये?”

“ताई, कवींची चेष्टा करतेस, तशी भौतिकशास्त्रज्ञांची चेष्टा करतां नाहीं का यायची?” रागिणी ह्मणाली. “एका शास्त्रज्ञानं ‘ सूर्यप्रकाशामुळं दिवसा दिवे लागत नाहींत, ’ असा विचार करून सूर्याची योग्यता लाख कोटि रॅकेलच्या दिव्यांबरोबर केली होती, हें तुला ठाऊक आहे ना? मुंबई येथील एका शास्त्रज्ञाला दिवाळीचा ‘लाइट’ पहायला बोलावलें असतां त्यानं ‘ एका दिव्यासारखे लाखों दिवे रांगेनं लावले आहेत’ अशी कल्पना केली, म्हणजे झाला दिवाळीचा लाइट पाहून !’ असे उद्गार काढले होते, हें तूं ऐकलं आहेस ना?”

रागिणीचें बोलणें संपल्याबरोबर उत्तरा लगेच ह्मणाली “ तुम्हीं भौतिकशास्त्रज्ञांची किती जरी टर उडविलीत, तरी त्यांचीं तत्त्वं प्रयोगसिद्ध आहेत— त्यांच्यापुढं तुमचा विनोद कसा टिकणार? यूरोपियन तोफांच्यापुढं जसं पेशवाईतल्या ब्राह्मणांच्या शापांचं किंवा रानटी लोकांच्या तिरकमठ्यांचं कांहीं चालत नाहीं, तसंच शास्त्रज्ञांच्या तत्त्वांपुढं तुमच्या धार्मिक वचनांचं किंवा तुमच्या बाष्कळ विनोदाचं कांहीं दिखील चालायचं नाहीं! ”

“तुमच्या भौतिकशास्त्रज्ञांचे सिद्धान्त खरे असतील,” प्रियब्रह्मस्वामी ह्मणाले. “ पण याचा अर्थ ‘धार्मिक तत्त्वें खोटीं,’ व ‘कविवचनें त्याहून खोटीं,’ असा

मात्र नाहीं. धर्मग्रंथांत जें जें सागितलें आहे, किंवा कवि जें जें सांगतील, त्यावर अंधपणें विश्वास ठेवा, असें मी ह्मणत नाहीं. माझा भावार्थ हा, कीं, ईश्वर-विषयक गोष्टी प्रत्यक्ष प्रमाणानें किंवा तार्किक युक्तिवादानें सिद्ध करतां येत नाहींत, ह्मणून त्या सर्व खोट्या, असें ह्मणण्याचा आपणांला अधिकार नाहीं. पाहूं गेलें, तर कोणती उच्च, उदार गोष्ट सयुक्तिक व अवश्यकरणीय आहे, असें बुद्धिवादानें सिद्ध करतां येईल? 'अपकार केला असतां उपकार करावा,' हें श्रेष्ठ तत्त्व सुजनहृदयालाच मान्य होईल; हें तत्त्व बुद्धिवाद करून दुर्जनाला बुद्धिदृष्ट्याहि मान्य करायला लावणें शक्य नाहीं. कोणत्याहि वीर पुरुषाकडे, दानशूर मनुष्याकडे, किंवा उदार सुधारकाकडे तुम्ही जा, आणि त्याला स्वतःच्या वर्तनांत दिसून येणारें उच्चतम तत्त्व वावदूक तार्किकाला युक्तिवादानें सिद्ध करून दाखवितां येतें का पहा. त्यांनां हें सिद्ध करतां येणार नाहीं. उदार तत्त्व हृदयगम्य आहे, तर्कप्रतिपादनीय नाहीं. ज्याच्या पोटांत प्रेम नाहीं, त्याला दुसऱ्यावर प्रेम करण्याची उपयुक्तता कोण सिद्ध करून दाखवील? दुसऱ्यावर प्रेम केल्यानें स्वतःचा फायदा होतो, असें तुम्हीं दाखविल्यास तो जोंपर्यंत स्वतःचा फायदा होण्याचा संभव आहे, तोंपर्यंत प्रेम करावें एवढी गोष्ट कबूल करील; पण प्रेमाकरितां प्राणपरित्याग किंवा निरपेक्ष स्वहितत्यागहि करायला तो तयार व्हायचा नाहीं. लोकांची वाहवा मिळावी ह्मणून तो थोडाबहुत दानधर्म करील; पण रामासारखें राज्य सोडायला किंवा कर्णासारखी जन्मसिद्ध कर्णकुंडलें द्यायला अथवा ख्रिस्तासारखा परहितार्थ स्वदेहयज्ञ करायला तो कधींहि तयार व्हायचा नाहीं!"

स्वामींच्या या भाषणावर नानासाहेबांनीं बरीच विनोदात्मक टीका केली, व नंतर ते, भाऊसाहेब आणि शास्त्रीबुवा यांच्यामध्यें बराच वादविवाद झाला. या वादाला पुढें अनेक शाखा फुटल्या; परंतु त्यांचें येथें दिग्दर्शनहि करणें शक्य नाहीं. प्रियब्रह्मस्वामी जरी न्यायाधिशासारखे शांत वृत्तीनें व निःपक्षपाती-पणानें प्रश्नाचा निकाल लावण्याचा प्रयत्न करीत होते, तरी वादाचा निकाल लागला नाहीं. त्यांच्या ह्मणण्यावरहि नानासाहेब वगैरे मंडळी कांहीं तरी आक्षेप घ्यावयाचीच! स्वामी बहुश्रुत व विवेकी होते, परंतु तात्त्विकदृष्ट्या ते कृतनिश्चय झालेले नव्हते; ते परोपकाररत होते, त्यांचा अहंकार पूर्णपणें गळला होता, ते इतरांहून ज्ञानांत फारच श्रेष्ठ होते; तरी ते प्रत्यक्ष ब्रह्मवेत्ते नव्हते.

त्यांनां बऱ्याच योगसिद्धि होत्या, व नीतिदृष्ट्या ते फारच उच्च होते, परंतु आपण सर्वज्ञ व सर्वश्रेष्ठ आहों, असें त्यांनां वाटत नव्हतें; आणि, जरी त्यांनां तसें वाटत असतें, तरी ही विवादशूर विजयगांवकर मंडळी आक्षेप घ्यावयाला भ्याली असती किंवा नाहीं, याची शंकाच आहे !

## प्रकरण सहावें.

## शोधक प्रवासी.

हिमालयावरील त्या चिरस्मरणीय धर्मशाळेंत एक तरुण गृहस्थ चिंताक्रांत मुद्रेनें आपल्या खोलींत बसून कसला तरी महत्त्वाचा विचार करीत होते. कसल्या प्रकारची त्यांची ती काळजी असावी बरें? 'तगादा लावणाऱ्या मारवाड्याचें कर्ज कसें फेडावें, 'अशा प्रकारची त्या गृहस्थांची चिंता असती, तर त्यांच्या चर्येवर एक प्रकारचें जें हास्य दिसत होतें, तें खास दिसलें नसतें. 'आपण केलेलें पाप कसें लपवावें, ' अशा प्रकारचीहि त्यांची काळजी नव्हती. तशी जर असती, तर त्यांच्या मुखावर जें सात्त्विक तेज दिसत होतें, तें दिसलें नसतें. काळजी कसलीहि असो, त्यांचें मन या वेळीं क्षुब्ध झालेलें होतें, व या प्रसंगीं आपलें कर्तव्य काय आहे हें त्यांनां समजत नव्हतें, एवढी गोष्ट मात्र खरी! हे चिंताग्रस्त व किंकर्तव्यतामूढ झालेले गृहस्थ कोण, आणि त्यांच्यावर असें कोणतें संकट आलें होतें? त्यांचें स्वगतच आपण ऐकूं, म्हणजे सगळें उघड होईल!

" या उत्तरेच्या वेडामुळें माझें स्वामींच्या बोधप्रद भाषणाकडेसुद्धां लक्ष्य लागत नाहीं! हें ' वेड ' म्हणजे खरोखरीचेंच ' वेड ' होणार आहे! इथून आतां पळ काढलाच पाहिजे. नाहीं तर या जहांबाज मोहिनीच्या पाशांत मी पुरा सांपडणार खास! सांपडणार कसला–सांपडलोंच आहें म्हणा ना! जेवतांखातां, उठतांबसतां माझ्या मनांत तिचेच विचार चाललेले असतात, तिचेंच भाषण मला ऐकावेंसें वाटतें, तिच्या मुखावलोकनापुढें सृष्टिसौंदर्याचें मला कांहींच वाटत नाहीं, अशी माझी–या आनंदरावाचीसुद्धां स्थिति झाली आहे! कादंबऱ्यांत कामिजनांचें केलेलें वर्णन एकंदरींत खरेंच असतें, अशी माझी आतां खात्री झाली! उत्तरे! तूं साधी, निष्कपटी स्त्री नाहींस! तर तूं सौंदर्यजाल पसरून मोहपाशांत गुंतविणारी कपटी आणि निर्दय स्त्री आहेस!

" पण तूं किती जरी कपटी मोहिनी असलीस, तरी मी तुझ्या पाशांत गुरफटला जाणारा प्राणी नाहीं! तुझे पाश मी तोडून टाकणार, व आजउद्यां येथून निसटून जाणार!

"मी निसटून गेलेला पाहून मग मात्र तुझी पुरीच फजिती होईल! उत्तरे, देशप्रीतीपुढें तुझी योग्यता काय? तुला जर आपल्या मोहक स्वरूपाचा गर्व असेल, तर उद्यां तूं खचित खजील होशील!

" पण उत्तरेची फजीति झालेली पाहून मला आनंद व्हावा–अं ! आणि तिलाच का मी 'कपटी', 'निर्दय', आणि 'जहांबाज' ह्मटलें ? उत्तरे, उत्तरे, मला क्षमा कर ! खरी गोष्ट अशी आहे, कीं, तुझ्या निरागसत्वालाच मी कपटजाल ह्मटलें ! तूं मनाची कोमल आहेस, ह्मणूनच तुझें सौंदर्य मला निर्दयपणें छळीत आहे ! तुला लोक 'जहांबाज,' 'त्राटिका' म्हणतात, ह्मणूनच मींहि तुला मनांत विनोद-बुद्धीनें जहांबाज म्हटलें. पण तुझी खरी परीक्षा मीं केलेली आहे. बाह्यस्वरूपा-वरून जर 'जहांबाज' आणि 'त्राटिका' ह्मणायचें, तर मग बाह्यस्वरूपावरून पुण्यांतल्या तालिमीवरील वाघांनांहि खरोखरीचे क्रूर वाघच समजलें पाहिजे ! उत्तरे, थट्टेनें 'जहांबाज' ह्मटल्याबद्दल तूं माझ्यावर रागवायची नाहींस ना ?

"पण मी हा प्रश्न विचारतों आहें कुणाला ? उत्तरा इथें आहे कुठें ? ती आपल्या खोलींत एकादें पुस्तक वाचीत पडली असेल आतां ! नाहीं तर–नाहीं तर, कदाचित् ती माझ्यासारखीच विव्हळत विचार करीत बसली असेल ! होय, हाच माझा तर्क बहुधा खरा आहे ! आणि यामुळेंच मला दुःख होत आहे. उत्तरे, तुझें माझ्यावर प्रेम नसतें, तर फार बरें झालें असतें ! आपल्या प्रियेचें आपल्यावर प्रेम नसावें, अशी विपरीत प्रार्थना कधीं कोणीं कामी पुरुषानें खरोखर किंवा नाटक–कादंबऱ्यांत तरी केली असेल का ? उत्तरे ! माझें तुझ्यावर अत्यन्त प्रेम आहे; पण तुझें माझ्यावर जर प्रेम नसतें, तर मला आपलें प्रेम आवरतं घेऊन स्वदेशाकडे अधिक उत्साहानें लक्ष्य द्यायला सांपडलें असतें ! पण तुझी स्थिति पाहून माझा निश्चय डळमळत आहे ! हाय हाय ! प्रेमी मनुष्याला प्रियजनाचें प्रेम शत्रूसारखें वाटावें काय ? ईश्वरा, तुझ्या अनंत लीलांपैकीं ही लीला सर्वांत शोचनीय आहे !

" ईश्वराच्या गोष्टी कशाला ? ईश्वराला बऱ्यावाईटपणाबद्दल सर्टिफिकीट देणारे आपण कोण ? माझें कर्तव्यकर्म मीं केलें आहे का ? 'जन्माला येऊन मी स्वदेशसेवा करीन,' या निश्चयाची वाट काय लावायची ? बस्स–नाहीं ! उत्तरे, स्वदेशसेवेपुढें तुझ्या प्रेमाचा मी होम करणार ! मी उद्यां तुझा आणि तुझ्या मोहाचा त्याग करून जाणार !

" पण जायचें तरी कुठें ? हो, हा एक विचार फक्कड आहे ! इथून तीनचार दिवसांच्या पल्ल्यावर 'कारिसेन' नांवाची एक मनुष्यभक्षक रानटी जात आहे, आणि त्या जातीविषयीं अद्यापि कोणींहि शोध लावला नाहीं, व त्यांच्या

चमत्कारिक चालीरीतींविषयींहि कोणीं माहिती लिहिलेली नाहीं, असें स्वामी कालच मजजवळ बोलतांबोलतां ह्मणाले. आपण तिकडेच गेलों तर ? त्या मनुष्यभक्षक लोकांमध्यें जाणें धोक्याचें आहे खरें; पण जर तेथून आपण बचावून आलों, तर त्या जातीविषयीं माहिती लिहून एकादें पुस्तक प्रसिद्ध करावें, ह्मणजे हिंदी लोकांनां एकादा तरी नवीन शोध लावण्याचें यश मिळेल ! बस्स— ठरला हा बेत !"

आनंदरावांनीं हा बेत मनांत योजिला, आणि कर्मधर्मसंयोगानें योजिलेला बेत मंडळींनां कळविण्याचाहि योगायोग लवकरच आला. तो प्रकार असाः—

मागच्या प्रकरणांत संवादाचें वर्णन करून शेवटीं 'वाद होता तेथेंच राहिला,' अशा अर्थाचें एक विधान मीं केलें, आणि तें खरेंहि आहे; पण एका अर्थी त्या वादाचा एक विलक्षण परिणाम–घोर परिणाम झाला, असेंहि ह्मणावयाला हरकत नाहीं. दुसऱ्या दिवशीं त्यांच्यामध्यें तो प्रश्न पुनः उपस्थित होऊन संभाषण अखेर हिंदी लोकांच्या सध्यांच्या स्थितीकडे वळलें.

'उपनिषत्कालीन आर्य लोकांनां उदात्त–अदृश्य गोष्टी प्रिय होत्या, परंतु हल्लीं हिंदी लोकांचें लक्ष्य दृश्य–व्यावहारिक–पोटापाण्याच्या व चैनीच्या गोष्टीं-कडेच लागलेलें असतें,' असें स्वामींनीं प्रतिपादन केलें, आणि ते आणखी ह्मणाले "हल्लींच्या हिंदी लोकांनां व्यवहाराव्यतिरिक्त कोणत्याहि गोष्टीविषयीं विशेष औत्सुक्य नाहीं. कशाचेंहि त्यांनां कौतुक वाटत नाहीं, कशाविषयीं त्यांनां उत्कट इच्छा नाहीं, व कोणतेंहि साहस करण्याची त्यांच्यांत हिंमत नाहीं. आपल्या या हिमालयाच्या शिखरांसंबंधीं जे शोध झाले आहेत, त्यांकडेच पहा ना ! हे शोध हिंदी लोकांनीं लावले आहेत, का यूरोपियन लोकांनीं ? हा हिमालय, हा देवतात्मा नगाधिराज मूळ आपल्या लोकांचा; येथील सौंदर्यानें आपल्या कवींनां स्फुरण दिलें, येथेंच आपल्या पूर्वज ऋषींनीं ब्रह्मचिंतन केलें, व येथील कैलासपर्वतावर आपल्या श्रीशंकरांनीं उग्र तप केलें. पण या आपल्या पवित्र, रम्य पर्वताविषयीं आपणांला हल्लीं कांहीं तरी माहीती आहे का ? जी कांहीं थोडीशी माहिती आहे, ती यूरोपियन शोधकांनीं दिलेली ! हिमालय हिंदुस्तानांत आणि त्यावरील शिखरांचा व हिमनद्यांचा शोध लावणारे यूरोपियन !"

"बंगालमधील कांहीं लोकांनीं शोध लावले आहेत," आनंदराव मध्येंच ह्मणाले " आणि आमच्या महाराष्ट्रांतील एका तरुणानें कैलासमानसदर्शन घेतलें आहे, असें ह्मणतात."

" तें कसेंहि असलें," स्वामी म्हणाले " तरी सर्व मुख्य व महत्त्वाचे शोध यूरोपियन लोकांचे आहेत, यांत शंका नाहीं. आपल्या लोकांनीं असल्या शोधांचें काम हातीं घेऊन हिंदी लोकांमध्येंहि जिज्ञासा व धाडस आहे हें जगाच्या निदर्शनाला आणून द्यायला नको काय ? कवींच्या गोष्टी निघाल्या असतां कालिदास–भवभूतींचीं नांवें जशीं आपण आनंदानें घेतों, तशी शोधकांची चर्चा चालली असतां आपण कोणत्या हिंदी गृहस्थांचीं नांवें घ्यायचीं ? पूर्वींच्या आर्यांनीं यूरोपमध्यें, अफ्रिकेमध्यें व अमेरिकेमध्येंहि आपलीं देवालयें बांधलीं; पण आम्हांला आतां खुद्द आपल्या देशांतील पवित्र पर्वतांची देखील नाममात्रें-करूनच ओळख ! हिमालयासंबंधानें आम्हांला आतां माहिती पाहिजे असली, तर 'इंपीरिअल गॅझेटिअर' किंवा स्वेन हेडिन इत्यादि यूरोपियन लोकांचीं पुस्तकें चाळावीं लागायचीं ! बाकी हिमालयासंबंधीं हिंदी लोकांनां माहिती हवी आहे कुठें ? केवळ जिज्ञासेनें इकडे येणारे पहिले गृहस्थ तुम्हीच आहांत !" असें म्हणून स्वामींनीं मृदु स्मित केलें.

" निदान इथें येणाऱ्या पहिल्या बायका तरी आम्हीच आहों, यांत शंका नाहीं." उत्तरा म्हणाली.

"मी आतां इथपर्यंत आलोंच आहें, तर आणखीहि पुढें जाणार ! " आनंदराव उत्साहानें म्हणाले. " आमच्यामध्यें धाडस नाहीं, असें यापुढें तरी खात्रीनें म्हणतां येणार नाहीं !"

" तुम्हाला पुढें जायचेंच असलें, तर मी तुमची सोय करून देतों." स्वामी म्हणाले. "इथून चार टप्प्यांवर माझा 'आनंदमठ' नांवाचा दुसरा एक आश्रम आहे, आणि तिथून एका टप्प्यावर तिसरा एक आहे. हे आश्रम जर तुम्हांला पहायचे असले, तर मी तुमची सर्व व्यवस्था करून देतों. तिसऱ्या आश्रमाजवळ शोध करण्याजोग्या पुष्कळच गोष्टी आहेत. त्याच्याजवळ 'कारिसेन' नांवाच्या रानटी लोकांची एक जात आहे. त्यांची भाषा, त्यांच्या चालीरीति वगैरेसंबंधाचे शोध अद्यापि कोणींहि लावले नाहींत."

"काल आपण मला हें सांगितल्यापासून तिकडे जाण्याचे विचार माझ्या मनांत घोळत आहेत–तिकडे जाण्याचें मीं ठरवलेंच आहे म्हणाना !" आनंदराव म्हणाले.

"सगळींचजणं जाऊं चला." उत्तरेनें हळूच सुचविलें.

"वेड तर नाहीं लागलं तुला ?" आईसाहेबांनीं उद्गारात्मक प्रश्न विचारलं.

"गेलं ह्मणून काय ग झालं आई?" उत्तरा आत्मसमर्थनार्थ ह्मणाली.

"तुम्ही आपले जा आनंदराव!" जनुभाऊ ह्मणाले. "आम्ही नाहीं येत. सुखाचा जीव उगाच दुःखांत कोण घालतो? सांदीकुंदींतली एकादी रानटी जात पाहून तुह्मांला काय हो मिळणार आहे? वर्णनपर असें एकादें पुस्तक छापाल, आणि 'ग्रंथकार' ही पदवी मिळवाल, एवढेंच ना?"

"एवढेंच नाहीं." आनंदरावांनीं आवेशानें उत्तर दिलें. "तेथें जाऊन शोध लावून स्वतःची जिज्ञासा मी तृप्त करणार, व आपल्या देशाची कीर्ति वाढविणार!"

"भलतंसलतं कांहीं करूं नका!" आईसाहेब ह्मणाल्या. "ते लोक रानटी आहेत ह्मणे! तुह्मांला ते एकट्याला मारतीलबिरतील! उगाच जीव धोक्यांत कां घालतां?"

"हिमालयावर अशी कुठली रानटी जात आहे?" भाऊसाहेब आश्चर्यानें स्वामींकडे पाहून ह्मणाले. "भूगोलांत तर कोठें याचा निर्देश नाहीं!"

"आजपर्यंत कोणींच या जातीचा शोध केला नाहीं, तेव्हां भूगोलांत उल्लेख असेल कसा? तेथें आजपर्यंत तीनच काय ते यूरोपियन शोधक गेले होते; पण त्यांतला एक इंग्रज जो होता, तो संग्रहणीनें आजारी पडून तेथेंच मेला; दुसरा डच मनुष्य होता, तो तेथून येतांयेतां वाटेंत थंडीनें वर्फातच मेला; आणि तिसरा एक फ्रेंचमन होता, त्याचें आणि त्या रानटी जातींतल्या लोकांचं भांडण होऊन त्याला त्या लोकांनीं जाळून खाऊन टाकलं!"

"वा! या जातीचा तर मग शोध अवश्य लावलाच पाहिजे!" आनंदराव ह्मणाले. स्वामींच्या भयकारक भाषणानें त्यांचा उत्साह कमी न होतां उलट वृद्धिंगतच झाला!

"भलताच कांहीं तरी विचार मनांत आणूं नका!" आईसाहेब त्यांना पोक्तपणें म्हणाल्या. "या तीन साहेबांचं काय झालं, हें आतांच ऐकलंत ना?"

"अंः! त्यांत काय आहे!" आनंदरावांच्या तोंडून बेफिकिरीचे उद्गार निघाले.

"त्यांत काय आहे?" जनुभाऊ त्यांना उपरोधिक स्वरानें ह्मणतात. "ते जंगली लोक जेव्हां हातपाय बांधतील, आणि जाळायला लागतील, तेव्हां समजेल काय सुख आहे तें सारें!"

" उगाचच्या उगाच एकाद्याला जाळायला ते कांहीं मूर्ख नाहींत ! त्या फ्रेंच गृहस्थानेंच तेथें कांहीं उद्धटपणा केला असेल, ह्मणून त्याला त्या लोकांनीं तसें शासन केलें, दुसरें काय ? आपण जर गरिबीनें राहिलों, तर कोणी आपल्या वाटेलाहि जाणार नाहीं. पण उगाच वाद पाहिजे कशाला ? तुह्मी कोणी या, नाहीं तर नका येऊं, मी तर आपला हा जाणारच ! नाहीं तरी जगून आतां आह्मी भारीच मोठे पराक्रम करणार आहोंत ! "

आनंदरावांचा हा आवेशपूर्ण निश्चय पाहून भाऊसाहेबांनांहि उत्साह आला, व ते ह्मणाले "चला जाऊं आपणसुद्धां ! "

" पुरे झाला प्रवास आतां ! " शास्त्रीबुवा त्यांनां ह्मणाले. " वाटेंत किती थंडी लागेल, आणि तिथेंहि किती थंडी असेल, त्याची कल्पना करा ! "

" वाटेंत थंडी आहे, " स्वामी ह्मणाले. "पण खुद्द त्या 'कारिसेन' गांवांतील हवा समशीतोष्ण आहे. त्या गांवाच्या चारहि बाजूंनीं डोंगर आहेत, व गांव थोडेंसें खोलांत–दरींत आहे; ह्मणून तिथें हवा फारच चांगली आहे. प्रकृति सुधारायला ती हवा फारच उत्तम ! "

" मग चलाच जाऊं आई आपण ! " उत्तरा ह्मणाली. " तुझ्या प्रकृतीला तिथं बरं वाटेल !"

उत्तरेला आईच्या प्रकृतीची काळजी होती, ही गोष्ट कांहीं खोटी नव्हे. पण ' कारिसेन ' गांवाला जाण्याच्या उत्सुकतेला आईची प्रकृति सुधारावी ही इच्छा कांहीं विशेष कारणीभूत नव्हती !

" पण वाटेंतली थंडी सोसेल का ? " रागिणीनें विचारलें, व आपण या धाडसी प्रवासाला अनुकूल नाहीं, असें सुचविलें.

" पांघरुणें वगैरे खूप घेतलीं, आणि कपडे चांगले घातले, ह्मणजे थंडी कांहीं बाधणार नाहीं . " स्वामींनीं आश्वासन दिलें.

" मला वाटतें बायकांनां इथें ठेवावें, आणि आपण पुरुषांनीं जावें तिकडे. " शास्त्रीबुवा म्हणाले.

" आईला आणि रागिणीला पाहिजे तर इथं राहूंद्या; पण मी आपली तिकडे येणारच ! " उत्तरा ह्मणाली.

" वेड्यासारखं कांहीं तरी करूं नये. " आईसाहेब उत्तरेला दबकावून म्हणाल्या. " रानटी लोकांचे गांव पाहण्यांत काय मोठी एवढी मौज आहे

कुणाला ठाऊक! तें गांव ह्मणजे का तीर्थ आहे, का क्षेत्र आहे, तर हालअपेष्टा सोसून तिथं जायचं? पुरुषांनींसुद्धां ह्मटलं तर जाऊं नये तिकडे; पण त्यांच्यापुढं आपलं काय चालणार बाई? आपण आपल्या इथेंच राहूं!"

अशा रीतीनें आईसाहेब उत्तरेला प्रवासगमनापासून परावृत्त करीत असतां व उत्तरा 'मी आपली जातें,' असें ह्मणत असतां, आनंदरावांनां उत्तरा 'यावी' असें वाटत होतें, का 'येऊं नये' असें वाटत होतें, हें सांगणें कठिण आहे. तिच्याशीं विवाह करावा, कीं, न करावा, याविषयीं तर त्यांच्या मनांत जे परस्परविरोधी विचार येत होते, त्यांचें यथार्थ वर्णन करणें तर केवळ अशक्य होय! सुदैवानें हें वर्णन नाहीं केलें,तरी चालण्यासारखें आहे. उत्तरेचा आग्रह पाहून तिची कुचेष्टा करण्याच्या हेतूनें शास्त्रीबुवा तिला जें ह्मणाले, व त्यानंतर तेथें जें संभाषण झालें, तें दिलें, ह्मणजे आपलें काम झालें!

"खरेंच ह्मणतां तुम्ही आईसाहेब!" शास्त्रीबुवा ह्मणाले. "बायकांचा प्रवास ह्मणजे चुलीपासून वैलापर्यंत असावा! असले धाडसाचे प्रवास कधीं कुणीं बायकांनीं केले आहेत? बायका शिकल्या, ह्मणून त्यांनां असले प्रवास का झेपणार आहेत? उत्तराताई, तुह्मां बायकांचीं हीं कामें नव्हेत! पुरुषांबरोबरीचे हक्क बायकांनां असावेत, असें बायकांनीं सभेंत ह्मणावें पाहिजे तर; पण असले प्रवास आणि शोध करण्याचीं कामें पुरुषांकडेच त्यांनीं सोंपवावींत, हें चांगलें!"

शास्त्रीबुवांची ही कुचेष्टा ऐकून स्त्रीजनाभिमानी उत्तरा ह्मणाली "आह्मी बायकाहि धाडसाचे प्रवास करूं शकतों, हें दाखविण्याकरतांच मी तुमच्याबरोबर येणार! हा प्रवास मीं केला, तर मग मात्र पुरुषांबरोबरीचे हक्क मागण्याचा बायकांनां अधिकार आहे, हें तुह्मी कबूल कराल ना? आई, मला आपली जाऊं दे ग तूं! मी मुळींच दमायची नाहीं, का आजारीहि पडायची नाहीं. तूं आणि रागिणी इथं रहा पाहिजे तर!"

"वा!" रागिणी ह्मणते. "म्हटलं ह्मणजे मलाच जायला कांहीं हरकत नाहीं! थंडीवाऱ्यांनीं माझं बरंवाईट झालं, तर काय मोठंसं वाईट होणार आहे? पण तुझं अजून लग्न व्हायचं आहे, संसार थाटायचा आहे—"

"मला लग्नच करायचं नाहीं मुळीं!" उत्तरा एकदम ह्मणाली.

"तुला वेड लागलं आहे उत्तरे!" आईसाहेब म्हणाल्या. "तिथं जाऊन तुला काय मिळणार आहे? या थंडींत प्रवास करून आजारी पडायचं आहे

वाटतं ? आनंदराव कोणाचं ऐकायचे नाहींत, आणि ही पुरुषमंडळीहि आपल्या ताब्यांतली नाहींत. त्यांनां जाऊंदे 'शोध' करायला वाटेल तिकडे ! आपण आपल्या तोंपर्यंत इथंच राहूं !"

आईसाहेबांची पुढील प्रवासाला परवानगी मिळत नाहीं, असें पाहून उत्तरेनें नानासाहेबांचें मन वळविण्याचा प्रयत्न केला, व त्यांत तिला यशहि आलें. तिनें व सर्व बायकांनींहि 'कारिसेन' गांवाजवळील आपला आश्रम पहावयाला जावें, अशी प्रियब्रम्हस्वामींचीच इच्छा दिसली. 'वाटेंतील प्रवासाची आणि तेथें राहण्याची सर्व व्यवस्था मी आपल्या शिष्यांकडून करवितों,' असें त्यांनीं आश्वासन दिल्यामुळें उत्तरेच्या आग्रहाला बळकटी आली, व उत्तरा जाण्याचें ठरल्यावर आईसाहेबहि कन्याप्रेमानें जावयाला तयार झाल्या,आणि त्या निघाल्या-मुळें रागिणीची विशेष इच्छा नसतां तिलाहि या बेतांत सामील व्हावें लागलें.

जनुभाऊंनां हा धाडसाचा प्रवास पसंत नव्हता; पण कबूल न व्हावें, तर भ्याडपणा पदरीं यावयाचा; अशा पेंचांत ते सांपडले ! 'बायकांपेक्षांहि आपण भ्याड ! छे, जावेंच झालें !' असा विचार करून तेहि या शोधकमंडळीला येऊन मिळाले.

राहतां राहिला टिल्लू ! तो काय हुकुमाचा नोकर ! कोठें जावयाचें, कशाला जावयाचें, हें जेव्हां त्याला जनुभाऊंकडून व आईसाहेबांकडून कळलें, तेव्हां तो जरासा कचरला; पण त्या इमानी नोकरानें 'धन्याची जी अवस्था ती आपली !' असा मनांत विचार केला, व धन्याबरोबर जावयाला तो मनानें तयार झाला. आणि जेव्हां नानासाहेबांनीं त्याला "काय रे टिल्लू, येतोस का आमच्याबरोबर ? का राहतोस इथेंच ?" असें विचारलें, तेव्हां तो उत्साहानें म्हणाला "मी येणार तर ! माझ्याशिवाय तुमचं काम कोण करील ? मी नाय् बा हितं राह्यचा !"

त्याचें हें उत्तर अपेक्षितच होतें; तथापि नानासाहेबांनां तें ऐकून आनंद झाला; व आपल्या गड्याच्या इमानीपणाचें त्यांनां साभिमान कौतुक वाटलें.

वाचकहो ! 'कारिसेन' जातीची जगाला प्रथम माहिती करून देणाऱ्या या शोधकमंडळींत आपण असतों तर बरें झालें असतें, असें तुमच्यापैकीं धाडशी स्वभावाच्या कांहींजणांनां कदाचित् वाटेल; पण या मंडळीवर जीं घोर संकटें गुदरलीं, त्यांचें वर्णन वाचल्यावर आपली ही इच्छा कायम राहील किंवा नाहीं, याची शंकाच आहे ! पण पुढची गोष्ट आधींच घाईनें सांगण्यांत अर्थ काय ?

# प्रकरण सातवें.

## टिल्लूचें भाग्य.

ठरल्याप्रमाणें मंडळी तर निघाली. माहितगार वाटाडे आणि कार्यदक्ष असे स्वामिशिष्य बरोबर असल्यामुळें त्या कठिण पहाडांतूनहि त्यांनां सुगम वाटा मिळाल्या, आणि एकंदरींत त्यांचा प्रवास सुखकर झाला. वाटेंत कित्येक ठिकाणीं आईसाहेबांनां विश्रान्तीकरितां घटका अर्धीघटका खालीं बसावें लागलें, व अखेर तर त्यांनां 'झोंक्यां'त घालून शिष्यांनां उचलून घेऊन जावें लागलें. हा पहाडी 'झोंका' ह्मणजे दुसरेंतिसरें कांहीं नाहीं; तर साधीं दोन धोतरें घेऊन व तीं एकत्र दुहेरी करून त्यांचीं चार टोकें चौघांनीं घ्यावयाचीं, व मध्यें मनुष्याला बसवून त्याला उचलून घेऊन जावयाचें. ओझें उचलण्याचा हाताला भार पडूं नये ह्मणून शिष्यांनीं धोतरांचीं टोकें हाताखालून खांकेजवळून घेऊन तीं खांद्या-वर बांधलेलीं होतीं.

कांहीं वेळानें रागिणीचीहि अशीच उचलबांगडी करून तिला घेऊन जावें लागलें. उत्तरा रागिणीच्या आधींच दमली होती; पण दमल्याबद्दल बायकांच्या अबलत्वाची शास्त्रीबुवा कुचेष्टा करतील, या भीतीनें ती अभिमानी मुलगी दमल्याचें मुळींच बोलली नाहीं! परंतु अखेर तिचे पायच पुढें पाऊल टाकण्याचें नाकारूं लागले, व तिचीहि लवकरच उचलबांगडी झाली!

दमत, थकत, बसत, कसें का होईना, पण मंडळी एकदांची कारिसेन गांवाला येऊन सुखरूप पोहोंचली.

वाटेंतली थंडी आईसाहेबांनां व शास्त्रीबुवांनां थोडीशी बाधली; परंतु एकंदरींत तो प्रवास मंडळीला आनंदकारकच झाला, असें ह्मटलें पाहिजे. या गोष्टीचें बरेंच श्रेय अर्थात्च स्वामींच्या शिष्यांनां व त्यांच्या दूरदर्शीपणाला दिलें पाहिजे. त्यांनीं या मंडळीला वाटेंत कशाचीहि उणीव पडूं दिली नाहीं.

कारिसेन गांवाजवळील स्वामींचा आश्रम लहानसाच–पण टुमदार होता. तो नदीच्या कांठाजवळच होता. त्याच्या आसपास स्वामिशिष्यांनीं एक फुल-बाग केली होती, व ती आपल्या परीनें सुंदर होती. पण या कृत्रिम बागेच्या शोभेपेक्षां त्या आश्रमाभोंवतालची अरण्यश्री किती तरी पटीनें अधिक मनोहर होती! आश्रमाच्या मागल्या दाराशीं उभें राहून नदीकडे पाहिलें, तर 'वारुणी'

नदीचें डावीकडचें लहानसें-पण जोराचें पात्र खडकांच्या अडथळ्यांनां न जुमानतां जवळच्या 'कारिसेन' गांवांतील क्रूर लोकांच्या मनाप्रमाणेंच स्वैर-गतीनें विहार करीत आहे,असें दिसेल; परंतु तेंच पात्र हलकेहलके मोठें होत जाऊन उजव्या बाजूला ऋषीच्या मनाप्रमाणें खोल, शुद्ध, विशाल व शांत झालेलें दृष्टीला पडत होतें. नदीच्या पलीकडे अनेक वृक्षाच्छादित-पण अनत्युच्च गिरिराजि होती, व तींतून अनेक झरे लहान मुलांप्रमाणें धांवत येऊन नदीला कडकडून भेटत होते. आश्रमाच्या पुढच्या बाजूला चारपांच मैलांपर्यंत दाट झाडी होती, व त्याच्या पलीकडे तेजस्वी गिरिशिखरें होतीं. हीं शिखरें अत्युच्च असल्यामुळें हिमाच्छादित होतीं; परंतु त्या पर्वतांच्या खालच्या बाजूला बरीच हिरवी गार झाडी होती. एके ठिकाणीं मात्र शिखरावरून घसरत येणारी बर्फाची नदी होती. त्या हिमनदीकडे पाहून मनाला कधीं आल्हाद व्हावयाचा,तर कधीं भीति वाटा-वयाची, कधीं ईश्वराच्या लीलेचा विचार मनांत येऊन कौतुक वाटावयाचें, तर कधीं त्या प्रचण्ड शक्तीकडे पाहून ' जग हें एक भयंकर कूट आहे, ' असें वाटून मन गोंधळून जावयाचें !

'कारिसेन' हा गांव आश्रमाच्या उजव्या बाजूला तीनचार मैलांवर होता. आश्रमांतून गांवांत जावयाला खडीची सडक अर्थात्च नव्हती; परंतु डाव्या बाजूला हिमाच्छादित देदीप्यमान शिखरें; उजव्या बाजूला स्वच्छजल स्वैरगति नदी; समोर निबिड व हरितशीतल अरण्यश्री; डोकीवर अविरल मनोहर तरुच्छाया; अंगाभोंवतीं वहाणारा वायु किंचित् शीतल, किंचित् सुगंधयुक्त, व वाटेंत मधुनमधून हरतऱ्हेच्या सुवासिक फुलांचा घमघमाट, अशा या देखाव्याचें दृष्टिसुख, स्पर्शसुख व घ्राणसुख घेतघेत आश्रमापासून गांवांत जाणें फारच आल्हाददायक होतें, यांत शंका नाहीं. आतां, खरीच गोष्ट सांगाव-याची ह्मणजे शेवाळ उगवलेल्या वाटेंतल्या मोठमोठ्या दगडांनां ठेंच लागून पडण्याची थोडीशी भीति होती, हेंहि कबूल केलें पाहिजे; तसेंच वाटेंत सर्पदंश होण्याचाहि बराच धोका होता, हें देखील कबूल करणें भाग आहे; आणि कांटेरी आणि खाजाळू लहानलहान झाडांचा अनवाणी चालणारांनां किती उपद्रव होत असे, हें तर सांगण्याची सोयच नाहीं ! परंतु सर्वतोपरी सुखकर अशी गोष्ट कोणती आहे ? एकंदरीनें पाहिलें असतांना त्या आश्रमांत कांहीं दिवस रहाणें फारच मौजेचें होतें, यांत शंका नाहीं.

# टिल्लूचें भाग्य.

" काय रे टिल्लू," जनुभाऊ एक दिवस टिल्लूला ह्मणाले "कसें काय तुला इथें वाटतें ?"

" खाण्यापिण्याचें सगळें ठीक आहे; पण एक मात्र इथें मोठी गैरसोय आहे बुवा !"

" कोणती रे ?" असें विचारून जनुभाऊ त्याच्याकडे मोठ्या आव्यतेच्या प्रेमानें पाहूं लागले, व क्षणभरानें ते त्याला जरा सलगीनें ह्मणाले " बरें, एक विडी तर काढ, टिल्लू !"

" विडीचीच तर मोठी अडचण इथें !" टिल्लू ह्मणाला. "हे स्वामी दूधतूप पुरवतात, पण तंबाखू ह्मणून देत नाहींत ! तुमच्याजवळ असली तर काढा एकादी विडी. आज दोन दिवसांत ओढली नाहीं, बगा."

" अरे, माझ्याजवळचा सगळा सांठा संपलाना ? ह्मणून तर तुझ्याजवळ मी विडी मागतों आहें !"

" तंबाखू नाहीं ह्मणून मीबी फार हैराण झालों आहें, बगा."

"या गांवांत नाहीं का रे मिळत तंबाखू ? मी गेलों होतों काल विचारायला, पण माझें बोलणेंच कुणाला समजेना ! ह्मणून तसाच आलों परत."

"मग आनंदरावांनां कां नाहीं सांगितलेंत विचारायला? त्यांनां तर गांवांतली बोली माझ्याहूनबी सरस कळते ! लई हुषार, बगा आनंदराव !"

"कळेल तर काय झालें ! सकाळ संध्याकाळ गांवांत बसलेले तर असतात ते ! काय रे टिल्लू, गांवांत हे कायरे करीत असतात ?"

" एकसारखे ज्यालात्याला कांहीं ना कांहीं तरी विचारीत असतात, आणि पेन्सलीनें टिपून घेत असतात. विजयगांवाला परत गेल्यावर पुस्तक छापणार आहेत ह्मणे ते ! खरें का हो हें जनुभाऊ? आनंदराव लइ शहाणे झाले ह्मणायचे?"

" कसले शहाणे नि कसलें काय ?" जनुभाऊ तुच्छतेनें ह्मणतात. " या रानटी लोकांची भाषा शिकायची, आणि त्यांनां प्रश्न विचारून त्यांचीं उत्तरें टिपून ठेवायचीं, आणि मग गांवाला जाऊन त्यांचें पुस्तक छापायचें. याच्यांत कसली आली आहे हुषारी नि शहाणपण ? या जंगली लोकांत कशाला राहिली आहे ही मंडळी कुणाला ठाऊक ? लवकर निघाली परत तर ठीक आहे; नाहीं तर मी आपला बुवा जाणार एकटाच परत !"

"लवकरच गेलेलें चांगलें." टिल्लू म्हणाला. "हे लोक लई वाईट आहेत. माझ्यादेखत काल त्यांनीं तिघांनां कटोहांत जाळलें, आणि त्यांचें ते मांस खाणार आहेत म्हणे आज!"

"'कटोह' म्हणजे काय पण?" जनुभाऊंनीं विचारलें.

"त्यांच्या गांवांत आपल्या होळीसारखें दिसत नाहीं का कायसें एक? तोच कटोह. बारा महिने तेरा काळ रात्रंदिवस जळत असतो तो म्हणे! त्याची लई भीति वाटते मला! वर्षांतून हा कटोह पांच तरी मनुष्यांचे बळी घेतो, असें मीं ऐकलें."

जनुभाऊंनींहि टिल्लूच्या या भीतीला पुष्टि दिली. "मला तर या रानटी लोकांची ती मुद्रा आणि त्यांची ती कुऱ्हाड—'फरस' का काय म्हणतात तें—पाहिली, म्हणजे अंगाचा थरकांपच होतो. पण या मंडळींच्या वेड्या आग्रहापुढें माझें कांहीं चालतच नाहीं!"

"कोणाचा एवढा आग्रह आहे?" टिल्लूनें उत्सुकतेनें विचारलें.

"आनंदरावांचा; दुसरा कोणाचा असणार?"

या संभाषणाला एक दिवस झाल्यानंतर टिल्लू संध्याकाळच्या सुमाराला गांवांतून कांहीं सामान विकत घेऊन—पैसे किंवा रुपये देऊन विकत नव्हे, तर त्या जंगली लोकांनां प्रिय असलेले व स्वामिशिष्यांनीं पुरविलेले कांचेचे मणि देऊन विकत घेऊन—नदीच्या कांठाकांठानेंच आश्रमाकडे परत येत होता. त्याचें लक्ष्य सृष्टिसौंदर्याकडे नव्हतें. तो आपल्या मनांत आपल्या घरची व आपल्या म्हाताऱ्या आईची आठवण करीत होता. इतक्यांत त्याच्या पुढें चाललेल्या दोन माणसांपैकीं एकजण "त्या आश्रमांतल्या दोन तरुण पोरींपैकीं कोणती तुला आवडते?" अशा अर्थाचें कांहीं बोलला, आणि तें वाक्य टिल्लूच्या कानांवर गेलें.

त्या दोघांनां आपल्या मागें कोणी येत आहे, ही कल्पनाच नव्हती, म्हणून ते तसेच मोठ्यानें बोलत पुढें गेले. पण टिल्लूनें तें वाक्य ऐकल्याबरोबर त्याला कसेंसेंच झालें! आश्रमांतल्या दोन तरुण पोरी म्हणजे उत्तरा आणि रागिणीच नव्हेत काय? आणि त्यांच्याविषयीं हे रानटी लोक कोण म्हणून विचार करणार? याचा अर्थ काय? ऐकलेलें हें वाक्य आपल्या धन्याला कळवावें काय? बरें, कळवावें, तर असलें वाक्य त्यांच्यापाशीं कसें उघड बोलावयाचें?

या विचारांनीं टिल्लू अगदीं भांबावून गेला, व सावकाशसावकाश व जमिनीकडे पहातपहात चालूं लागला.

चालतांचालतां तो गांवाच्या पाणोठ्याशीं आला, आणि तेथें त्यानें एकाएकीं एक दीन आरोळी ऐकली, व लगेच "मेलें, मेलें," असे करुण शब्द त्याच्या कानांवर येऊन आदळले. डोळे उघडून तो समोर पाहतो, तों पाणोठ्यावरून मातीची घागर भरून घेऊन येत असलेल्या एका तरुण स्त्रीचा एका धटिंगणानें हात धरला आहे, व तिला बळजबरीनें तो ओढून नेत आहे, असें त्याला आढळून आलें! लगेच टिल्लू त्या जंगली स्त्रीकडे धांवत गेला. तेथें जाऊन तो पाहतो, तों दोन फरस खालीं पडलेले असून एका जंगली मनुष्याचें मस्तक धडापासून तुटून वेगळें पडलें होतें, व तेथील जमीन रक्ताच्या ओहोळानें लाल झाली होती!

टिल्लूला पाहिल्याबरोबर ती तरुण मुलगी आपणाला सोडविण्याविषयीं टिल्लूला विनवूं लागली. या तरुणीविषयीं त्या दोघां तरुणांमध्यें मारामारी झाली असावी, व त्या मारामारींत विजयी झालेला 'वीर' हिला बळजबरीनें ओढून नेत असावा, असें टिल्लूनें ताडलें, व तो तिला सोडविण्याकरितां त्या नीच धटिंगणाच्या अंगावर धांवून गेला. आधींच तो नीच आपल्या पूर्वीच्या शत्रूच्या जखमांनीं अर्धवट घायाळ झाला असल्यामुळें, टिल्लूला संकटांत सांपडलेल्या त्या पोरीला ताबडतोब सोडवितां आलें, हें खरें; परंतु लगेच त्याच्या अंगावर तो कामान्ध जंगली मनुष्य फरस घेऊन धांवत आला, आणि त्या दोघांची आतां चांगलीच मारामारी सुरू झाली!

टिल्लूच्या हातांत लांब सोट्या असल्यामुळें त्याच्या शत्रूच्या फरसाचें कांहीं चाललें नाहीं. कांहीं वेळ सोट्याची व फरसाची कडकड झटापट झाल्यावर टिल्लूच्या सोट्यानें एकदम तो फरस हातांतून पाडला, व सोट्या विजयी झाला! पण इतक्यांत त्या चपल जंगली मनुष्यानें टिल्लूची कंबर धरली, व ती जोरानें दाबून टिल्लूला वांकवीतवांकवीत त्यानें त्याला पाठीवर दाणदिशीं खालीं पाडलें, व त्याच्या छातीवर बसून जवळचा फरस घेण्याकरितां तो खटपट करूं लागला. टिल्लू आपल्याकडून उठण्याची खटपट करीत होताच; परंतु छातीवर बसलेला जंगली तरुण त्याच्या मानानें फारच भारी होता! त्यानें आपल्या फरसानें टिल्लूचे कांकडीसारखे दोन तुकडे केले असते. पण

टिल्लूची आयुष्याची दोरी बळकट होती, म्हणून त्या तरुण स्त्रीला वेळेवर बुद्धि सुचून व धैर्य येऊन तिनें जवळच पडलेला दुसरा फरस उचलला, व एकदम त्या धटिंगणावरच जोरानें मारला. घाव विशेष जोराचा किंवा सफाईदार नव्हता; पण तो त्या नीचाला खालीं आणावयाला पुरेसा झाला. तो कामांध नरपशु खालीं पडल्यावर त्या जंगली स्त्रीनें फरसाचा पुनः एक घाव करून आपल्या शत्रूचे प्राण आपल्या हातानें घेतले !

टिल्लूला हें क्रूर कृत्य विशेष आवडलें नाहीं. पण त्या नरपशूला जर त्या स्त्रीनें मारलें नसतें, तर त्यानें आपणालाच ठार केलें असतें, असा विचार मनांत येऊन त्याला त्या तरुण पोरीच्या कृत्याचें विशेष वाईटहि वाटलें नाहीं. वाईट न वाटण्याचें कारण कदाचित् दुसरेंहि एकादें असेल ! ती तरुण पोर जरी जंगली व काळी होती, तरी तिच्यांत एक प्रकारचें मोहक लावण्य होतें. टिल्लू तर तिच्याकडे टक लावून पहातच राहिला, आणि चमत्कार असा, कीं, तीहि टिल्लूकडे उपकारबद्धदृष्टीनें-प्रेमदृष्टीनेंच म्हटलें तरी चालेल—पहात राहिली. अशा मधुर स्थितींत त्या पोरीनें आत्मसंरक्षणार्थ केलेल्या निर्दय कर्माचें टिल्लूला विशेष वाईट वाटणें शक्य तरी होतें काय ? असो.

टिल्लूला त्या रानटी तरुणीची भाषा विशेष कळत नव्हती; म्हणून त्या दोघांमध्यें त्या वेळीं फारसें संभाषण झालें नाहीं. पण प्रेमाची भाषा शब्दांशिवाय अर्थबोध करूं शकते, हें तत्त्व वाचकांनां ठाऊक आहेच !

टिल्लू लवकरच आश्रमाकडे यावयाला निघाला, व तीहि—तिचें नांव 'किनरी' होतें, असें झालेल्या अल्पशा संभाषणांत टिल्लूला कळलें—आपल्या मार्गानें गेली; पण तिच्या मनांत एकसारखा टिल्लू घोळत होता, व टिल्लूच्या डोळ्यांसमोर एकसारखी किनराचीच मूर्ति दिसत होती.

दुसऱ्या दिवसापासून टिल्लू गांवांत भाजीपाला आणावयाला आल्यावर तिच्या म्हाताऱ्या बापाच्या दुकानांतून तो कांहीं तरी भाजी विकत घेऊन जावयाचाच, व त्याच्याबद्दल त्याला मोठेमोठे कांचेचे मणी द्यावयाचा ! टिल्लू घरांतून बाहेर पडल्यावर " यानेंच मला वांचविलें, " असें किनरीनें एक दिवस आपल्या बापाला सांगितलें, व नंतर त्यानें दुसऱ्या दिवशीं टिल्लूला सर्व हकीकत विचारली, आणि टिल्लूनें ती मोठ्या अभिमानानें मोडक्यातोडक्या भाषेंत त्या म्हाताऱ्याला सांगितली.

ही हकीकत ऐकून तो म्हातारा आपल्या भाषेंत त्याला म्हणाला "ते दोघे फारच वाईट होते. माझ्या मनांतून त्यांपैकीं कोणालाहि मुलगी द्यायची नव्हती; परंतु ते माझें कोठले ऐकायला? एकमेकांशीं अखेर ते लढलेच, व तिला तो जाडगेलासा धटिंगण जबरदस्तीनें घेऊन जाणार होता; इतक्यांत तूं आलास म्हणून बरें झालें. मुला, तुझे माझ्यावर फार उपकार आहेत. त्या दुष्टांनां मारून मला तूं प्राणदान दिलेंस, असेंच मी समजतों. मनुष्य माझ्यासारखा म्हातारा झाला, आणि त्याला मुलगा किंवा तसाच जवळचा कोणी नातलग नसला, म्हणजे त्याच्या मुलीची अशीच दुर्दशा व्हायची! मला मुलगा असता तर आज हा अपमान—"

म्हाताऱ्याच्यानें पुढें बोलवेना. टिल्लूनें त्याचें आपल्या बुद्धीप्रमाणें समाधान करण्याचा प्रयत्न केला, व तो थोडाफार सिद्धीलाहि गेला. त्या म्हाताऱ्याला टिल्लू फार प्रिय होऊं लागला. त्या दोघांचें त्याच दिवशीं बरेंच संभाषण झालें, असें नव्हे; तर त्यानंतर पुढेंहि रोज टिल्लू कांहीं ना कांहीं तरी निमित्त करून म्हाताऱ्याशीं पुष्कळ वेळ बोलत बसत असे, व चमत्कार असा, कीं, किनरीलाहि टिल्लू त्यांच्या घरीं आल्यावर त्याच वेळीं नेमकें बाहेरच्या पडवींतलेंच काम मिळत असे!

प्रकरण आठवें.

## आनंदरावांची माहिती.

वारुणी नदीकांठच्या मठांत येऊन मंडळींनां पंधराएक दिवस झाले, व हे दिवस त्यांनां फारच सुखाचे गेले. नरमांसभक्षक जंगली लोक त्रास देतील, किंवा कदाचित् ठारहि मारतील, अशी जनुभाऊंनां व आईसाहेबांनां जी भीति वाटत होती, ती खोटी ठरली.

प्रियब्रह्मस्वामींवर व त्यांच्या शिष्यांवर त्या जंगली लोकांची भक्ति होती, ह्मणून कदाचित् त्यांनीं या आपल्या मंडळींनां त्रास दिला नसेल; किंवा कदाचित् याचें श्रेय या मंडळीच्याच सरळ व सौम्य वर्तनाकडे असेल. त्या रानटी लोकांजवळून घेतलेल्या जिनसांबद्दल त्यांनां प्रिय असलेले कांचेचे हिरवे-निळे-पांढरे मणी मोबदल्याबद्दल देत असत, व त्या लोकांशीं औद्धत्यानें कधींहि वागत नसत. त्या जंगली लोकांचीं जीं लहानलहान मुलेंबाळें आश्रमाजवळ जमत असत, त्यांनां ही मंडळी उरलेलेसुरलेले खाण्याचे पदार्थ देत असत, व त्यांच्याशीं हिडिसफिडिस कधींहि करीत नसत. मंडळीला त्रास न पोहोंचण्याचें कारण कांहींहि असो; एवढी गोष्ट खरी, कीं, त्यांचे ते पंधरावीस दिवस फारच मजेंत व आनंदांत गेले.

आनंदरावांचे तर हे दिवस दिव्यानंदांतच गेले, असें म्हणावयाला फारशी हरकत नाहीं. उत्तरेचा मोह बहुतेक झुगारून देऊन या कारिसेनी जातीच्या धर्माची, राज्यपद्धतीची, चालीरीतींची, भाषेची वगैरे माहिती ते उत्साहानें मिळवूं लागले. त्यांनीं जमविलेल्या माहितीनें त्यांचीं पांचसहा नोटबुकें भरून गेलीं. बहुतेक सारा दिवस ते या माहितीच्या पाठीमागें असत, व दुपारीं चहा पितांना किंवा रात्रींच्या शिळोप्यांच्या गप्पांच्या वेळीं ते दिवसभर मिळविलेल्या माहितींतील निवडक गोष्टी सर्वांनां सांगत असत. ही माहिती नेहमींच मनोरंजक किंवा बोधप्रद असे, असें जरी नसलें, तरी आनंदरावांनां ती सांगतांना फारच उत्साह वाटत असे, आणि त्यांचें विशेष भाग्य असें, कीं, त्यांच्या उत्साहाला अनुरूप अशाच उत्सुकतेनें ऐकणारा त्यांनां एक तरी श्रोता मिळत असे. हा श्रोता -अथवा ही श्रोत्री-कोण, हें वाचकांनां सांगण्याची जरूर नाहीं!

"आज काय माहिती मिळविली आहे?" शास्त्रीबुवा एक दिवस आनंदरावांनां ह्मणाले. "त्यांच्या धर्माची कांहीं नवीन माहिती मिळाली आहे का?"

## आनंदरावांची माहिती.

" धर्मांची आज नवीन माहिती कांहीं नाहीं, " आनंदराव ह्मणाले. " पण त्यांच्या राज्यपद्धतीच्या कांहीं मनोरंजक गोष्टी आज कळल्या. "

" शंभर झोंपड्यांच्या या लहानशा खेडेगांवाला कसली आली आहे राज्य-पद्धति ? " उत्तरेनें विचारलें.

" हें गांव लहान आहे खरें, " आनंदरावांनीं उत्तर दिलें. " पण हें एक लहानसें राष्ट्रच आहे. आमच्या माहितीवरून माझा असा अंदाज धांवतो, कीं, हे लोक ह्मणजे मूळचे आर्य असून ते कांहीं दिवस तिबेटांत राहून मग या हिमालयांतल्या कोंपऱ्यांत रहायला आले असावेत. हे आतां रानटी व नरभक्षक झाले आहेत; पण यांच्यामध्यें पूर्वीच्या आर्य लोकांचे शब्दच नव्हे, तर चालीहि दिसत आहेत. उदाहरणार्थ, या लोकांत लोकांच्या तरुण मुली बळ-जबरीनें पळवून आणणें वाईट समजलें जात नाहीं. यांच्यामध्यें अनेकपत्नीत्व आहे. भाषेवरून तर हे लोक मूळचे आर्य होते, हें स्पष्टच होतें."

" भाषेवरून काढलेलीं अनुमानें सर्व चुकीचीं असतात, " भाऊसाहेब ह्मणाले, व त्याला शास्त्रीबुवांनीं अनुमोदन दिलें.

" माझें अनुमान कदाचित् चुकीचें असेल !" आनंदराव ह्मणाले. " मला-सुद्धां एकाद वेळेला असें वाटतें, कीं, हे रानटी लोक कोरिआंतून इकडे आले असावेत. त्यांचे शब्द व कांहीं नांवें जपानी नांवांसारखीं दिसतात."

"हा शुष्क वाद तज्ज्ञ लोकांनीं आपल्या पुस्तकांतून करावा. आमच्या पुढें कशाला ही कटकट ? आह्मांला आतां आजची नवीन माहिती ऐकायची आहे." रागिणी ह्मणाली.

" नवीन माहिती आज बरीच आहे. एका चलाख माणसानें आज फारच महत्त्वाची हकीकत मला सांगितली. हा गांव एका 'किनतोबा'च्या ताब्यांत आहे. 'किनतोबा' ह्मणजे 'गांवाचा राजा.' हा शब्द जपानी भाषेवरून आलेला दिसतो. किनतोब्याची जागा वंशपरंपरा एकाच कुळांत नसते. या क्रूर व शूर जातींत जो विशेष शूर, कावेबाज किंवा अक्कलवान् असेल, त्यालाच ही जागा मिळते. हा या गांवचा अनियंत्रित सत्ताधीश दिसतो. पण महत्त्वाच्या बाबतींत लोकांच्या मनाविरुद्ध जाण्याची या ' किनतोब्या'चीहि छाती नसते. या जातीच्या गांवांतल्या कटोहाजवळ सभा होतात—"

" 'कटोह' ह्मणजे गांवातली ती होळी ना ? " रागिणीनें विचारलें.

"हो, या कटोहाभोंवतीं लोकांची बहुधा रात्रीं मोठी सभा भरते. या सभेला ते 'दर्गा' ह्मणतात. आपल्या तिकडच्या सभेंतल्याप्रमाणें अध्यक्ष नेमणें, मत घेणें इत्यादि प्रकार या दर्ग्यात नसतात. ज्याला जें सुचेल तें त्यानें पाहिजे तसें बोलावें, हा या सभेचा प्रकार. बायकासुद्धां या सभेंत येऊन बसतात. लोकांनां एकादी गोष्ट आवडते किंवा नाहीं, हें जयघोषावरून वगैरे ओळखायचें ! या जातींतल्या तंट्याचा निकाल या दर्ग्यांतच होतो. एकादा मनुष्य गुन्हेगार ठरला, कीं, त्याचे हात लगेच 'फरसा' नें कापून टाकतात, नाहीं तर त्याला बहुधा त्या जवळच्या कटोहांतच एकदम टाकून देतात, व त्याचें मांस खिरापतीसारखें वांटून घेऊन खातात !"

"ही पद्धति फार क्रूरपणाची दिसते खरी; पण निकालाला विलंब लागत नाहीं, ही त्यांतल्या त्यांत समाधानाचीच गोष्ट आहे!" वकिलीचा पूर्ण अनुभव असलेले नानासाहेब मध्येंच ह्मणाले.

"या सभेचा हा सर्व प्रकार प्रत्यक्ष डोळ्यांनीं पहायची माझी इच्छा आहे." आनंदराव उत्साहानें ह्मणाले. "योगायोग येईल तेव्हां खरा. एकाददिवशीं रात्रीं गांवांत जाऊन हा रानटी दर्गा पहावासा वाटतो मला."

"तेवढं मात्र करूं नका हो !" आईसाहेब ह्मणाल्या. "अति शहाणा त्याचा बैल रिकामा !"

आईसाहेबांची ही भीति पुरुषांनां हास्यास्पद वाटली; पण बायकांनां— उत्तरेलासुद्धां—बरीच सयुक्तिक भासली, हें मानसशास्त्रदृष्ट्या ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. पुरुषमंडळींनीं—विशेषतः शास्त्रीबुवांनीं बायकांच्या भित्र्या स्वभावाची बरीच कुचेष्टा केली, व नंतर आनंदरावांनीं या नरमांसभक्षक लोकांच्या चालीरीतींचें वगैरे बरेंच वर्णन केलें.

हें वर्णन संपून त्यावर मंडळीची चर्चा चालतांचालतां संध्याकाळ होऊन गेली, व आईसाहेब दिवे आणण्याकरितां आश्रमांतल्या आंतल्या खोलींत गेल्या. तेथें त्यांनां टिल्लू भेटला, व त्या दोघांचें कांहींसें संभाषण झाल्याबरोबर आईसाहेबांचें तोंड एकदम उतरलें.

त्या लगेच टिल्लूला घेऊन, मंडळी जेथें बसली होती तेथें आल्या, व "आम्ही बायका भित्र्या, ह्मणून हंसलेतना शास्त्रीबुवा? आतां ऐका टिल्लू काय ह्मणतो आहे तें !" असें दुःखित अंतःकरणानें—परंतु किंचित् अभिमानमूलक आनंदानें ह्मणाल्या.

# आनंदरावांची माहिती.

" काय बातमी आहे, टिल्लू ?" नानासाहेबांनीं हंसतहंसत विचारलें. टिल्लूनें कांहींच उत्तर दिलें नाहीं.

"बायकांनां पळवून न्यायचा गांवांत गुप्त बेत चालला आहे, अशी बातमी यानें आणली आहे," असें आईसाहेबांच्या तोंडूनच मंडळीला कळलें, व आईसाहेबांचें ह्मणणें खरें आहे, हें टिल्लूनें आपल्या चर्येनें व अल्पशब्दक उद्गारांनीं कळविलें.

" तुला रे कुणीं ही गुप्त बातमी सांगितली ? ' भाऊसाहेबांनीं विचारलें.

टिल्लू कांहींच बोलला नाहीं; पण जरासा ओशाळला–अथवा 'लाजला' असेंच ह्मटलें तर यथार्थ होईल.

" त्यांचा गुप्त बेत टिल्लूला समजायला बसला आहे!" आनंदराव ह्मणाले.

टिल्लू यावर कांहींच बोलला नाहीं, असें पाहून शास्त्रीबुवा त्याला गोंजारून ह्मणतात "काय रे, टिल्लू, खरेंच सांग, तुला कुणीं ही गुप्त बातमी सांगितली ? आणि तूं आज गांवांत कशाला रे गेला होतास ? आज भाजीबिजी तर कांहींच आणायची नव्हती."

" मी आपला उगाच गेलों होतों गांवांत. तिथें मला समजलें—"

"अरे, पण समजलें कसें? कुणीं पांखरांनीं तुझ्या कानांत सांगितलें वाटतें?"

" मी आपल्या त्या ह्मातार्‍याकडे गेलों होतों, तिथें मला समजलें."

" त्या म्हातार्‍यानें सांगितलें होय तुला ? " नानासाहेबांनीं विचारलें.

" ह्मातार्‍यानें नाहीं," टिल्लू भोळेपणानें ह्मणाला.

" मग कुणीं–त्याच्या मुलीनें होय ?" शास्त्रीबुवा एकदम बोलून गेले. हा प्रश्न ऐकल्याबरोबर टिल्लूहि लाजला, आणि त्या सूचक लज्जेनें टिल्लूचें सर्व गुह्य चव्हाट्यावर आणलें ! टिल्लूला गुप्त बातम्या सांगणारें माणूस कोण, व तो काम नसतांनाहि गांवांत वारंवार कां जात असतो, हें सर्व त्या वेड्या व लुच्या लज्जेनें त्या मंडळीला शब्दाशिवाय एका क्षणांत सांगितलें !

आपल्या चाकरानें गांवांतल्या एका कुमारीशीं सलगी करावी, हें नानासाहेबांनां बरें वाटलें नाहीं. टिल्लूला तिच्याशीं लग्न करावयाला सांगावें, आणि लग्न करावयाचें नसल्यास तिच्याशीं सलगी करण्याचें सोडून देण्याविषयीं त्याला चांगलें बजावून सांगावें, असा त्यांनीं मनाशीं निश्चय केला. पण याच वेळीं

त्याचें मन दुखविणें योग्य नाहीं, असा विचार करून त्या समंजस व कोमल हृदय नानासाहेबांनीं बायकांनां पकडून नेण्यासंबंधाच्या बातमीचीच त्या वेळीं चर्चा चालविली.

ती बातमी अर्थात्च त्यांनां खोटी वाटली. "तसा जर गुप्त बेत असता, तर तो बाहेर सांगण्याइतके हे रानटी लोक कांहीं मूर्ख नाहींत !" भाऊसाहेब ह्मणाले, व आनंदरावांनीं तर या कल्पनेची पुरी टरच उडविली !

परंतु आईसाहेबांनां, रागिणीला व उत्तरेला या बातमीनें फार घाबरवून सोडलें. आईसाहेब तर "इथून निघून जाऊं या," असें आग्रहानें ह्मणूं लागल्या. रागिणीहि आपल्या परीनें तसेंच सुचवूं लागली. उत्तरचें मन मात्र या स्थितींत फारच गोंधळून गेलें. तिचें एक मन निघून जावयाला सांगत होतें, तर दुसरें मन आनंदरावांनां सोडून जाऊं नये, असें सुचवीत होतें. त्यांतच पुनः मित्रपणाबद्दल शास्त्रीबुवांच्या कुचेष्टेची भीति ! पण ही स्थिति फार वेळ राहिली नाहीं. आनंदरावांची महत्त्वाकांक्षा तिला ठाऊक होती. आपणाला प्रिय व पूज्य असलेल्या आनंदरावांनीं देशप्रीतीनें एकादें काम अंगीकारावें, व त्यांच्या पवित्र व उच्च कार्याच्या आड आपण भ्याडपणें यावें,हा विचार उत्तरेला अप्रिय झाला,आणि तीहि बाह्यतः टिल्लूची बातमी लक्ष्यांत घेण्यासारखी नाहीं, असें प्रतिपादूं लागली !

बराच वेळ वाटाघाट होऊन आनंदरावांकरितां आणखी आठदहा दिवस तेथेंच रहाण्याचें मंडळीनें ठरविलें. या प्रश्नाचा निकाल लागल्यावर दुसऱ्या गप्पागोष्टी निघाल्या. बोलतांबोलतां नानासाहेबांनीं टिल्लूच्या लग्नाचा आपल्या मनांत घोळत असलेला प्रश्न अर्धवट विनोदानें काढला, व त्याला हंसतहंसत सहज विचारलें "काय रे, टिल्लू, तुझें यंदां लग्न करून द्यावेंसें मला वाटतें आहे; घेतोस का करून ?"

"माझें कसलें आलें आहे लगीन् ?" टिल्लूच्या मुखांतून असे शब्द अस्पष्ट रीतीनें बाहेर पडले. "मला नको बा लगीन्बिगीन् !"

"कां रे ?" भाऊसाहेबांनीं विचारलें.

"बायकोचें पोट कसें भरावें मीं ?"

"अरे त्याची काळजी नको तुला. आमच्याकडे तिला कामाला राहूं दे, ह्मणजे झालें." नानासाहेब ह्मणाले.

# आनंदरावांची माहिती.

हें ऐकून आईसाहेब लगेच म्हणाल्या “ नाहीं तरी आपल्याला कामाला एक बाई आतां ठेवलीच पाहिजे. मला आतां पूर्वीसारखं काम उरकत नाहीं.”

“पण बायको मिळाली पाहिजे ना ?” शास्त्रीबुवा ह्मणाले “टिल्लू पुष्कळ लगीन करून घेईल; पण बायको मिळेल तेव्हां ना ?”

“बायकांनां काय तोटा आपल्या हिंदुस्तानांत ! ” नानासाहेब ह्मणाले. “हिंदुस्तानांत दुसरीं कांहीं दुःखें असोत–पण बायकांचें मोठें सुख आहे बुवा ! ह्माताऱ्या, रोगी, कुष्टी मनुष्याचेंमुद्धां आपल्या देशांत सहज लग्न होतें !”

यावरून ‘ यूरोपियन विवाहपद्धति चांगली का आपली चांगली ? ’ हा प्रश्न निघाला, व पुष्कळ वादविवाद होऊन या प्रश्नाचा कांहींएक निकाल न होतां मंडळी लवकरच झोंप घेण्याच्या तयारीला लागली.

टिल्लूला त्या रात्रीं झोंप मुळींच आली नाहीं. किनरीशीं लग्न करावें काय ? हा प्रश्न त्याच्या डोक्यांत सारखा घोळत होता. असो. उजाडल्याबरोबर कामाचें कांहीं तरी निमित्त करून तो गांवांत गेला,व किनरीच्या वृद्ध पित्याकडे जाऊन त्यानें बोलतांबोलतां लग्नाची गोष्ट काढली. त्या ह्माताऱ्याचें टिल्लूवर प्रेम बसलें असल्यामुळें त्यानें विशेष आढेवेढे न घेतां लग्नाला ताबडतोब रुकार दिला. किनरीचा रुकार तर बरेच दिवसांपासून होताच.

थोडक्यांतच हें आख्यान आटोपण्याकरितां, टिल्लूनें आईसाहेबांकडून ही गोष्ट नानासाहेबांच्या कानांवर घातली, व लवकरच त्या आश्रमांत या प्रेमबद्ध वधू-वरांचें शास्त्रीबुवांनीं लग्न लावून दिलें, हें एकदमच सांगून टाकतों.

लग्न झाल्यानंतर किनरी या मंडळीकडेच रहावयाला आली, व ती लवकरच थोडीथोडी मराठी भाषाहि समजूं व बोलूं लागली. टिल्लूला तिच्या निकट-सान्निद्ध्यानें तिची ‘किराडी’ भाषा चांगली येऊं लागली. आनंदरावहि तिच्याशीं मुद्दाम बोलणें काढून तिच्याशीं ‘ किराडी ’ भाषेंतच बोलण्याचा प्रयत्न करीत. या प्रयत्नांत त्यांनां विशेष यश जरी आलें नाहीं, तरी त्यांनां त्या भाषेंतील शब्दांची, प्रत्ययांची व व्याकरणाची बरीच माहिती झाली. या माहितीवरून त्यांनीं असा सिद्धान्त बांधला, कीं, हे रानटी लोक ह्मणजे मूळचे सिंधुनदीच्या कांठचे आर्य लोक असून ते आर्यावर्तांतून निघून तिबेटांत व नंतर चिनांत गेले असावेत, व तेथून ते पुनः परतून तिबेटांतून

हिमालयावर रहावयाला गेले असावेत. या शोधांचा वास्तविक या गोष्टीशीं संबंध नाहीं, ह्मणून त्यांची सविस्तर चर्चा येथें केलेली नाहीं. शिवाय, अशा प्रकारचे शोध, त्यांच्या चालीरीतींविषयींची माहिती, इत्यादि गोष्टी जिच्यामध्यें ग्रथित केलेल्या आहेत, अशी आनंदरावांची डायरी आमच्याजवळ असल्यामुळें व ती लवकरच आह्मी प्रसिद्ध करणार असल्यामुळें ही चर्चा येथें करणें मुळींच क्षम्य होणार नाहीं. ज्यांची या विषयांबद्दलची जिज्ञासा अतिशयच तीव्र असेल, त्यांनीं पाहिजे तर आमच्याजवळची डायरी पहावी, एवढें सुचवून कथानकाच्या ओघाकडे वळतों.

## प्रकरण नववें.

## आनंदरावांचें मनोगत.

आईसाहेबांनां वारुणीकांठच्या आश्रमांत रहाणें जरी विशेष आवडत नव्हतें, तरी त्यांनां अलीकडे एका गोष्टीमुळें बरेंच समाधान होत होतें. आनंदरावांच्या व उत्तरेच्या वृत्तींमध्यें आणि वर्तनामध्यें आईसाहेबांच्या प्रेमदृष्टीला अभिनंदनीय फरक दिसूं लागला होता. "एकदंरींत आपला हेतु साध्य होणार म्हणायचा!" त्या मनांत ह्मणाल्या. "उत्तरेचं लगीन झालं, म्हणजे मग मला कांहीं काळजी उरली नाहीं. ईश्वराची मर्जी आहे–होईल तेव्हां खरं!" या भावि विवाहाचीं सुचिन्हें दिसूं लागल्यापासून आईसाहेबांनां जो आनंद झाला, त्यामुळें त्या कोंपऱ्यांतल्या मठींतील रहाणीच्या अडचणींचेंहि त्यांनां विशेष कांहीं वाटेनासें झालें.

आनंदरावांची स्थिति मात्र अलीकडे याच्या उलट झाली होती. उत्तरेचे विचार मनांत वारंवार येऊं लागल्यामुळें 'किराडी' भाषेचा वगैरे त्यांचा अभ्यास मंदावूं लागला, व त्यांनीं लावलेल्या शोधांची निःसंशय सत्यता सिद्ध करणारा पुरावा जमविण्याचें त्यांचें कामहि ढिलें पडूं लागलें. नवे शोध लावण्याची अशी संधि मनुष्याच्या जन्मांत वारंवार येत नसते, हें ते जाणून होते, व आपला उत्साह व आपले परिश्रम मंद होत चाललेले पाहून त्यांनां फार वाईट वाटत होतें. "आळस केव्हांहि वाईटच!" ते मनांत म्हणाले. "पण अशा वेळीं तर तो अगदीं अक्षम्य आहे. अशा वेळीं कोमल, गोडगोड, बायकी विचारांत वेळ दवडणें ह्मणजे कर्तव्यभ्रष्ट होणें होय. ज्याच्या हृदयांत कर्तव्यनिष्ठेची व देशाभिमानाची यत्किंचित् तरी चाड असेल, त्याला तर हें मुळींच शोभत नाहीं!"

आनंदरावांनां हें सर्व समजत होतें. पण मनुष्याचें मन चंचल, दुर्निग्रह व प्रमाथि आहे, असें जें ह्मटलें आहे, तें खोटें का? त्यांनां सर्व गोष्टी समजत होत्या, पण त्यांचें दुर्निग्रह मन त्यांनां बळजबरीनें उत्तरेकडे खेंचून नेत होतें. उत्तरेविषयीं त्यांच्या हृदयांत उत्पन्न झालेला कोमल भाव देशाभिमानाच्या महत्त्वाकांक्षेला आणि वाङ्मयात्मक जिज्ञासेला तेथें सुखानें राहूं देत नव्हता. शांतपणें विचार करीत असतां उत्तरेशीं विवाह न केलेलाच बरा, असें त्यांनां वाटावयाचें; परंतु कांहीं मिनिटांनीं त्यांच्या मनांत पुनः असा विचार यावयाचा, कीं, "उत्तरा आपल्या कार्याच्या आड मुळींच यायची

नाहीं. ती आपल्याइतकीच देशाभिमानी आहे, तिचें मन उदार आहे, व ती समंजस आणि बुद्धिमान् आहे. '**गृहिणी सचिवः सखी मिथः**' या कोटींतली उत्तरा गृहिणी होईल." पण पुनः त्यांची प्रबल जिज्ञासा व महत्त्वाकांक्षा असें सुचवावयाची, कीं, येथील माहिती मिळविल्यानंतर मानससरोवरावर जावें, व तेथून उतरून मग तिबेटांत जावें, आणि 'प्रवासी–शोधक' ह्मणून आपलें नांव हिंदुस्तानच्या इतिहासांत करून ठेवावें. पण उत्तरेनें–मानसिक उत्तरेनें–आनंदरावांचा अखेर फारच पिच्छा पुरविला, व ते अगदीं हताश, निरुत्साह होऊन तिच्याच स्वाधीन होण्याच्या बेतांत आले. " ईश्वरा, तूं मला एकंदरींत संसारांत गोंवणारच म्हणायचें ! तुझी मर्जी, दुसरें काय ? ईश्वरा,–पण 'ईश्वर,' 'ईश्वर' करण्यांत काय अर्थ आहे ? लग्न करणें न करणें माझ्या हातांत आहे ना ? ईश्वराला उगाच दोष देण्यांत कांहीं अर्थ नाहीं; आणि मला स्वतःला तरी मीं कां दोष लावून घ्यावा ? उत्तरा मला रेशमी दोरानें ओढीत आहे, व बाहूंत कवटाळूं पहात आहे, आणि ईश्वर–सदा कामसहाय असलेला ईश्वर–तिच्याकडे मला ढकलीत आहे ! या दोघांच्यापुढें माझें काय चालणार ? पण उत्तरे ! सोड, सोड, मी तुझा नाहीं. जगांत जन्माला येऊन लग्न करून घेण्यापेक्षां अधिक महत्त्वाचीं कृत्यें आहेत. काय ह्मणतेस ? 'मी तुमच्या महत्त्वाकांक्षेच्या आणि देशाभिमानाच्या आड येणार नाहीं' ह्मणून ? खोटें बोलते आहेस ! नाहीं, नाहीं, मीच चुकलों–तूं कधीं खोटें बोलायची नाहींस !"

अशा प्रकारचा आनंदरावांच्या मनांत अंतःक्षोभ चालल्यामुळें ह्मणा, किंवा भाषा वगैरे शिकण्याच्या फाजील श्रमांमुळें ह्मणा, अथवा ईश्वरेच्छेमुळें किंवा दैवगतीमुळें ह्मणा, आनंदराव याच सुमाराला एकाएकीं तापानें आजारी पडले, व ताप विकोपाला जाऊन अनर्थ होण्याचा प्रसंग आला. सगळ्यांच्या तोंडचें लगेच पाणी पळालें. आनंदरावांचीं नोटबुकें व त्यांच्या डायऱ्या वगैरे पाहून नानासाहेबांच्या हृदयांत कळवळून येई, व डोळ्यांत अश्रुबिंदु येत ! 'या डायऱ्या लिहिणारा आत्मा त्यांच्याप्रमाणेंच मूक व निर्जीव होणार काय ? सर्व जग आक्रमूं पाहणारा महत्त्वाकांक्षी जीव आतां मूठभर मातींत मिळणार काय ? आनंदरावांचा ग्रंथ छापून बाहेर पडण्यापूर्वीच त्यांच्या जीवितग्रंथाची परिसमाप्ति होणार काय? जीवित हें नश्वर आहे व सुखासक्त मनुष्यच मूर्ख होय, यांत शंका नाहीं !'

मनांत वाईट व अभद्र विचार येऊं नयेत; पण असले विचार त्या मंडळींच्या मनांत येत,त्याला त्यांचा काय उपाय? विचार कोणाच्या स्वाधीन आहेत काय?

## प्रकरण दहावें.

## जंगली खलबत.

आमची ही प्रवासी मंडळी आनंदरावांच्या प्रकृतीसंबंधानें फिकिरींत असतां त्या आश्रमाजवळ दुसरीकडे निराळीच ‘ चिंता ’ चाललेली होती. गांवाबाहेर वारुणी नदीच्या कांठीं दोन कृष्णवर्ण जंगली पुरुष अर्धवट गुप्त संभाषण करीत होते. दोघेहि बहुतेक अर्धनग्न होते; पण त्यांचें अंग निरनिराळ्या रंगांच्या लेपांनीं चित्रित केलें असल्यामुळें त्यांचीं अर्धनग्न–पण तेजस्वी कृष्णशरीरें विद्रूप दिसत नव्हतीं. दोघांचे तिरकमठे व पिसें लावलेल्या तीरांचे भाते त्यांनीं शिकारींत मारलेल्या पशूंप्रमाणें, व पांखरांप्रमाणें आतां जमिनीवर लांब पसरले होते, व त्यांचे तीक्ष्ण फरसहि जवळच चकाकत होते. त्यांपैकीं एकजण वयानें पन्नासपंचावन वर्षांचा असावा, व दुसरा त्याच्या मानानें बराच तरुण होता.

हा वृद्ध मनुष्य ह्मणजे त्या गांवचा राजा किनतोबाच होता. त्याचें कपाळ विशाल होतें, नाक गरुडासारखें लांब व अणकुचीदार होतें, आणि डोळे कावळ्यासारखे तीक्ष्ण होते. त्याच्या उंच, सडपातळ, पीळदार शरीराकडे, व भव्य, तेजस्वी, उग्र किंबहुना क्रूर मुद्रेकडे पाहिलें, ह्मणजे हा आपल्या तारुण्यांत मोठा शूर व धाडसी योद्धा असला पाहिजे, हें सहज समजण्यासारखें होतें. त्याच्याजवळ बसलेल्या तरुण योद्ध्याच्या मानानें तो आतां शक्ति, चपलता वगैरे बाबतींत अर्थातच कमी दिसत होता; परंतु त्याच्या पीळाकडे पाहिलें, ह्मणजे तो आपल्या यौवनांत त्या दुसऱ्या तरुण योद्ध्याहूनहि अधिक शक्तिवान् व चलाख होता, असें अनुमान करावयाला हरकत नव्हती.

हा दुसरा योद्धा वयानें तीसएक वर्षांचा असावा. तो मांसल व ठेंगू होता, आणि त्याच्या चर्येत यौवनाचें व शौर्याचें तेज असून मोकळ्या व बेफिकीर मनाची मोहकता होती. या योद्ध्याची योग्यता थोडक्यांत सांगावयाची म्हणजे त्याच्याजवळ बसलेल्या वृद्ध व कावेबाज किनतोब्याला पदच्युत करून त्याच्या ऐवजीं या तरुण व धाडसी वीराला ‘ किनतोबा ’ नेमावें, असें त्या जातींतल्या बऱ्याच लोकांनां वाटूं लागलें होतें, व हल्लींचा प्रत्यक्ष किनतोबाहि त्याला वचकून होता, एवढें सांगितलें ह्मणजे पुरे आहे.

मीरबलाचें–म्हणजे–त्या तरुण योद्धयाचें आणि त्या वृद्ध किनतोब्याचें एवढें वर्णन करून त्यांचें संभाषणच वाचकांपुढें मराठींत भाषांतर करून ठेविलें ह्मणजे त्या दोघांमध्यें कसला विचार चालला होता, हें त्यांच्या सहज ध्यानांत येईल.

" काय, मीरबल!" किनतोबा ह्मणत आहे. " आजची शिकार तर फार बहारीची झाली ! पण शिकार करून स्वामींच्या मठावरून परत येतांना माझ्या मनांत विलक्षण विचार आले. ते तुला केव्हां सांगेन, असें मला होऊन गेलें आहे. "

"कसले विचार ?अलीकडे त्या आश्रमांत बरींच नवीं माणसें आलीं आहेत, त्यांच्यासंबंधानें का ? "

" बरोबर ओळखलेंस !" किनतोबा ह्मणाला.

" त्यांच्यांतला एक गोरेला तरुण पोऱ्या आपल्या गांवांत रोज येत असतो, आणि लोकांनां कांहीं तरी प्रश्न विचारीत असतो, याबद्दल तुह्माला शंका तर नाहींना येत ? मला प्रथम त्याचा संशय आला; पण तो कोणीतरी वेडसर दिसतो आहे. सारा दिवसभर तो कसल्याशा पांढऱ्या पानावर वीतभर काटकीनें कसेंसेंच खरडीत बसलेला असतो म्हणे ! "

" हे लोक कोण आहेत, याची मीं बातमी काढली आहे. " किनतोबा ह्मणाला. " मीं त्यांच्या आश्रमांत लहानलहान पोरें पाठविलीं, आणि हे लोक किती आहेत, किती बायका आहेत, याची सर्व माहिती मिळविली."

" मग हे लोक कोण व किती आहेत ? त्यांची तुह्माला जर भीती वाटत असेल, तर या मीरबलाला हुकूम करा, ह्मणजे त्या सर्वांची या फरसानें डोकीं उडवून घेऊन येतों ! "

मीरबलाचा आपल्याविषयीं आदर आहे, असें पाहून त्या वृद्ध किनतोब्याला आनंद झाला. मीरबल हा किनतोबा होऊं पहात आहे, अशी त्याला जी बातमी लागली होती ती निखालस खोटी आहे, अशी त्याच्या मनाची खात्री झाली, व मीरबलाविषयीं त्याला वाटत असलेला द्वेषहि बराच कमी झाला.

" मीरबल, तसा प्रसंग बहुधा येणार नाहीं. आणि आलाच, तर हें काम तूं खात्रीनें फत्ते करून येशील, यांत शंकाच नाहीं. पण—"

" मग कसली तुह्माला भीति वाटते ? "

"भीति नाहीं, पण एकाद वेळेला असें वाटतें, कीं, या लोकांनां इथून घालवून दिलेलें बरें."

किनतोब्याचें हें भाषण कावेबाजपणाचें होतें. त्याला या आपल्या सालस विजयगांवकर मंडळींची भीति वाटत नव्हती, व ही मंडळी द्वेषार्हहि वाटत नव्हती. उलट, त्यानें उत्तरेला चारपांचदां पाहिली असल्यामुळें त्याची पापी काकदृष्टि तिच्यावर गेली होती. पण या परकी स्त्रीशीं विवाह केला, तर तो आपल्या जातीला आणि विशेषतः मीरबलासारख्या प्रमुख योद्धयांनां पसंत पडेल किंवा नाहीं, याविषयीं त्याला शंका होती. ह्मणून तो आपला हेतु कळूं न देतां मीरबलाचें मन पहात होता. असो.

शूर पण भोळ्या मीरबलाला किनतोब्याचा हा अंतःस्थ हेतु ठाऊक नसल्या-मुळें त्यानें सरळच त्याला विचारलें "कां बरें ? घालवून कां द्यावेंसें वाटतें ?"

"त्यांच्यापैकीं एकानें आपल्यांतला एकजण ठार मारला, आणि एक मुलगी लाटली, हें तूं ऐकलेंस ना?"

"हो, पण त्याच्यांत वाईट काय झालें ?" मीरबलानें स्वतः तिघांचौघां बायकांनां आपल्या बाहुबलाच्या जोरावर घरांत आणलें असल्यामुळें, त्याला याच्यांत कांहींच वाटलें नाहीं. लढाई करून बायका मिळविणें, हें या नरभक्षक लोकांमध्यें निंद्य मानलें जात नसे, हें वर सांगितलेंच आहे.

"तसें वाईट कांहीं नाहीं," धूर्त किनतोबा म्हणतो. "पण या लोकांनीं आपल्यांतली एक मुलगी उपटली, तेव्हां याचा मोबदला जर झाला नाहीं, तर आपल्या जातीला कमीपणा नाहीं का यायचा ?"

"कमीपणा कसला आहे ?" मीरबल मोकळ्या मनानें ह्मणाला."आपल्यापैकीं एकाद्याला त्यांच्यातली बायको पाहिजे असली, तर त्यानें आणावी तिला पकडून ! नाहीं कुणीं ह्मटलें आहे त्याला ?"

"त्यांच्या बायका तूं पाहिल्या आहेस का कधीं ? तुला नाहीं का त्यांतली एकादी—"

"मला जर एकादी पाहिजे असती, तर मीं तिला लागलीच ओढून घरांत नेली असती."

मीरबलाचें हें भाषण ऐकून वृद्ध किनतोबा ओशाळला. आपण जर या वेळीं पूर्वीसारखे तरुण असतों, तर आपणाला पाहिजे असलेल्या पोरीला असेंच आपण

ओढीत नेलें असतें, असें त्याला मनांत वाटलें. त्यांतल्या त्यांत त्याला एवढा आनंद झाला, कीं, आपलें जिच्यावर मन बसलें आहे, तिच्यावर मीरबलाचा डोळा नाहीं! मीरबल जर आपला प्रतिस्पर्धी असला, तर आपला हेतु सफल होणें शक्यच नाहीं, हें तो जाणून होता.

मीरबल आपल्या आड येणार नाहीं, अशी खात्री झाल्यामुळें उल्हसित होऊन किनतोबा त्याला म्हणाला "मीरबल, त्यांच्यांतली एकादी तरी मुलगी आपल्या जातींतल्या कोणाला तरी मिळवून दिलीच पाहिजे, असें तुला नाहीं का वाटत?"

"मला नाहीं वाटत. ज्याला पाहिजे असेल, त्यानें पकडून आणावी."

"मी तरी तेंच ह्मणतों. एकाद्यानें जर पकडून आणली, किंवा आणवली, तर तूं त्याच्या आड येणार नाहींस ना?"

"मी कशाला येऊं?"

"तूं येणार नाहींस, हें मला ठाऊक आहे; पण आपल्यांतले कांहीं लोक ह्मणत आहेत, कीं, या लोकांनां पकडून आणावें, आणि कटोहाला बळी देऊन टाकावें. मला कांहीं ही गोष्ट विशेष पसंत नाहीं. तुला कसें काय वाटतें?"

"मला–मला–मला कांहीं सांगतां येत नाहीं." मीरबल अडखळत अडखळत ह्मणाला. "मीं या गोष्टीचा विचारच केलेला नाहीं." त्यानें न लाजतां कबूल केलें.

"मग विचार करून पहा. आपल्या मयाणीनें मजजवळ ही गोष्ट काढली होती, ह्मणून मीं तुला विचारलें आतां."

'मयाणी' हा मीरबलचा प्रतिस्पर्धी असलेला दुसरा एक योद्धा होता, हें येथें सांगणें अवश्य आहे.

वरील संभाषण झाल्यावर किनतोब्यानें तो विषयच बदलला, व तेथें कांहीं वेळ इतर गप्पागोष्टी बोलून तो म्हातारा नीच खोकड व तो दुसरा रानटी भोळा योद्धा हे आपापल्या झोंपड्यांकडे निघून गेले.

## प्रकरण अकरावें.

## घसरले!

**विकारहेतौ सति विक्रियन्ते**
**येषां न चेतांसि त एव धीराः।**

—कालिदास.

मागील प्रकरणांतील संभाषणाला दहाबारा दिवस होऊन गेले. तेवढ्या अवधींत ईश्वरकृपेनें आनंदरावांचा ताप बरा होऊन ते आतां हिंडूंफिरूं लागले होते. त्यांचा ताप दोन दिवस एकशें सहा डिग्रींपर्यंत होता.(ते स्वतः डॉक्टर असल्यामुळें त्यांच्या खिशांत नेहमीं जो बारीक थर्मामीटर असावयाचा, त्यावरून तापाची बरोबर डिग्री मंडळींनां कळली.) हा ताप भयंकर तर खराच, पण स्वामिशिष्यांनीं त्यांनां जो वन्यपर्णांचा व मुळ्यांचा काढा दिला, त्यामुळें किंवा दुसऱ्या कशामुळेंहि असेल कदाचित्–त्यांनां ताबडतोब उतार पडला. या आजारांत रागिणीनें त्यांची किती व कशी शुश्रूषा केली, याचें विशेष वर्णन करण्याची जरूर नाहीं. आजारी माणसांची शुश्रूषा करावी अशी रागिणीनेंच! आजाऱ्याचें मन न दुखवतां, गोड गोड बोलून त्याला औषधपाणी देणें, त्याच्या आवडीप्रमाणें व कलाप्रमाणें रुचकर अन्न तयार करून त्याला घालणें, त्याच्याशीं इकडच्यातिकडच्या गोष्टी बोलून त्याचें मन रिझविणें, इत्यादि गोष्टी रागिणीला जशा साधत, तशा दुसऱ्या कोणाला साधत असतील किंवा नाहीं, याची मला खरोखर शंका आहे. उत्तरा तिच्यापेक्षां अधिक शिकलेली असेल, व तिला औषधांची वगैरेहि अधिक माहिती असेल; परंतु रागिणीमध्यें जें कांहीं एक अवर्णनीय अनिर्दिश्य सौम्य माधुर्य होतें, तें उत्तरेमध्यें खात्रीनें नव्हतें. हा स्वभावभेद आनंदरावांच्या या आजारांत दृष्टीला पडला नाहीं, ही गोष्ट वेगळी. या प्रसंगीं प्रेमळ शुश्रूषेंत उत्तरेनें रागिणीपेक्षांहि वरचढ केली. याचें कारण,–कारण उघडच आहे!

आनंदराव बरे होऊन ते हिंडूंफिरूं लागले, हें वर सांगितलेंच आहे. अंगांत चांगली शक्ति आली ह्मणजे मग किराडी भाषा शिकावयाला आणि चालीरीतींची अधिक माहिती मिळवावयाला पुनश्च सुरुवात करावयाची, असा त्यांचा बेत होता. परंतु आजारांतून उठल्याबरोबर हे परिश्रम केल्यास आजार

उलटेल, अशी सर्वांनां भीति पडली. आश्रमांत राहिल्यास आनंदराव पुनः आपलें काम हातीं घेतील, व त्यांनां प्रतिबंध करणें अशक्य होईल, अशी सर्वांनां खात्री असल्यामुळें आश्रमच अजीबात सोडून देऊन परत घराकडे लवकर वळावें, असा मंडळीचा बेत झाला, व आनंदरावांनीं मनांत योजिलेला बेत त्यांनां निरुपायास्तव मनांतच ठेवावा लागला.

आश्रम सोडण्याचा बेत जसा अगदीं दोन दिवसांवर येऊन ठेपला, तसा आनंदरावांचा जीव खालींवर होऊं लागला. प्रकृतीची पर्वा न करितां व नानासाहेबांच्या वगैरे उपदेशाला न जुमानतां, ते गांवांत जाऊन आपल्या हरतऱ्हेच्या टिपणांची पूर्तता करून घेऊं लागले. हा नाद–अथवा हें वेड–त्यांनां इतकें लागलें, कीं, ते एक दिवस अगदीं सकाळीं जे गांवांत गेले होते, ते दुपारचे चार वाजतां आश्रमांत परत आले! जातांना त्यांनीं 'मला कदाचित् उशीर होईल,' असें सांगितलें होतें ह्मणून बरें झालें; नाहीं तर आईसाहेबांनां वगैरे काळजीच लागून राहिली असती.

त्या दिवशीं हवा फारच चांगली होती, व आश्रमाच्या मागल्या बाजूची नदीकांठची वनश्री फारच मनोहर दिसत होती. 'माझी शोभा पहा, आणि आनंदांत रहा,' असेंच जणूं काय तेथील वनश्री लोकांनां सांगत होती.

ही मनोज्ञ व आकर्षक शोभा पाहून "फिरायला येतां का?" ह्मणून शास्त्रीबुवांनीं सुचविलें.

बहुतेक मंडळी एका पायावर अर्थात्च तयार झाली. उत्तरेचें थोडेंसें कपाळ दुखत असल्यामुळें ती आश्रमांतच राहिली. शिवाय आनंदराव परत आल्यावर त्यांनां खाण्यापिण्याला देण्याकरितां कोणीं तरी मागें राहणें अवश्य होतेंच; व हें काम आईसाहेबांनीं जितक्या आनंदानें उत्तरेला सांगितलें, तितक्याच आनंदानें तिनें तें पत्करलें. रागिणी उत्तरेला सोबत राहणार होती; पण वनश्री फारच मोहक होती हें एक, व आईसाहेबांनीं व शास्त्रीबुवांनीं तिला फिरण्यास चलण्याविषयीं फारच आग्रह केला, हें दुसरें; या कारणांमुळें आपल्या मैत्रिणीला आश्रमांत एकटीलाच सोडून तीहि नदीवरील शोभा पहावयाला मंडळीबरोबर गेली.

आनंदराव आश्रमांत परत आल्याबरोबर नानासाहेब वगैरे मंडळी फिरावयाला गेली आहेत, हें त्यांनां टिल्लूनें सांगण्यापूर्वीच तेथील सामसुमी-

वरून कळलें. " घरांत कुणीच नाहीं का ? " असें त्यांनीं विचारल्यावर टिल्लूनें उत्तराताई घरांत असल्याचें सांगितलें. चहा व फराळाला कांहीं तरी तयार करावयाला टिल्लूकडून उत्तरेला त्यांनीं कळविलें, व कपडे काढून त्यांनीं आपली डायरी उघडली, आणि त्यांत त्या दिवशीं मिळविलेल्या माहितीचें ते सविस्तर टिप्पण करूं लागले. लिहितांलिहितां त्यांनां एक नोटबुक भ्रमिष्टपणें गांवांत विसरल्याची आठवण झाली, व त्यांनीं लगेच टिल्लूला हांक मारून तें आणावयाला त्याला धाडून दिलें.

इकडे उत्तरेनें चहा वगैरे तयार केला, व पुऱ्या आणि चहा घेऊन ती आनंदरावांच्या खोलींत गेली. पण ते डायरी लिहिण्यांत इतके गुंग होऊन गेले होते, कीं, त्यांनां उत्तरा आल्याचें मुळींच समजलें नाहीं. हातांतलें सामान खालीं ठेवून चूळ भरण्याकरितां पाणी आणण्यास ती गेली, व पाणी घेऊन परत आली, तरी डायरीवर टांक धांवत होताच, व डोळे टांकापाठोपाठ सावलीसारखे अनन्यभक्तीनें वळत होते. उत्तरा त्या लेखनसमाधिमग्न मूर्तीकडे सादर सप्रेम कौतुकानें पहात मिनिटभर उभी राहिली, व नंतर " इथून कुणीं कांहीं चोरून नेलं, तरी सुद्धां कळायचं नाहीं मला वाटतं ! " असें हंसतहंसत ह्मणाली.

ते शब्द ऐकल्यावर–अथवा त्या शब्दांसारखा कांहीं तरी आवाज कर्ण-पथावर पडल्यावर–आनंदराव झटकन् जागे झाल्यासारखे झाले, व " कोण, काय ?" असे उद्गार अबुद्धिपुरःसर त्यांच्या तोंडून निघून त्यांची मान वर झाली, व भांबावल्याप्रमाणें इकडून तिकडे फिरली. उत्तरेला पाहिल्याबरोबर त्यांची समाधि पूर्णपणें उतरली, आणि ते जरासे गोंधळले, लाजले, व हंसले.

"लिहिण्याच्या नादांत मीं पाहिलेंच नाहीं." कांहीं तरी बोललें पाहिजे ह्मणून आनंदराव बोलले.

"मी ती डायरी फाडून टाकणार आहें उद्यां ! " उत्तरा हंसून ह्मणाली.

" कां ? तिनें बिचारीनें काय पाप केलें आहे ?"

"तिच्यापुढें दुसऱ्या गोष्टीचं भानच रहात नाहीं ह्मणून !" उत्तरेनें उत्तर दिलें. यावर आनंदरावांनीं मंदस्मित करण्यापलीकडे कांहींएक उत्तर दिलें नाहीं. त्यांनीं तांब्यांतलें पाणी घेऊन खिडकींतून बाहेर चूळ टाकली, व मान खालीं घालून विचारमग्न, उदास व किंचित् लज्जान्वित आणि भांबावलेल्या मुद्रेनें पुऱ्या खावयाला आरंभ केला.

" साखरबिखर पाहिजे का ? " उत्तरेनें विचारलें.

"या पुऱ्या साखरेपेक्षां गोड आहेत. कुणीं केल्या आहेत कुणाला ठाऊक ?" आनंदरावांनीं विनोदवुद्धीनें मुद्दाम म्हटलें.

" कुणी का करीना–आवडल्या म्हणजे झालं !" उत्तरा जरा लाजून ह्मणाली.

उत्तरेशीं अधिक बोलणें ह्मणजे तिच्या ताब्यांत जाणें होय, असें त्यांनीं मनांत ओळखलें, व तिच्याशीं प्रेमानें आतां भाषण करावयाचेंच नाहीं, असा कठोर निश्चय करून ते आतां अगदीं उग्र मुद्रा धारण करून बसले. उत्तरा अर्थात् ओशाळून त्या खोलींतून स्वयंपाकघरांत जाऊं लागली. हें पाहून आनंदरावांनां वाईट वाटलें, व तिच्याशीं कांहींतरी बोलावें ह्मणून ते तिला ह्मणाले " आज आईसाहेब पण गेल्या वाटतें फिरायला ? "

" हो. हवा चांगली पडली आहे, ह्मणून आई नि रागिणीसुद्धां गेल्या फिरायला. "

" आणि किनरी कोठें आहे ? " कोणीकडून तरी दोनचार वाक्यें तिच्याशीं बोलून तिला वाटेला लावण्याच्या हेतूनें आनंदरावांनीं तिला पुनः विचारलें.

" किनरी आपल्या बापाकडे आज रहायला गेली आहे. उद्यां येणार आहे परत. "

" आणि स्वामींचे शिष्यहि कुठें दिसत नाहींत आज ? "

"शिध्याचं वगैरे सामानसुमान काढून देऊन ते कुठंसे गेले आहेत देवाच्या दर्शनाला. "

" आज तर मग आतां आश्रमांत तुम्ही एकट्याच ह्मणायच्या !" आनंदराव सहज ह्मणाले. परंतु या वाक्याच्या योगानें दोघांच्या मनांत विलक्षण भावना उत्पन्न झाली. अर्थात् ती पापबुद्धीची नव्हतीच; पण त्या दोघांच्या मनाची त्या वाक्यानें चलबिचल झाली, एवढी गोष्ट खरी.

" किनरीला बरं सोडलं तुम्हीं,–घरांत काम करायला नको का कुणी ? " आनंदरावांनीं कांहीं तरी बोलून मनाची विकृति लपविण्याकरितां विचारलें.

" दोन दिवसांनीं आपण इथून जाणार, तेव्हां तिला बापाला भेटायला नको का ? आपल्या तिकडून पुनः ती या प्रान्तांत परत येते का नाहीं, याचा काय नेम आहे ? "

" सगळें खरें; पण चाकरांची एवढी काळजी बायकांनां केव्हांपासून वाटूं लागली ? बायकांचें मन एवढें उदार झालें, म्हणजे हिंदुस्तानदेशाचें भाग्यच समजायचें !" आनंदराव हंसून म्हणाले.

" बायकांपेक्षां पुरुषच निष्ठुर असतात ! " उत्तरा म्हणाली.

" कां, पुरुष कधीं बायकांसारखे गडीमाणसांनां वाईट वागवतात का ? "

" गडीमाणसांनां वाईट वागवीत नसतील; पण घरांतल्या बायकांनां आपल्यामुळं किती त्रास नि दुःख होत असेल, याचा कधीं तरी पुरुष करतात का विचार ? "

" तुमच्यासारख्या बायका जवळ असल्या म्हणजे पुरुषांची विचारबुद्धि जागेवर राहिली, तर विचार करणार ना पुरुष ? "

हें वाक्य उच्चारल्याबरोबर आनंदराबांनां 'आपण हें भलतेंच काय बोलून गेलों,' असें होऊन त्यांनीं आपली जीभ चावली; पण आतां जीभ चावून काय उपयोग होता ? उत्तरेच्या विषयींचें प्रेम दाबून त्यांनां सर्वांतःकरणानें देशसेवा भक्तिपूर्वक करावयाची होती. पण या जगांत एका व्यक्तीच्या इच्छेचें काय चालणार ? ब्रह्माण्ड चालविणाऱ्या प्रचण्ड ईश्वरशक्तीपुढें आनंदराव झाले किंवा दुसरे कोणी झाले, म्हणून त्यांचें काय चालणार ? उत्तरेचा व आनंदरावांचा विवाह जुळवून आणावयाचाच अशी जर ईश्वराची इच्छा असली, तर आनंदरावांनीं किती जरी मनाचें नियमन केलें, तरी तें फोलच होणार ! थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे आनंदराव आतां जाळ्यांत तडफडणाऱ्या माशाप्रमाणें स्वतःला अधिकाधिकच कोमल मनोवृत्तींच्या रेशमी जाळ्यांत अडकवून घेऊं लागले.

'तुमच्यासारख्या बायका जवळ असल्यावर' या वाक्यांतील 'तुमच्यासारख्या' या शब्दाच्या मधुरवाणीनें उत्तराहि विद्ध झाली, आणि ती लाजेनें गोंधळून एकदम म्हणाली "पुरुषांपुढं बायकांनां काय बोलतां येणार आहे बाई -"

" हें तुम्ही कबूल करतां ? बायकांपुरुषांचे हक्क समसमान असावेत, असें प्रतिपादणाऱ्या—"

उत्तरा मध्येंच म्हणाली " हक्कांचा प्रश्न येईल तिथं माझं अजूनहि तसंच मत आहे. पण आतां हक्कांचा प्रश्न नाहीं—"

“ कां ? कुठें गेला आहे तो प्रश्न ?” आनंदरावांनीं स्मितयुक्त औत्सुक्यानें विचारलें.

“ नदीवरच्या वाळवंटांत उन्हाळ्यांत उकरलेलीं झऱ्याचीं डबकीं असतात ना ? तीं जशीं पावसाळ्यांतल्या महापुरांत लोपून जातात, तसे प्रेमाच्या प्रवाहांत हक्कांचे सर्व प्रश्न लुप्त होतात ! ”

“प्रेमाचें बरेंच माहात्म्य आहे ह्मणायचें तर मग ?” आनंदराव जणूं काय प्रेमाची कुचेष्टा करण्याच्या स्वरानें म्हणाले.

माहात्म्य नाहीं तर काय आनंदराव ? तुह्मीसुद्धां त्याच्याच प्रवाहांत वाहून जात आहांत, हें तुमच्या ध्यानांत कोठें आहे ?

आनंदरावांच्या कुचेष्टेकडे लक्ष्य न देतां उत्तरा गांभीर्यानें ह्मणाली “ परस्परांचें प्रेम असलं, तर प्रेम ह्मणजे ‘ माहात्म्य ’ नाहीं तर प्रेम ह्मणजे मरण! ”

“ परस्परांचें असलें तर उत्तमच!” आनंदराव ह्मणाले. “ पण नसलें तर प्रेम सांगून का येतें ?”

“ प्रेम सांगून येत नाहीं, व असून सांगतांहि येत नाहीं कधीं कधीं!”

झालें, आनंदरावांची विचारशक्ति प्रेमौघापुढें वाहून गेली, व ते पूर्णपणें प्रेमवश झाले, आणि कांहीं एक भान न राहतां उन्मत्त माणसाप्रमाणें ते असंबद्ध आवेशानें ह्मणाले “ मी तुमचें मन ओळखीत नाहीं, असें का आहे ? पण करूं काय ? माझ्या हृदयांतलें प्रेम मला एंजिनांतल्या वाफेप्रमाणें दाबून ठेवावें लागत आहे. युवतिप्रेमापेक्षांहि मला दुसरी एक प्रियतर गोष्ट आहे—चुकलों— ‘होती,’ असेंच आतां ह्मटलें पाहिजे ! प्रेमापेक्षां मला आतां अधिक कांहीं नाहीं. झालों, मी तुमचा आजपासून पूर्ण दास झालों ! झालें तुमचें एकदां समाधान ? ईश्वरा, उच्च भरारी मारणारांनां सुवर्णरज्जूंनीं खालीं ओढण्यांत तुला नेहमींच धन्यता वाटते, तेव्हां होऊं दे तुझेंहि एकदां समाधान! स्वजनसेवे, तूं आतां या तरुणीच्या सेवेकडे वळ ! महत्त्वाकांक्षे, माझ्याकडे तूं आतां पाहूं नकोस,—मीं आतां एका युवतीच्या पाशांत सांपडलों आहें !”

हे उन्मत्त उद्गार ऐकून उत्तरा प्रथम घाबरली. पण आनंदरावांच्या हृदयांतील अंतःकलहाची तिला पूर्ण कल्पना असल्यामुळें, दाबून ठेवलेल्या प्रेमाचा स्फोट होतांना असा आवाज होणें साहजिक आहे, असा तिनें मनांत विचार केला, आणि प्रेमाचा अखेर विजय झालेला पाहून ती आनंदित झाली, आणि

आनंदरावांचें क्षुब्ध मन शांत करण्याच्या उद्देशानें प्रेमळ सौम्यतेनें ह्मणाली " हें काय हें? मी आपल्या देशसेवेच्या आड का येणार आहें? उगाच भलत्या कुशंका काढून जिवाला त्रास करून कां घ्यावा?"

"कां त्रास करून घ्यावा, याला उत्तर नाहीं!" आनंदराव शांत होऊन ह्मणाले. " त्रास होतो ही गोष्ट खरी; पण त्याचें आतां काय आहे? जी गोष्ट बोलूं नये ती बोलून गेलों. आतां विवाह केल्यावांचून मुक्तता नाहीं. तरुण स्त्रीपुरुषांनीं एकान्त कधीं करूं नये ह्मणतात, तें कांहीं खोटें नाहीं! असो. झालेल्या गोष्टी कांहीं परत येत नाहींत! तुमच्या पाशांत आतां मी पुरता सांपडलों. वाघाला जसा पिंजऱ्यांत ठेवतात, तसें तुम्ही आतां मला घरांत कोंडून ठेवा. आतां प्रवासाचें नांव नको, शोधाचें नको आणि साहसाचें त्याहूनहि नको!"

" इच्छा नसली, तर मनाविरुद्ध कोणतीहि गोष्ट करूं नये. " उत्तरा–मनापासूनच पण किंचित् कोपानें ह्मणाली.

"आतां अधिक बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं. पिंजऱ्यांत पडल्यावर पोपटानें आनंदानें डाळिंबाचे दाणे खात रहावें, हेंच शहाणपणाचें काम! उगीच शोक करण्यांत काय अर्थ आहे? बरें, तुह्माला तर झाला ना आतां आनंद?"

" ज्याला आनंद व्हायचा त्याला जर आनंद नाहीं, तर मग मला तरी कसा होईल?"

" मला आहे आनंद! आतां तर झालें ना? माझ्यासारखा धन्य कुणी नाहीं! मी आनंदाच्या शिखरावर आहें! जिकडेतिकडे आनंदीआनंद आहे!"

" मला थट्टा समजत नाहीं, असं नाहीं हो!" उत्तरा स्मितपूर्वक मान हलवून ह्मणाली.

आपलें उच्च ध्येय–आपला अनेक वर्षांचा दृढनिश्चय अवचितपणें सोडून दिल्याबद्दल आनंदरावांनां प्रथम जो पश्चात्ताप झाला, व त्यामुळें जो अंतःक्षोभ झाला, तो हृदयांतील प्रचण्ड व सुखद प्रेमनिर्झरानें लवकरच शांत झाला, आणि तेहि मग प्रेमाच्या पूर्ण रंगांत आले, व त्या दोघांनीं त्या वेळीं बराच शाब्दिक विनोद केला. आनंदाच्या भरांत कांहीं तरी कोट्या करून हंसतां-हंसतां त्यांनीं उत्तरेला झालेली गोष्ट 'आईसाहेबांनां न सांगण्याविषयीं' सांगितलें.

"सांगितली नाहीं, ह्मणून कळल्याशिवाय राहते आहे थोडीच!" उत्तरा ह्मणाली. "माझा आनंद पाहिल्याबरोबर सांगितल्याशिवाय आई सगळं ओळखील!"

" आपोआप अनुमानानें कळेल तेव्हां कळूं दे. बाकी, हें सांगण्यांत कांहीं अर्थ नाहीं. बायकांच्या तोंडांत गुप्त गोष्ट एक मिनिटभरसुद्धां रहायची नाहीं !"

" पुरुषांच्या तोंडांतसुद्धां—"

" पण बायकांमध्यें हा ' गुण ' विशेष आहे !"

" पुरुषांत कांहीं कमी नाहीं ! आजच त्याची प्रचीती आली. प्रेमाची गोष्ट मीं नाहीं पहिल्यानें काढली कांहीं ! आणि मीं असं आपलं प्रेम भडभडून ओकूनहि टाकलं नाहीं ! "

"चूक पदरांत घेतलीच पाहिजे ! घसरून गेलों, तेव्हां आतां कुचेष्टा होईल ती सोसलीच पाहिजे. त्यांतून पुनः—"

असें जों आनंदराव बोलत आहेत, तों आईसाहेब वगैरे मंडळी आश्रमाच्या अगदीं दाराशीं येऊन ठेपली असें उत्तरेनें पाहिलें, व ती एकदम त्या खोलींतून चहाची कपबशी घेऊन मठांतील स्वयंपाकघरांत गेली.

## प्रकरण बारावें.

### वाङ्निश्चय.

उत्तरेशीं एकान्तांत संभाषण करतांकरतां आनंदराव तिच्या सौंदर्याच्या, बुद्धितेजाच्या, पावित्र्याच्या व प्रेमाच्या स्वाधीन झाले खरे; परंतु मागाहून त्यांनां आपल्या मनोदौर्बल्याबद्दल वाईट वाटूं लागलें, आणि केलेल्या गोष्टीबद्दल पश्चात्ताप होऊं लागला. देशकार्य सोडून विवाहसुखाच्या मागें लागण्याचा आपणाला कसा मोह झाला, याचें त्यांनां फार आश्चर्य वाटूं लागलें, व स्वतःच्या भावना-प्रधान निर्बल अनिश्चित वृत्तींची त्यांनां लाज वाटूं लागली. एकादा मोठा ठेवा गमावल्यामुळें जसें इतरांनां दुःख होतें, तसें त्यांनां अविवाहितावस्थेचें स्वातंत्र्य गमावल्यामुळें झालें.

आनंदराव स्वतःच्या मनाशींच शोकाक्रोश करूं लागले " आज मीं आपलें स्वातंत्र्य प्रेमाला विकून टाकलें ! मी आतां उत्तरेचा दास झालों ! देशभक्ति, तूं आतां माझ्या हृदयांतून निघून एकाद्या अविवाहित तरुणाच्या हृदयांत प्रवेश कर. महत्त्वाकांक्षे, तूं आतां येथून पळ काढ, आणि यूरोपियन शोधकांचा आश्रय कर. अभागी हिंदुस्ताना, तुझें पुढें काय होणार, हें तुझें तूंच पाहून घे. मी आतां तुझी सेवा करण्याचें सोडून एका सुंदरीच्या नादीं लागलों आहें ! स्वातंत्र्या, तुझा आणि माझा आतां कांहीं संबंध नाहीं, मी आतां आपण होऊनच दास्य स्वीकारलें आहे. यौवना, माझी विवेकबुद्धि आतां पूर्णपणें नष्ट झाली आहे, आतां तूं मला जिकडे नेशील तिकडे ने. सर्वदमना मदना, इतके दिवस मीं तुझें साम्राज्य मानलें नाहीं, पण आतां मलाहि तूं जिंकलें आहेस, तेव्हां तूं आपल्या कर्तबगारीची खुशाल धन्यता मान ! "

अशा रीतीचे निराशेचे व पश्चात्तापाचे विचार आनंदरावांच्या मनोनभांतून मेघमालेप्रमाणें येऊन गेले, व त्यांची कृष्ण उदास छाया त्यांच्या मुखश्रीवर पडली; परंतु कांहीं वेळानें विवेकसूर्याचा उदय होऊन त्यांचें तिमिरावृत आणि क्षुब्ध मन शांत व प्रसन्न झालें, आणि त्यांच्या विचारांची दिशा बदलून ते अधिक उत्साहाचे व आनंददायक झाले.

"उत्तरेचें व आपलें मन प्रेमबद्ध झाल्यावर शरीर दूर ठेवण्यांत काय अर्थ ? आणि उत्तरेसारख्या समंजस व सुशील स्त्रीच्या पावनसंगतींत प्रेममाधुर्याचा आस्वाद घेण्यांत तिचें दास्य कसलें आहे ? तिच्यावर प्रेम करणें म्हणजे सत्य-

जिज्ञासा किंवा देशाभिमान सोडणें, असा मुळींच अर्थ नाहीं. कारण, ती माझ्या-एवढी—माझ्याहून कांकणभर अधिक जिज्ञासु आणि देशाभिमानी आहे. ती कोणत्याहि उदात्त, उदार कृत्याच्या आड यावयाची नाहीं; उलट, तिच्यामुळें हृदयांतील वीर्यवृत्तीला अधिक उत्साह येईल. शंकराची जशी पार्वती, तशी उत्तरा ही माझी शक्ति आहे. हिच्यामुळें माझ्या स्वैरवृत्तीला आळा बसेल; पण सत्कृत्य करावयाला अधिक उत्साह येईल. स्वैरपणा गेला ह्मणजे स्वातंत्र्य गमावलें, असें नव्हे. सूर्य, चंद्र, तारे यांनांहि स्वेच्छाचारानें फिरतां येत नाहीं. पण त्यांच्या या नियमामुळेंच ते प्रिय, वंद्य व पूज्य झाले आहेत. पण त्यांचाच स्वैरगति व अनिर्गल असा भाऊबंद जो धूमकेतु, त्याला सर्वजण दुश्चिन्ह व भयहेतु समजतात ! नियमन किंवा बंधन हें पृथ्वींतील प्रत्येक वस्तूला लावून दिलेलें आहे. पुष्पांच्या विकसनाला, नद्यांच्या प्रवाहाला आणि समुद्राच्या विस्तारालासुद्धां नियमन, बंधन किंवा मर्यादा आहेच.

"एकंदरींत काय, तर विवाहबंधन ह्मणजे दोषास्पद बंधन नव्हे, तर तें नैसर्गिक व उपयुक्त बंधन आहे. उत्तरेशीं विवाह करणें ह्मणजे देशभक्ति सोडणें नव्हे. उत्तरा आपल्या कार्याला प्रतिबंध करील, हें ह्मणणें चुकीचें आहे. उत्तरा आणि रागिणी यांच्यासारख्या स्त्रिया जागोजाग नसतात. अशा स्त्रिया परोपकाररत पतीला प्रतिबंध न करतां उलट त्याला त्याच्या कार्यांत उत्साहपूर्ण करतात. भय्यासाहेब वेडे ह्मणून त्यांनीं थिऑसॉफीच्या व योगाभ्यासाच्या नादानें रागिणीला टाकून दिलें; पण उत्तरेसारख्या रत्नाला मींहि टाकून द्यावें काय ? या रत्नाचा त्याग करणें म्हणजे आपण खरशूकरांच्या जातीचे आहोंत, असें कबूल करणें होय ! "

अशा विचारसरणीनें आनंदरावांनां विवाह करणें योग्य वाटूं लागलें, व त्यांचें मन प्रसन्न व आनंदित झालें, आणि हें एका अर्थी बरें झालें. नाहीं तर एकीकडे उत्तरेला विवाहाविषयीं आशा लावलेली आणि मनांतून विवाहाविषयीं द्वेष, अशा पेंचांत ते येऊन पडले असते !

उत्तरेचें व आनंदरावांचें मन जुळलें खरें; पण नानासाहेबांची वगैरे संमति मिळून त्यांच्या प्रेमरज्जूंनां विधिपूर्वक ग्रंथि देण्याचें पवित्र मनोरम कार्य राहिलेंच होतें. तें कोठें, केव्हां व कसें होणार, याचा आनंदराव आपल्या मनाशीं विचार करीत होते. "उत्तरा आईसाहेबांनां आजची गोष्ट आजच्या आज सांगेल काय ? "

असा ते मनाशीं विचार करीत असतां नानासाहेब त्यांच्या जवळ आले, व कांहीं वेळ दुसऱ्या गोष्टी बोलून ते त्यांनां ह्मणाले "मागें मी तुह्माला उत्तरेसंबंधानें बोललों होतों, त्याची पुनः आठवण देण्याकरितां आज तुह्माला जरा एकान्तांत गांठलें आहे. विवाह न करण्याचा त्या वेळचा तुमचा निश्चय अद्यापि कायम असल्यास माझें कांहीं ह्मणणें नाहीं; पण उत्तरेशीं तुमचा विवाह व्हावा, अशी माझी फार इच्छा आहे. तिचें पोषण कसें करावें, याची तुह्माला काळजी नको. माझी इस्टेट ती उत्तरेची, व उत्तरेची ती तुमची आहे, असें समजा. अधिक काय बोलूं ? "

"मी आपल्या इच्छेच्या बाहेर नाहीं." आनंदराव नम्रतेनें व किंचित् लाजून म्हणाले.

विवाहाला आनंदरावांचा रुकार मिळणार, हें आईसाहेबांकडून नानासाहेबांनां जरी आधींच कळलें होतें, तरी वरील शब्द प्रत्यक्ष ऐकल्यावर त्या कन्या-विवाहोत्सुक प्रेमळ पित्याला किती आनंद झाला असेल, याची कल्पना ज्याची कन्या उपवर झाली आहे, अशा चिंताक्रान्त पित्याला जशी होईल, तशी इतरांनां होणें शक्य नाहीं !

आईसाहेबांनां या रुकाराची बातमी नानासाहेबांकडून कळल्यावर, त्यांनां जो आनंद झाला, तोहि वाचकांनीं कल्पनेनेंच जाणावा. मातेचें दुःख व सुख यांचें वर्णन कोण करील ? असो. विवाहविधि कोठें करावयाचा, हा त्याच रात्रीं प्रश्न निघून व त्याची सांगोपांग वाटाघाट होऊन विवाहविधि व लग्नसोहळे विजयगांवांत करण्याचें ठरलें—ठरलें खरें—पण कोणाचें ?

विजयगांवकर मंडळीचें ! पण मठाजवळील गांवांतील नरभक्षक क्रूर जंगली लोकांचें काय ठरलें आहे ? सगळ्या विजयगांवकर मंडळींची उचलबांगडी करून त्यांनां कटोहांत टाकण्याचें ठरलें असलें तर ? तसेंच उत्तरेला किंवा रागिणीला उचलून पळवून नेण्याचें 'किनतोब्या'नें—नाहीं तर दुसऱ्या कोणीं ठरविलें असलें तर ?

## प्रकरण तेरावें.

## दैवाचा घाला.

या आश्रमांत विजयगांवकर मंडळीला येऊन आतां बरेच दिवस झाले होते. आईसाहेब तर तेथें रहावयाला आतां अगदींच कंटाळल्या होत्या. उत्तरेचें लग्न थाटामाटानें विजयगांवांत करावयाला त्या इतक्या उत्सुक झाल्या होत्या, कीं, उत्तरेचेंहि औत्सुक्य त्यांच्या मानानें कमी होतें, असें ह्मटलें तरी सुद्धां तें चालण्यासारखें आहे. येथून उद्यांपरवांच प्रस्थान ठेवावें, असें त्यांनीं सुचविलें.

आनंदरावांशिवाय इतर सर्व मंडळी या गोष्टीला अनुकूल होती. आनंदरावांच्या मनांतून आणखी कांहीं दिवस तेथें राहून शेजारच्या गांवांतील लोकांच्या चालीरीतींचें, धर्मविषयक कल्पनांचें, त्यांच्या भाषेचें, तेथील हवामानाचें, तेथील झाडांझुडपांचें तपशीलवारटिप्पण करून घ्यावयाचें होतें. यासंबंधाच्या बऱ्याच गोष्टी त्यांनीं आपल्या रोजनिशींत टिपून ठेवल्या होत्या. त्या लोकांची भाषाहि त्यांनीं थोडीबहुत अवगत करून घेतली होती. परंतु त्या भाषेचें व्याकरण प्रसिद्ध करण्याइतकी त्यांच्याजवळ अद्यापि सामग्री जमली नव्हती. व्याकरणविषयक अधिक माहिती मिळवून व इतरहि सविस्तर टिपणें करून घेऊन आपल्या प्रांतांत गेल्यावर हिमालयांतील या जातीसंबंधाचें आपण एक पुस्तक प्रसिद्ध करावें, आणि 'शोधक व ग्रंथकार'अशी आपली ख्याति व्हावी, अशी त्यांनां अतिशय महत्त्वाकांक्षा होती; आणि ह्मणूनच ते 'एवढयांत निघण्याची घाई करूं नये,' असें म्हणत होते. परंतु आईसाहेबांपुढें आनंदरावांचें कांहीं चालेना, व सगळयांबरोबर दोन दिवसांनीं निघण्याचें त्यांनां मोठ्या नाखुषीनें कबूल करावें लागलें.

दुसऱ्या दिवशीं आनंदराव सकाळींच आश्रमाबाहेर पडले, व गांवांत जाऊन त्यांनीं अनेक प्रकारच्या माहितीचीं बरींच टिपणें करून घेतलीं. दुपारीं जेवावयाला सुद्धां गृहस्थ आश्रमाकडे गेला नाहीं! किनरीच्या बापाजवळून आनंदरावांनीं थोडेंसें दूध आणविलें, व तेवढयावरच आपलें समाधान करून घेतलें, आणि पुनः तेथील वृद्ध लोकांनां अनेक प्रश्न विचारून मिळालेली माहिती ते टिपून घेऊं लागले. तीन वाजतां त्यांचें कपाळ दुखूं लागलें, व त्यांनीं मग आश्रमाचा रस्ता धरला. पोटांत भूक लागली होती ह्मणूनच कीं काय, ते वाटेंत 'आपण आतां लवकरच ग्रंथकार म्हणून प्रसिद्धीला येणार,' असे मनांतले गोड गोड मांडे

ख्यात चालले होते. उत्तरेशीं लग्न होणार, या प्रिय गोष्टीपेक्षांहि वरील महत्त्वाकांक्षा त्यांनां अधिक प्रिय होती. असो.

आश्रमांत आल्यावर बायकांनीं बहुतेक सर्व सामान व्यवस्थित रीतीनें आवरून व बांधून ठेवलें आहे, असें त्यांच्या दृष्टीला पडलें. उत्तरा चहा गाळीत होती, रागिणी कपबशा धुऊन साफ करीत होती, व किनरी खोलींतला केर भरीत होती. आईसाहेब एक गांठोडें बांधीत होत्या. पुरुष मंडळी पुस्तकें वगैरे आवरीत होती. स्वामींचे कांहीं शिष्य दुसऱ्या दिवशीं सामान नेण्याकरितां हमाल वगैरे पहावयाला गेले होते, व बाकीचे दूरच्या एका देवाचें दर्शन घेण्याकरितां आदल्या दिवशींच गेले होते. चहाची व फराळाची सर्व तयारी झाल्यावर सर्व मंडळी त्या प्रिय कार्याला मोठ्या उत्सुकतेनें आली, व आनंदाच्या गप्पागोष्टी बोलतांबोलतां पुरुषमंडळींत सगुण व निर्गुण ब्रह्माचा निरंतरचा वाद पुनः निघाला.

शास्त्रीबुवा अर्थात् निर्गुणवादी होते, व इतर सर्व सगुणवादी होते. या विवादप्रिय स्त्रीपुरुषांमध्यें जरी बराच वेळ मोठा खडाजंगी वाद झाला, तरी अखेर कांहीं निःसंशय अथवा निर्विवाद तत्त्वबोध त्यापासून निष्पन्न झाला, असें कोणीं समजूं नये; आणि खरें पाहूं गेलें असतां या असल्या वादांत शाब्दिक डावपचांपेक्षां व पकडींपेक्षां दुसरें काय असणार? तेव्हां हा वाद सबंध न देतां प्रस्तुत गोष्टीशीं जेवढ्या भागाचा प्रत्यक्ष संबंध आहे, तेवढाच भाग दिला ह्मणजे पुरे आहे.

"शास्त्रीबुवा, ब्रह्म निर्गुण आहे, हें मी क्षणभर कबूल करतों." नानासाहेब ह्मणाले. "पण या निर्गुण ब्रह्मापासून जगदुत्पत्ति–मायेनें कां होईना–पण होते, हें तर खरें आहे ना?"

"हो," शास्त्रीबुवा म्हणाले. "पण हें जगच मायिक–खोटें आहे."

"खोटें असेल," नानासाहेबांनीं कबूल केलें. "पण हें खोटें जग उत्पन्न करण्याचा त्याच्यांत गुण आहेच! ह्मणजे, ब्रह्म हें सगुण ठरलें!"

"हः हः हः!" शास्त्रीबुवांनीं उद्गार काढले, व या उद्गारांनींच आक्षेपाची निरर्थकता दर्शविली." हा आक्षेप आजचा नाहीं. पूर्वीच्या लोकांनीं याच्यावर उत्तर देऊन ठेवलें आहे. असल्या पोंचट आक्षेपांनां आमचा वेदान्त दाद देणारा नाहीं."

"तुमचें उत्तर तर ऐकूं द्या. मग वेदान्ताचा जोर किती आहे, याचा विचार करूं." भाऊसाहेब ह्मणाले.

शास्त्रीबुवा यावर उत्तर देणार, इतक्यांत नानासाहेब मध्येंच ह्मणाले "निर्गुण ब्रह्माला जग उत्पन्न करण्याची शक्ति एक असेल, किंवा नसेल; नसेल, तर या जगताच्या उत्पत्तीची उपपत्ति लागत नाहीं; असेल, तर 'जग उत्पन्न करण्याची शक्ति असणें' हा एक गुण तुमच्या ब्रह्माला चिकटतो!"

"शास्त्रीबुवांनां चांगलंच कचाटींत पकडलं आहे आतां!" रागिणी हंसून ह्मणाली.

"अहो, ब्रह्म हें वस्तुतः निर्गुण असून तुमच्याआमच्या दृष्टीनें तें सगुण आहे." शास्त्रीबुवांनीं अशा रीतीनें आपल्या पक्षाचें समर्थन करण्याचा प्रयत्न केला; पण त्यांचें स्वतःचेंहि या उत्तरानें समाधान झालें होतें, असें दिसलें नाहीं.

"सगुण असून निर्गुण आहे, याचा अर्थ काय?" उत्तरा हंसत ह्मणाली. "तुमचं ह्मणणं कबूल करणं ह्मणजे 'आहे' आणि 'नाहीं' यांत फरकच नाहीं, असं ह्मटलं पाहिजे. ब्रह्म हें सगुण असेल, नाहीं तर निर्गुण असेल; पण दोनहि कसं असूं शकेल?"

"'कसें' हें तुह्मांला जर कळलें असतें, तर तुह्मी ब्रह्मज्ञानीच झालां असतां!" शास्त्रीबुवांनीं मस्करीचा आविर्भाव आणून ह्मटलें. "अहो, वेदान्त समजणें सोपें काम नाहीं. तपेंच्या तपें घालावीं, तेव्हां कुठें त्याचा ओनामा थोडासा कळूं लागतो! आणि आमचीं अलीकडचीं माणसें जरा कुठें र–ट–फ करतां येऊं लागलें नाहीं तोंच लागलीं वेदान्तावर आक्षेप घ्यायला! त्यांनां वाटतें, कीं, वेदान्त ह्मणजे नुसता पोरखेळ आहे! इंग्रजी शिकलेल्या लोकांनां तर असें वाटतें, कीं, आपण सर्वज्ञ आहोंत! पण वेदान्त यांच्या आक्षेपांनां मुळींच भीक घालीत नाहीं. यांच्या प्रत्येक आक्षेपाला आमच्या वेदान्ताचें उत्तर आहेच!"

"उत्तर असतं, हें कबूल; पण हें उत्तर समर्पक असतं किंवा नाहीं, हा प्रश्न वेगळा!" उत्तरा विनोदबुद्धीनें ह्मणाली.

पण हें भाषण शास्त्रीबुवांनां फारच लागलें, व ते फार ओशाळले, आणि नंतर रागावलेहि!

चमत्कार तरी कसा तो पहा. उत्तरेचें वास्तविक आजच्या वादविवादांत विशेषसें लक्ष्यहि नव्हतें. आनंदरावांशीं लग्न झाल्यावर त्यांच्याशीं एकान्तांत कसें बोलावें, कसा विनोद करावा, कसें हंसावें, कसें खोटेंच रागवावें इत्यादि मनोरम गोष्टींविषयीं ती इतका वेळ मधुर मनोराज्य करीत होती. वरील वाक्य तिला आपलें सहज सुचलें, आणि ती विनोदबुद्धीनें बोलून गेली. पण त्याचा परिणाम भलताच झाला ! शास्त्रीबुवा तरी सहसा रागावणारांपैकीं माणूस नव्हते; पण तो योग असा आला, कीं, तेहि उत्तरेची ती साधी परंतु मर्मभेदक कोटि ऐकून संतापले, व ते पुढें दिल्याप्रमाणें आरंभीं रागारागानें व अखेर विषादानें अर्धवट आत्मगत भाषण करूं लागले.

" वेदान्तसिंह आजकाल जागृत नाहीं, तेव्हां त्याच्यावर बायकापोरांनीं सुद्धां खडे मारावे अं ! वेदान्ताची योग्यता कुठें, आणि अलीकडच्या मंडळीच्या तुटपुंज्या अन् चवचाल ज्ञानाची योग्यता कुठें ! रामकृष्ण, रामकृष्ण ! पण रामकृष्णाला तरी हांक मारण्याचा आह्मांला काय अधिकार ? आह्मी आपणाला शास्त्री–वेदान्ती–ह्मणवितों. पण आम्हांला जर खरी ब्रह्मजिज्ञासा नाहीं, तर मग इतरांनां कशी असणार ? ब्रह्मजिज्ञासाच नसल्यावर ब्रह्मज्ञान कुठलें व्हायला ? वेदान्तभक्त जे आह्मी, त्यांनांच जर वेदान्ताची पुरी ओळख नसली, तर बायकापोरांनीं वेदान्ताची चेष्टा चालविली, यांत नवल काय ? वेदान्ताचें, आमचें आणि आमच्या देशाचें नशीब, दुसरें काय ? "

"शास्त्रीबुवा," उत्तरा जराशी ओशाळून ह्मणाली. " मीं आपलं सहज थट्टेनं ह्मटलं होतं. मला वेदान्त कळत नाहीं. मी आपली तुमची मस्करी केली–वेदान्ताची नाहीं."

" उत्तरे, मी तुझ्यावर रागावलों नाहीं. पण वेदान्ताचा आजकाल जो उपहास चाललेला आहे, तो पाहून माझें मन एकादवेळेला अतिशय उद्विग्न होतें, आणि—"

" जाऊं द्या हो, तुमचें तें ब्रह्मज्ञान !" भाऊसाहेब ह्मणाले. " मला या तात्त्विक वादांचा अगदीं कंटाळा येऊं लागला आहे. पण आपण चारचौघे जमलों, ह्मणजे हे वाद निघतातच !"

" कंटाळा येऊन कसें चालेल ?" नानासाहेब ह्मणाले. "हे प्रश्न महत्त्वाचे–जिव्हाळ्याचे असल्यामुळें वारंवार उपस्थित व्हायचेच ! ब्रह्मज्ञान ह्मणजे साऱ्या

गाचें यथातथ्य ज्ञान. ज्या जगांत आपल्याला रहायचें, त्या जगाचें यथार्थ ान व्हावें, अशी आपली नेहमीं इच्छा असणारच. हे प्रश्न टाळणें शक्यच ाहीं!"

"पण ब्रह्मज्ञानासारखे मोठमोठे व व्यापक प्रश्न न घेतां लहानसेच प्रश्न चैंकरितां घेतले, म्हणजे वादाचा कांहीं तरी निकाल लागण्याचा संभव असतो." ाऊसाहेब ह्मणाले. "उदाहरणार्थ, संसार हा एकंदरींत आनंददायक आहे, ‌िवा दुःखदायक आहे, याचा आपण विचार करूं या. मला वाटतें, जग गदीं दुःखप्रचुर आहे. हें असें पापी, दुःखी, अन्यायी जग उत्पन्न करण्यांत श्वराचा काय हेतु होता कोणाला ठाऊक!"

शास्त्रीबुवा त्या वेळीं थोडेसे विषण्ण स्थितींतच होते, तरी ते जात्या श्रद्धाळु, ानंदी, उत्साही व आत्मसंतुष्ट स्वभावाचे असल्यामुळें त्यांनां हें जग ह्मणजे ाधारणपणें आनंदाचें स्थानच वाटत होतें, व एकंदरींत जगांत न्याय, सत्य, ानंद आहे, असें त्यांचें मत होतें, आणि त्यांनीं हें आपलें मत या वेळींहि ोलून दाखविलें. "जगांत एकंदरींत आनंदच आहे, यांत संशय नाहीं."

"मग हजारों लोक दुष्काळांत अन्नान्न करून मरत आहेत, त्यांचें काय रायचें?" आनंदरावांनीं आक्षेप घेतला.

"त्यांनां जाळायचें, दुसरें काय करायचें!" शास्त्रीबुवांनीं यावर शाब्दिक ोटि करून मंडळींनां हंसविलें, व आनंदरावांनां क्षणभर ओशाळें केलें.

क्षणानंतर आनंदरावहि हंसूं लागले, व ह्मणाले "दुष्काळांत भुकेनें व्याकुळ ालेले लोक आनंदांत आहेत, असें तुह्मी ह्मणणार काय? लाखों लोकांनां असें ख देणारा ईश्वर न्यायीच का समजायचा?"

"ज्यांनां हल्लीं दुःख होत आहे, त्यांनीं पूर्वजन्मीं पाप केलें असेल. त्यांनां ासन केलें, ह्मणून ईश्वर अन्यायी ठरत नाहीं."

या वेळीं शास्त्रीबुवा सगुण-ईश्वरवादी होते, निर्गुण ब्रह्मवादी नव्हते, हें आनंदरावांच्या व नानासाहेबांच्या तत्काळ ध्यानांत आलें. पण त्यांनीं ास्त्रीबुवांची ही विसंगति त्या वेळेला बोलून दाखविली नाहीं.

आनंदरावांनीं त्या वेळेला दुसराच एक मुद्दा काढला. ते म्हणाले "ईश्वर जर र्वशक्तिमान् आहे, तर त्यानें पापरहित व दुःखरहित असेंच जग कां उत्पन्न केलें

नाहीं? पाप करणारे लोकच त्यानें उत्पन्न केले नसते, म्हणजे त्यांनां शासन करण्याचा व जगांत दुःख आणण्याचा प्रसंगच आला नसता!"

" दुःख उत्पन्न करण्यांत ईश्वराचे दुसरे हेतु असतील!" शास्त्रीबुवा म्हणाले.

" पण ते काय असतील, याची कांहीं तरी आपणाला कल्पना झाली पाहिजे ना?" उत्तरेनें विचारलें.

" दुःखाशिवाय सुखाची मजा नाहीं हें एक," शास्त्रीबुवा किंचित् ज्ञानाभिमानपूर्वक म्हणाले. " दुसरें असें, कीं, दुःखाशिवाय लोक मेहनत करायचे नाहींत; आणि तिसरें असें, कीं, दुःखाशिवाय त्यांनां आपल्या नैतिक शक्तीची आत्मप्रतीति व्हायची नाहीं."

" हें शेवटलं काय आहे, मला समजलं नाहीं." रागिणी म्हणाली.

" म्हणजे असें, कीं, एकादा मनुष्य सदाचारी आहे, असें समजा. त्याला दुःख देऊन व मोह घालून त्याच्या सद्गुणाची ईश्वरानें जर परीक्षा पाहिली नाहीं, तर 'कितीहि मोह उत्पन्न झाले, तरी मी आपलें सत्त्व सोडणार नाहीं,' अशा प्रकारची त्या मनुष्याला स्वतःविषयीं खात्री वाटायची नाहीं. ईश्वरानें त्याचें अनेक प्रकारांनीं सत्त्व पाहिलें, व तरीहि तो हरिश्चन्द्राप्रमाणें सत्त्वाला जागला, म्हणजे त्याला स्वतःविषयीं जो आत्मप्रत्यय येईल, त्याची योग्यता फार मोठी आहे."

" ईश्वर आमच्या हिताकरितांच आम्हांला दुःख देतो म्हणायचा!" रागिणी उपरोधिक स्वरानें म्हणाली. " दुःख जर इतकं हितकारक आहे, तर आजपासून सगळ्यांनीं ईश्वराजवळ 'ईश्वरा, आम्हांला चांगलं दुःख दे, अन् आमचं सत्त्व पहा,' अशीच प्रार्थना करावी."

" तुम्ही माझ्या म्हणण्याची कशीहि चेष्टा करा—चेष्टाच करूं लागल्यावर कोणत्या गोष्टीची करतां यायची नाहीं? पण माझ्या मनाची खात्री आहे, कीं, ईश्वरानें दुःख, पाप वगैरे जगांत जीं उत्पन्न केलीं आहेत, त्यांचा अशा प्रकारचा कांहीं तरी उपयोग असला पाहिजे. माणसांनां किंवा मुक्या जनावरांनांसुद्धां उगाच आपलें दुःख देण्याइतका ईश्वर निर्दय नाहीं, हें खास!"

" पण," नानासाहेब म्हणाले " तुम्हाला असें नाहीं का वाटत, कीं, जगांत जर दुःख किंवा पाप नसतें, तर फार बरें झालें असतें?"

" दुःखाच्या वेळीं असें वाटतें, हें कबूल; पण तात्त्विक दृष्टीनें पाहूं लागलों, ह्मणजे अन्याय, दारिद्य, दुःख इत्यादि अप्रिय गोष्टीहि आवश्यक वाटूं लागतात. या अप्रिय गोष्टी नसत्या, तर त्यांच्याबरोबर प्रिय सद्गुणहि नाहींसे झाले असते. जगांत दुःख किंवा दारिद्य नसेल, तर मनुष्यस्वभावांतील कांहीं उच्च मनोवृत्ति नाहींशा होतील. दुःख नसल्यास दया किंवा दानशूरता या मनोवृत्तींनां जागाच नाहीं. जगांत अन्याय नसता, तर न्यायबुद्धि जागृत व तेजस्वी राहिली नसती. पाप नसतें, तर क्षमेसारखी सात्त्विक उच्च मनोवृत्ति लुप्तप्राय झाली असती. जगांत संकटें नसतीं, तर संकटांनां न डगमगतां त्यांनां तोंड देण्याचें, व दिव्य स्वार्थत्याग करण्याचें सामर्थ्य कसें उत्पन्न होईल ? आणि आपणांमध्यें हें सामर्थ्य आहे, याविषयीं आत्मप्रत्यय तरी कसा उत्पन्न होईल ? "

या वक्तृत्वपूर्ण भाषणाचा आईसाहेब, रागिणी व आनंदराव यांच्यावर कितीहि अनुकूल परिणाम झाला असला, तरी नानासाहेब वगैरे इतर तर्कप्रधान मंडळीवर त्याचा विशेष परिणाम झाला नाहीं. उत्तरा तर हंसूंच लागली. ती हंसत ह्मणाली "दुःख, दारिद्य, दुराचार, निष्ठुरता, अन्याय इत्यादि सर्व आमच्या हिताकरितांच आहे ह्मणायचं !"

" अन्याय वगैरे जगांत नाहींच. " शास्त्रीबुवा अबुद्धिपुरःसर मुद्दा बदलून म्हणाले. "आपल्या कोत्या दृष्टीला जो अन्याय वाटतो, तो उच्चतर दृष्टीनें अन्याय नाहींच. एकंदरीनें व विशाल दृष्टीनें पहातां जगांत न्यायच आहे. इतिहासाकडे पाहिलें असतां **'सत्यमेव जयते'** हेंच तत्त्व दिसून येईल.

" पापी लोकांचा जय तर रोज दिसतो आहे !" भाऊसाहेब ह्मणाले.

" तो तात्पुरता आहे." शास्त्रीबुवांनीं उत्तर दिलें. " अखेर सत्याचाच जय व्हायचा ! सूक्ष्म व खोल दृष्टीनें पहातां जग हें वाईट नाहीं. तें सत्यमय व आनंदमय आहे."

"मला वाटतें, जग हें मातीसारखें आहे; तें चांगलें नाहीं, व वाईटहि नाहीं." आनंदराव ह्मणाले. आनंदराव कधीं विशेष बोलत नसत; पण बोलूं लागले, ह्मणजे एकाद वेळेला ते पुस्तकी भाषा वापरून वक्त्याच्या पद्धतीनें भाषण करीत असत; त्यांच्या या स्वभावविशेषाचा मागें निर्देश झालाच आहे. तेव्हां याच्या पुढील भाषणाचें वाचकांनां आश्चर्य वाटणार नाहीं.

"मातीचा तुह्मीं घट केलात, तर घट होईल;" दुसरें कांहीं केलेंत, तर दुसरें कांहीं होईल. सगळें तुमच्या हातांत आहे. आतां एवढी गोष्ट खरी, कीं, घट करण्याची आपली इच्छा असली, म्हणजे घट होईलच, असें नाहीं; कारण, एकाद्या मातीचा घट होतच नाहीं. पण सांगण्याचा मुद्दा हा, कीं, जग ही एक निश्चित घडीव वस्तु नाहीं; ती मृत्तिकेसारखी घटनयोग्य वस्तु आहे. किंवा दुसरी उपमा द्यायची ह्मणजे जग म्हणजे आनंदमय उद्यान नाहीं, किंवा दुःखमय भयंकर अरण्यहि नाहीं. जग ही एक कृषिक्षमभूमि आहे. या भूमींत झाडें लावून तुम्ही जर सुंदर उद्यान बनविलेंत, तर येथें उद्यान होईल; धान्य लावलेंत, तर धान्य उगवेल; व दुसरे चांगले किंवा वाईट वृक्ष लावलेत, तर चांगले किंवा वाईट वृक्ष उत्पन्न होतील. जग हें ईश्वरानें आनंदमय केलेलें नाहीं, व दुःखमयहि केलेलें नाहीं. या जगांत आपल्या कर्मांवर ईश्वरानें पुष्कळ गोष्टी ठेविलेल्या आहेत. ईश्वर न्यायी नाहीं, व अन्यायीहि नाहीं. सर्वांनीं आपले व्यवहार न्यायानें चालविले, तर जगांत न्याय आहे; अन्यायानें चालविले, तर अन्याय आहे. सर्व कांहीं आपल्या हातांत आहे. आपण ईश्वरनिर्मित नियमांनीं बद्ध होऊन घड्याळांतील चाकांसारखे फिरत नाहीं. जग हें एक ईश्वरनिर्मित अवाढव्य यंत्र नाहीं, व आपण याच्यांत अवयवभूत चक्रांप्रमाणें फिरतहि नाहीं! 'जग हें ईश्वरी तंत्राप्रमाणें चालणारें एक यंत्र आहे,' या मतापेक्षां 'आपण जशा प्रकारची बाग बनवूं तशा प्रकारची बाग जगांत होणार आहे,' हें मत किती स्वाभिमानाचें, आनंददायक व स्फूर्तिदायक आहे!"

"'स्वाभिमानाचें' ह्मणण्यापेक्षां 'गर्वाचें–उद्धटपणाचें' आहे, असें ह्मणा." शास्त्रीबुवा उलट ह्मणाले. "तुम्ही कोण जगाची बाग बनविणार? तुमच्या हातांत आहे काय?"

"आमच्या हातांत सर्व कांहीं आहे—"

आनंदरावांचें पुढचें भाषण तेथेंच थांबलें! कारण, वरील शब्द त्यांनीं उच्चारले असतीलनसतील, तोंच त्या मंडळींनीं 'शांबाय, शांबाय!' अशा प्रकारचा मोठा कर्कश आवाज ऐकला. या शब्दांचा अर्थ त्या रानटी लोकांच्या भाषेंत 'दीन, दीन!' किंवा 'हरहर महादेव!' अशा प्रकारचा आहे, हें आनंदरावांनां ठाऊक होतेंच. ते अगदीं भांबावून गेले. इतक्यांत मठाभोंवतीं मोठा गोंधळ चालल्याचा त्या मंडळींनां भास झाला, व ते लक्ष्य देऊन काय प्रकार आहे, याचा विचार

करूं लागले. नरमांसभक्षक कारिसेन लोकांचा तर हा हल्ला नाहीं ना ? असा त्यांनां एकदम विचार सुचला, व ती मंडळी आपापल्या ठिकाणीं अत्यंत आश्चर्यचकित होऊन गेली.

शास्त्रीबुवा कांहीं शब्द उच्चारणार, इतक्यांत फरस व धनुष्यबाण घेतलेले असे वीसपंचवीस लोक एकापाठीमागून एक आंत घुसले, व " जागेवरून जो हलेल त्याचें गर्दन छाटून काढूं!" अशा अर्थाचीं वाक्यें त्यांपैकीं एकजण–त्यांचा नायक–आपल्या भाषेंत ह्मणाला.

आनंदराव व टिल्लू यांच्याशिवाय इतरांनां जरी ती भाषा अवगत नव्हती, तरी त्या नायकाच्या व त्याच्या अनुयायांच्या आविर्भावांवरून वरील भाषणाचा त्यांनां अर्थ कळून चुकलाच. या अचानक उद्भवलेल्या प्रकरणामुळें मंडळी प्रथम भयभीत ह्मणण्यापेक्षां–आश्चर्यचकित झाली. हें प्रकरण काय आहे, हें त्यांनां क्षणभर कळलेंच नाहीं, आणि पुढें कळल्यावर ' या रानटी लोकांच्या आपण पूर्णपणें ताब्यांत गेलों आहों,' हेंहि त्यांच्या पूर्णपणें ध्यानांत आलें, व गडबड करण्यांत कांहीं अर्थ नाहीं, असें समजून ते एकमेकांकडे पहात स्तब्ध बसले.

नायकाच्या आज्ञेनें ते क्रूर जंगली लोक त्यांचे हात बांधूं लागले. मंडळींनींहि या गोष्टीला त्यांनां प्रतिबंध केला नाहीं.उलट जाण्याची तेथें सोयच नव्हती. जें जें होईल तें तें पहात रहावें, अशापैकीं ती वेळ होती.

त्यांचे हात बांधावयाला कितीसा वेळ लागणार ? दोन मिनिटांत ती सर्व मंडळी कैदी झाली,–पांच मिनिटांपूर्वींच ईश्वराला आरोपी करून तो न्यायी का अन्यायी,याचा अभिमानानें निवाडा करूं पहाणारी ही न्यायाधीश मंडळी आतां रानटी लोकांच्या हातांत कैदी झालेली आहे, ही देवाची लीला, कीं दैवाची, कीं कोणाची ?

हात बांधून झाल्यावर नायकानें मंडळीला उठून उभे रहाण्याची हातानें खुणा करून आज्ञा दिली, व त्यांनीं तसें केल्यावर आपले लोक जिकडे नेतील तिकडे जाण्याविषयीं त्यांनीं हुकूम सोडला.'चालतांना जर कोणीं गडबड केली, किंवा पळून जाण्याचा प्रयत्न केला, तर तेथच्या तेथें त्याची भाजी करून टाकूं ! ' असाहि त्यानें धाक घातला.

# दैवाचा घाला.

भाऊसाहेब, नानासाहेब, शास्त्रीबुवा व आनंदराव धिम्मेपणानें चालूं लागले. जनुभाऊ गयावयां करून प्राणदान मागूं लागले, पण त्याबद्दल त्यांनां बरेंच गालिदान मिळून दोनचार गचांड्या 'भूयसी दक्षिणा' म्हणून मिळाल्या. आईसाहेब बिचाऱ्या ओक्साबोक्शीं रडूं लागल्या. पण त्यांनां एका हलकट म्हाताऱ्यानें एक गुद्दा दिला, व " ए थेरडे, रडलीस तर कुदकून काढूं ! " अशा अर्थाचे शब्द उच्चारून दरडावून त्यांनां गप्प बसविलें.

उत्तरेचा हात धरून एक उंच व सडपातळ मनुष्य तिला अर्धवट ओढीत नेत होता, व तिच्यासंबंधानें अचकटविचकट भाषण करून आपल्यासारख्याच नीच संवगड्यांबरोबर फिदीफिदी हंसत होता. दहा मिनिटांपूर्वीं हीच उत्तरा आनंदरावांशीं लग्न झाल्यावर काय बोलावें, कसा विनोद करावा, याविषयीं विचार करीत होती, व आपल्याच आनंदांत गर्क होती; पण तिचीच का ही अवस्था व विटंबना !

रागिणीचे तर उत्तरेहूनहि अधिक हाल झाले. तिच्याकडे पापाची दुष्ट नजर टाकून एका धीट व साहसी नरपशूनें तिचें वाटेंत चालतांचालतांच सर्वांच्या समोर चुंबन घेण्याचा प्रयत्न केला; पण तिनें एकदम तोंड फिरविल्यामुळें ती त्या निंद्य अपमानांतून वांचली, हें तिचें नशीबच म्हणावयाचें ! पण लवकरच त्या दुष्टानें तसल्याच प्रकारचा पुनः प्रयत्न केला. परंतु त्या वेळीं त्याच्या जवळच्याच एका तरुणानें त्याचा निषेध करून त्याला ढकलून दिलें म्हणून बरें झालें.

हाय, हाय ! काय या बायकांची स्थिति ही ! ईश्वरा, त्या वेळेला तूं निजला होतास काय ? का, तूं जाणूनउमजून त्यांच्या पूर्वकर्माबद्दल त्यांनां हें शासन केलेंस ? पण अशा प्रकारच्या विटंबनेला पात्र होण्यासारखें त्यांनीं असें पाप तरी काय केलें होतें, हें ईश्वरा, तुझें तुलाच ठाऊक ! आम्हीं मानवांनीं याविषयीं मौन धरून स्वस्थ बसावें, व तुझी विचित्र लीला पहात रहावें, याशिवाय दुसरें आमच्या हातांत काय आहे ?

## प्रकरण चवदावें.

## कटोहाला बळि.

कारिसेन लोकांची व त्यांच्या कामी व दुष्ट ‘ किनतोब्या ’ची मागें थोडीशी माहिती दिलीच आहे. तीवरून या लोकांनीं आपल्या विजयगांवकर मंडळीला कां पकडून नेलें, याचें मर्म वाचकांच्या ध्यानांत आलें असेलच. त्यांच्या जातीपैकीं एकजण टिल्लूनें मारला, या गुन्ह्याबद्दल शासन करावयाचें, व आपल्या जातीचा जो या परकी लोकांनीं अपमान केला, त्याबद्दल त्यांनां चांगलें शासन करावयाचें, हा त्यांचा एक हेतु असला पाहिजे, हें उघड आहे; पण उत्तरेसंबंधाची त्यांच्या ‘ किनतोब्या’ची कामात्मक इच्छा या निंद्य कृत्याला मुळींच कारणीभूत झाली नाहीं, असें ह्मणतां येणार नाहीं, हें वाचकांनां ठाऊक आहेच.

कारिसेन लोकांपैकीं मात्र फार थोड्यांनांच ही दुसरी गोष्ट कळलेली असेल. त्यांच्या मनांतून या काफीर लोकांचे तुकडे करून त्यांनां ‘कटोहां’त बळि देऊन त्यांचें मांस खावयाचें होतें ! शत्रूंचें मांस या कटोहांत भाजून सर्वांनीं मिळून खाल्ल्याशिवाय त्यांचा पुरा सूड उगवला जात नाहीं, अशी या कारिसेन लोकांची समजूत होती. एकाद्याच्या बापाला, भावाला, आईला किंवा कुटुंबांतील दुसऱ्या एकाद्या माणसाला एकाद्यानें मारलें असल्यास मारणाराचें मांस या ‘कटोहां’त भाजून खावें, ह्मणजे मारले गेलेले पूर्वज संतुष्ट होतात, अशीहि त्यांची समजूत होती. पण त्यांच्या धार्मिक समजुतीचें सविस्तर वर्णन करण्यापेक्षां प्रस्तुत विषयाकडे वळलेलें बरें.

विजयगांवकर मंडळींनां पकडून आणण्याकरितां फरसवाले पंचवीसतीस लोक पाठवून ही रानटी अथवा राक्षसी मंडळी कटोहाभोंवतीं जमली, व शत्रूला पकडून आणावयाला किती वेळ लागेल, शत्रु लढाई करील कीं काय, केल्यास निकाल काय होईल, कैद करून आणलेल्या लोकांनां आजच मारून खावयाचें कीं उद्यां, इत्यादि बाबतींविषयीं आपापसांत चर्चा करूं लागले. अचानक छापा घालण्यांत येणार असल्यामुळें मारामारी वगैरे कांहीं होणार नाहीं, असें कांहीं लोकांचें ह्मणणें होतें; परंतु दुसरे कांहीं म्हातारे लोक ह्मणत होते, कीं, “शत्रू-जवळ ‘ फटफट्या ’ (ह्मणजे बंदुका) असल्यामुळें ते मारामारी करतील, व या ‘फटफट्यां’नीं ते आपल्या सर्व लोकांनां मारूनहि टाकतील !” या भ्याडपणाच्या भाषणाबद्दल एका तरुणानें त्या ह्मातार्‍यांनां दोष दिला, व “माझ्या फरसानें

त्यांच्या पन्नास फटफट्यांचा मी चुराडा करीन," असें तो ह्मणाला, व त्याच्या या भाषणाबद्दल त्याची तेथील सर्व लोकांनीं वाहवा केली, आणि ह्मातार्‍यांनां आपला शहाणपणा आपल्याशींच ठेवावा लागला. आपला आब जाऊं नये ह्मणून त्यांनीं लौकरच विषय बदलला, व दुसर्‍या गोष्टींची ते चर्चा करूं लागले.

चर्चेला विषय कांहीं थोडे नव्हते; उदाहरणार्थ,'मीरबल'हा किनतोबा होण्याला योग्य आहे किंवा नाहीं, हल्लींचा 'किनतोबा' फार वृद्ध, कावेबाज व उद्धट होत चालला आहे किंवा कसें, इत्यादि विषय चर्चेला योग्यच होते. ही चर्चा मोठ्या स्वरांत मात्र होत नसे,हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. कांहीं लोक अर्थात्‌च मीरबलच्या बाजूचे होते, व कांहीं लोक अधिकारारूढ किनतोब्याच्याच बाजूचे होते. या दुसर्‍या पक्षाचें असें ह्मणणें होतें, कीं, ' मीरबल शूर असला, तरी त्याच्यांत धूर्तता कमी आहे. किनतोब्याचा मान ज्याला मिळावयाचा, तो शूर असून अनुभविक, चाणाक्ष असा असावा. ' सध्याच्या किनतोब्यामध्यें हे गुण विशेषेंकरून आहेत, असें ते प्रतिपादन करीत. त्यांच्याविरुद्ध पक्षाचे लोक ह्मणत, कीं, 'सध्यांच्या किनतोब्यानें पूर्वी शौर्य गाजविलें असेल; पण तो आतां ह्मातारा झाला आहे, व एकाद्या शत्रूशीं लढाईचा प्रसंग आला असतां त्याचा कांहीं उपयोग नाहीं. मीरबलला त्यानें आपण होऊन किनतोब्याचें पद द्यावें, नाहीं तर तो तें पद हिसकावून घेईल; मीरबलला त्याच्याएवढा अनुभव नसला, तरी तो व्यवहारांत हुषार आहे, व तो कावेबाज तरी नाहीं.'

हा वाद चालला असतां मध्येंच कोणी तरी 'मवाणी' ह्याचें नांव सुचवावयाचा, व 'हा मीरबलासारखा शूर असून त्याच्यांतले दोष मात्र याच्यांत मुळींच नाहींत,' असें म्हणावयाचा ! 'मीरबल हा रागीट आहे, तो लवकर संतापतो, संतापाच्या भरांत पाहिजे तें बोलून जातो, व पाहिजे तें करतो,' अशा प्रकारचे त्याच्यावर आक्षेप घेऊन ' मवाणी ' हाच किनतोबा होण्यास योग्य, असें ते सुचवीत.

या लोकांमध्यें वरील प्रकारची चर्चा चालू असतां, एकजण एकदम ' आम्, आम् ( आले, आले, )' असें ओरडला, व सर्व लोकांची दृष्टि आश्रमाच्या दिशेकडे लागल्यावर त्यांनां त्यांचे ज्ञातिबांधव व आपली विजयग्रामवासी कैदी मंडळी दिसली, व त्यांनीं आनंदाच्या आरोळ्या ठोकल्या! त्याबरोबर झोंपड्यांतील बायकामुलेंहि आमच्या मंडळीच्या दर्शनार्थ बाहेर पडलीं. काम फत्ते करून

आलेले जातिबांधव अगदीं जवळ आलेले पाहून त्यांनीं 'शाबास, शाबास!' अशा अर्थाचे ध्वनि करून त्यांचें अभिनन्दन केलें, व सर्व मंडळी कटोहाच्या भोंवतीं अर्धचंद्राकार बसली. 'किनतोबा' तेवढा एका मोठ्या ओंड्यावर उच्च स्थानीं बसला होता. बाकी सर्व खालीं ओंड्यांवर, लांकडांवर किंवा नुसत्या जमिनीवर बसले होते.

कैदी मंडळींनां या लोकांनीं आपल्या अर्धचंद्राकार सभेच्या एका टोंकाला बसविलें, व त्यांच्या पाठीमागें फरसवाले लोक खडे राहिले. त्यांच्या या जंगली 'पार्लमेंट' सभेंत किंवा कोर्टांत बायका व मुलेंहि आलीं होतीं. बायका आपल्या नवऱ्यांजवळ जाऊन बसल्या. त्यांनां ह्मणजे नवऱ्याची लाज वाटत होती, असें मुळींच दिसलें नाहीं. लाज तरी वाटेल कशी? त्या बहुतेक पुरुषांसारख्याच होत्या. पुरुषांसारख्याच त्यासुद्धां बहुतेक नग्नप्राय होत्या, व पुरुषांप्रमाणेंच त्या ताकदवानहि दिसत होत्या. त्यांचे केंस विंचरलेले वगैरे कांहीं नसून आपल्याइकडील बैराग्यांच्या जटांपेक्षां अधिक जटा त्यांच्या डोकीवर होत्या! थोडक्यांत सांगावयाचें, म्हणजे त्या स्त्रिया या 'स्त्रिया' आहेत, हें चर्येवरून विशेष न दिसतां त्यांचा उरःप्रदेश उघडा होता, यांवरूनच ओळखतां येत होतें. या रानटी स्त्रिया उत्तरेकडे व रागिणीकडे टक लावून कौतुकानें पहात होत्या,—आपण पिंजऱ्यांतील एकाद्या पोपटाकडे किंवा मैनेकडे जसें कौतुकानें पहातों, तशाच कौतुकानें त्या उत्तरेकडे व रागिणीकडे पहात होत्या! यापेक्षां दैवविलसिताचें दुसरें चांगलें उदाहरण सांपडेल काय?

आईसाहेबांनीं तो पेटलेला प्रचंड 'कटोह', त्यांत ठेवलेल्या एका भांड्यांत घातलेलें बैलाचें मांस व तें मांस करपूं नये म्हणून एका लांब काठीनें खालींवर करून ढवचणाऱ्या त्या अक्राळविक्राळ ह्माताऱ्या बाया, ते कल्लेवाले काळेकुट्ट क्रुर जंगली लोक, इत्यादि प्रकार पाहिल्याबरोबर त्या धाय मोकलून रडूं लागल्या. उच्चस्थानीं बसलेल्या किनतोब्याकडे सहजस्फूर्तीनेंच वळून त्याला त्या स्फुंदत-स्फुंदत ह्मणाल्या "महाराज, आह्मी गरीब ब्राह्मण आहों, आम्ही पाहिजे तर उद्यां निघून जातों. आम्ही आपले—"

त्यांची अशा प्रकारची विनवणी पुरी झाली नाहीं तोंच त्यांच्या पाठीमागें उभा राहिलेल्या एका जवानानें आपल्या भाषेंत त्यांनां बऱ्याच शिव्या हांसडल्या, व एक ठोसा मारून त्यांनां गप्प बसावयाला सांगितलें. शूर व उदार मीरबलाला

हा क्रूरपणा आवडला नाहीं, व त्यानें त्या जवानाला दटावून 'बायकांवर हात टाकीत जाऊं नकोस!' असें त्याला बजावून सांगितलें. मीरबलाचें हें औदार्य पाहून त्या क्रूर लोकांनांहि त्याच्याविषयीं अधिक आदर वाटूं लागला, व ते 'मीरबल हा लढाईंत सिंहासारखा आहे; पण लढाईनंतर गाईसारखा गरीब आहे,' अशा प्रकारची आपापसांत त्याची स्तुति करूं लागले. किनतोबा राजानेंहि आपल्या मनाचा थोरपणा दाखविण्याकरितां "या कैद्यांनां नाहक मारूं नका," असें आपल्या मंडळीला सांगितलें.

विजयगांवकर कैद्यांनां पाहून त्या जंगली कारिसेन 'दर्ग्या'त–ह्मणजे सभेंत–प्रथम हरतऱ्हेची कुजबुज झाली. कोणी रागिणीकडे, उत्तरेकडे व आनंदरावांकडे पाहून 'यांचें लुसलुशीत मांस फार चांगलें लागेल,' असें म्हणाले; तर कोणी 'पुरुषांनां ठार मारून बायकांनां जीवंत ठेवावें,' असें कामात्मक स्वार्थबुद्धीनें सुचवूं लागले! कांहीं स्त्रियांनीं त्यांच्या पोषाखांची व दागिन्यांची मस्करी केली; पण कांहीं प्रांजलबुद्धीच्या स्त्रिया आपल्या जिवलग मैत्रिणींपाशीं त्यांच्या सौंदर्याची तारीफ करूं लागल्या! कांहींनां तर त्यांची असूयाच वाटूं लागली. विशेषतः मीरबल व मयाणी यांच्या बायकांनां व खुद्द किनतोब्याच्या बायकोला त्यांची असूया फारच तीव्रतेनें भासूं लागली! त्यांनां आपल्या पतींच्या चंचल स्वभावाची माहिती होती, व त्यांच्या मनांत जी इच्छा उत्पन्न होईल, ती सफल करून घेण्याची त्यांच्या अंगांत हिंमत व शक्ति आहे, हेंहि त्यांनां ठाऊक होतें. त्यांनां अशी भीति पडली, कीं, शत्रूच्या या सुंदर स्त्रियांनां आपले नवरे भुलून जातील, व ते आपल्या आवडत्या स्त्रीकरितां प्राण जाईतोंपर्यंत लढतील. यांपैकीं एकादी स्त्री आपल्या नवऱ्यानें पटकावली, ह्मणजे आपलें वजन कमी होणार, अशीहि त्या स्त्रियांच्या मनांत भीति पडली! स्त्रियांचें मन संशयी ह्मणतात तें खोटें नाहीं. असो.

वरील प्रकारची कुजबुज थांबल्यानंतर किनतोब्यानें 'या कैद्यांनां कोणती शिक्षा द्यावयाची,' हा प्रश्न विचाराकरितां काढला. नानासाहेबांनां त्यांची जरी भाषा समजत नव्हती, तरी तो 'दर्गा' कसला विचार करीत आहे, हें त्यांनां समजणें कठिण नव्हतें. ते किनतोब्याकडे वळून "आह्मी निरपराधी आहोंत, आह्मांला तुह्मी कां मारतां?" असें विनवणीच्या स्वरानें हिंदुस्तानींत विचारूं लागले.

"कैदी काय ह्मणत आहे?" किनतोब्यानें हिंदुस्तानी जाणणाऱ्या एका दुभाष्याला विचारलें.

त्यानें अर्थ सांगितल्यावर किनतोबा त्या दुभाष्याला ह्मणाला "या कैद्यांनां सांग, कीं, तुम्ही आमच्या या राज्यांत आलेत, व किनतोब्याला कांहीं नजराणा दिला नाहीं, व आमच्या राज्यांत येऊन आमच्या जातींतील एक स्त्री पळवून नेलीत, आणि आमचा एक 'शूर वीर ठार मारलात, तेव्हां तुह्मांला आह्मी आजच्या आज ठार मारून खाऊन टाकणार !"

दुभाष्यानें हा अर्थ मोडक्यातोडक्या हिंदुस्तानींत व्यक्त केल्यावर नानासाहेब उत्तरादाखल हिंदुस्तानींतच नम्रपणें म्हणाले "आम्हांला तुमची चालरीत ठाऊक नव्हती, म्हणून आम्हीं तुम्हांला नजराणा दिला नाहीं. आम्हांला तुम्ही सोडून द्या, म्हणजे आम्ही तुम्हांला पाहिजे ती वस्तु नजर करूं. 'तुमच्या जातीची एक बायको आम्हीं पळवून आणली,' असें तुम्ही म्हणतां; पण हें म्हणणें चुकीचें आहे. ती स्त्री आपखुषीनें आमच्याकडे आली. आह्मीं कोणत्याहि प्रकारची बळजबरी केली नाहीं. तुम्हीं मात्र आम्हांला विनाकारण बळजबरीनें पकडून आणलें आहे."

नानासाहेबांचें अशा तऱ्हेचें कोर्टांतील वकिली पद्धतीचें भाषण त्या दुभाष्याला कितपत समजलें, व त्या कारिसेन रानटी जातीला कितपत रुचलें, हें सांगणें जरासें कठिणच आहे. एवढें मात्र सांगतां येईल, कीं, त्यांचा 'किनतोबा' या 'मग्रुरी'च्या भाषणानें संतापून गेला, व त्यानें नानासाहेबांनां पांचदहा शिव्या हांसडून गप्प बसण्यास सांगितलें, आणि "तुह्मी गुन्हेगार नसलेत, तरी तुह्मी आमचे शत्रु असल्यामुळें तुमचें आह्मी आज मांस खाणारच," असें अर्धवट थट्टेनें, अर्धवट गांभीर्यानें, अर्धवट आपल्याशीं, अर्धवट नानासाहेबांनां उद्देशून, व अर्धवट आपल्या ज्ञातिबांधवांनां उद्देशून ह्मटलें.

आपलें भाषण आपल्या सभेला कसें काय रुचतें, हें पहाण्याचा त्या धूर्त किनतोब्याचा इरादा होता, व तो सफलहि झाला. 'तुमचें मांस आह्मी आज खाणार,' अशा प्रकारची त्याची ग्राम्य मस्करी त्या रानटी सभेपैकीं बऱ्याच जणांनां रुचली, व त्यांनीं आपलें अनुकूल मत हास्यानें दर्शविलें.

या अवधींत मीरबल, मयाणी वगैरे प्रमुख लोकांनीं मौन धरलें होतें. तेव्हां यांचा अभिप्राय काय आहे, हें पहाण्याच्या उद्देशानें तो कावेबाज वृद्ध 'किनतोबा'

मीरबलाकडे वळून ह्मणाला "मीरबल, पाहिलें ना, कसे हे कैदी लुच्चे आहेत ते ? आपले शूर लोक मारून व आपली एक बाई पळवून नेऊन ते आपल्यावरच दोष ठेवीत आहेत ! आपणच खून करावा, व आपणच आपल्याला जखम करून ओरडूं लागावें, अशांतलाच प्रकार आहे या लुच्चांचा !"

थोडेंसें मस्करीनें, थोडेंसें मनापासून व थोडेंसें दुसऱ्याचें मन पहाण्याकरितां केलेलें हें भाषण शूर व उदार मीरबलाला पसंत पडलें नाहीं. "कैद्यांचें ह्मणणें बरोबर दिसतें." तो गांभीर्यानें ह्मणाला. "आपल्या कारिसेन शूरानें दुसऱ्याची स्त्री जबरदस्तीनें उचलून आणली, तर आपला देव जसा आपल्यावर रागवत नाहीं, तसें ती मुलगी उचलून नेणाराला शत्रूंनीं मारलें, तर आपण कां संतापावें ? वीरांचें हें कामच आहे, कीं, आपल्या मनगटाच्या जोरावर आपणांला योग्य वाटेल तें करावें. माझे हे लोक शत्रु आहेत, व मी यांचें मांस आज आनंदानें खाईन. पण हे लोक लुच्चे आहेत, असें मी म्हणणार नाहीं. शत्रूला मारावें, हा जसा आमचा धर्म आहे, तसा त्यांचाहि आहे."

आश्चर्य हें, कीं, मीरबलाचें हें प्रतिकूल भाषणहि त्या चंचलवृत्ति अविचारी रानटी लोकांनां पसंत पडलें, व त्यांनीं मीरबलाच्या औदार्याविषयीं आपणांला वाटत असलेला आदर रानटी पद्धतीनें—ह्मणजे टाळ्यांनीं व आरडाओरड करून—दर्शविला. किनतोब्याला अर्थात्च हें रुचलें नाहीं. त्याला हा एक आपला अपमानच झाला, असें वाटलें, व त्यानें दांतओंठ चावले. पण उलट बोलून मीरबलाला त्वेष आणण्याची त्याची छाती नव्हती. मीरबल हा शूर व सर्व लोकांनां प्रिय असल्यामुळें, व तो उच्च कुलांतला असल्यामुळें तो पुढेंमागें 'किनतोबा' पदवीची इच्छा धरील, व त्याला या कामीं यशहि येईल, अशी त्याला भीति होती. तेव्हां तो धूर्त म्हातारा मीरबलाला आपण होऊनच मोठा मान देऊन त्याचें मन नेहमीं संतुष्ट ठेवीत असे—हेतु हा, कीं, मीरबलाच्या मनांत 'किनतोबा' होण्याची महत्त्वाकांक्षा येऊंच नये. मीरबलाला बाहेरून त्यानें किती जरी मान दिला, तरी आंतून तो त्याचा अत्यंत द्वेष करीत असे, व 'मयाणी' व इतर योद्धे यांच्यामध्यें व याच्यामध्यें कलह लावून देण्याचा प्रयत्न करीत असे, हें धूर्त वाचकांनीं ओळखलेंच असेल. असो. सांगण्याचा भावार्थ हा, कीं, किनतोब्याला जरी मीरबलाचें प्रतिकूल भाषण रुचलें नाहीं, तरी त्यानें तो अपमान गिळला, व बाहेरून "मीरबलाचेंहि ह्मणणें खरें आहे," असें ह्मणून कशी तरी त्यानें

वेळ मारून नेली. इतकेंच नव्हे, तर खुबीनें मीरबलाच्या शौर्याची व औदार्याची स्तुति करून त्याच्याविषयीं आपल्या मनांत कांहींएक असूया किंवा रोष नाहीं, असें त्यानें सर्वांनां दाखविलें, व मीरबलाचेंहि मन आपल्याकडे ओढून घेतलें. मीरबल लढाईत बहादूर होता, पण त्याचें मन लहान मुलासारखें किंवा तरुण स्त्रीसारखें स्तुतीला भुलणारें व वश होणारें होतें. असो.

"मग या कैद्यांनां सोडून द्यायचें का कसें?" किनतोब्यानें सभेला उद्देशून ह्मटलें. "मला वाटतें, त्यांनां सोडूं नये; निदान कैदी पुरुषांनां तर मुळींच जिवंत ठेवूं नये. बायकांवर दया करूं या. पण पुरुषांनां तरी मारावेंच, असें मला वाटतें. त्यांतून तुह्मांला कोणाला जर सोडून देणें रास्त वाटत असेल, तर मग सर्वांनांहि मी सोडून द्यायला तयार—"

"'सोडून द्यावें,' असें मी ह्मणत नाहीं." मीरबल ह्मणाला. "आपले ते शत्रु आहेत, त्यांचें आपण आज मांस खाल्लेंच पाहिजे. आपण त्यांनां आपल्या शौर्यानें जिंकलें आहे, तेव्हां आजच्या आज त्यांचें रक्त व त्यांचें मांस आपल्या पोटांत गेलें पाहिजे. उद्यां त्याच्यांत मौज नाहीं."

उत्तरेला, रागिणीला, आईसाहेबांनां कारिसेनी भाषा येत नसली, तरी वरील भाषणाचा अर्थ कळला, व त्यांचें हृदय धडधडूं लागलें. त्या मोठमोठ्यानें रडूं लागल्या. पण त्यांचें रडणें कोणालाच ऐकूं गेलें नाहीं. कारण, मीरबलाचें भाषण संपल्याबरोबर सर्व सभेनें 'कदान, कदान, कदान, (काटा—काटा-काटा)' अशी ओरड केली, व त्याबरोबर शत्रूचा बळि घेण्याचें मानाचें काम पिढीजाद करणारे तीन तरुण लोक आपले फरस सावरून आपल्या विजयगांवकर ब्राह्मण कैद्यांजवळ गेले, व 'किनतोब्या'च्या तोंडून 'मारा' असा शब्द निघतो केव्हां, व आपण यांचें गर्दन कापतों केव्हां, अशा उत्सुकतेनें तेथें उभे राहिले.

प्रत्यक्ष मूर्तिमंत यमदूतच ह्मणावयाचे ते! त्यांनां पाहून मंडळींचें धाबें दणाणलें. बिचाऱ्यांचा मरणसमयच जवळ आला. आनंदरावांनीं व उत्तरेनें एकमेकांकडे पाहिलें, व लगेच माना खालीं घालून तीं मरणकालीन निराशदृष्टीनें भूमीकडेच पहात राहिलीं. त्या वेळीं त्यांनां रडूंसुद्धां पारखें झालें! भाऊसाहेबांनीं रागिणीकडे पाहिलें, तों ती डोळे मिटून ईश्वराचें स्मरण करीत असावी, असें त्यांनां वाटलें. तिची मुद्रा शांत आहे, असें पाहून व तिचें मन ईश्वरसंलग्न आहे, असें वाटून त्यांनां दुःखांतहि एकपरी सुख झालें! त्यांनीं नंतर शास्त्रीबुवांकडे

पाहिलें. त्यांनां विजयगांवांतील आपल्या बायकोची व मुलांची आठवण होऊन कीं काय, ते लहान मुलाप्रमाणें रडत आहेत, असें त्यांनां दिसलें, व शास्त्रीबुवांचा वेदांत जंगली लोकांसमोर गयावयां करून ओरडूं लागतो, व त्यांचा शांत ब्रह्मानंद रानटी लोकांच्या फरसापुढें कांपूं व रडूं लागतो हा विचार मनांत येऊन क्षणभर–क्षणभरच–त्यांनां जराशी मौज वाटली. शास्त्रीबुवांची ही अवस्था पाहून जनुभाऊंच्या वेडगळ बरळण्याचें त्यांनां कांहींच आश्चर्य वाटलें नाहीं. नानासाहेब आपल्या पत्नीचें समाधान करण्याचा प्रयत्न करीत होते.

ईश्वरा, या सात्त्विक ब्राह्मणांवर तूं असा प्रसंग कां आणलास? तुझ्याविषयीं त्यांनीं दोन घटकांपूर्वी नाना कुतर्क काढले, ह्मणून का त्यांनां हें शासन? ईश्वरा, आनंदराव, रागिणी, उत्तरा यांच्यासारख्या कोमल फुलांनां जीवितलतिकेपासून तुला तोडावयाचेंच होतें, तर त्याला या रानटी लोकांच्या फरसासारखें क्रूर शस्त्र उभारणें जरूर होतें काय? आणि ही विटंबना आणि ही शोभा कशाला हवी होती? त्यांनां एकान्तांत कोठें तरी तुला देहान्तशासन नसतें का करतां आलें? आपल्यासमोर रागिणीचें मुखकमल क्षणार्धांत फरसानें उडवलें जाणार, अशा दुर्धर स्थितींत भाऊसाहेबांनां घालण्यांत तुझा काय हेतु असावा? आनंदराव व उत्तरा यांनां विवाहसुखसरोवराच्या रम्य तीराशीं नेऊन, तेथील सुख त्यांनीं डोळ्यांनीं क्षणभर अनुभविलें नाहीं, तोंच त्यांची तेथून उचलबांगडी करून दोघांनांहि अग्निप्रलयांत लोटून द्यावयाला तूं कां उत्सुक झाला आहेस? आईसाहेबांसारख्या प्रेमळ मातेच्या देखत तिच्या मुलीचा व भावि जांवयाचा शिरच्छेद करण्याचा प्रसंग आणण्यांत तुला काय पुरुषार्थ वाटला? टिल्लू व किनरी या सालस, गरीब व इमानी नोकरांवर असे प्रसंग यावेत, हें तुला खपतें कसें? ईश्वरा, तुझी ही 'लीला' असेल; पण असल्या लीलेंत आम्हां गरीबांचा प्राणनाश होत आहे ना? असो. या गोष्टी बोलण्यांत तरी काय तात्पर्य आहे?

"आधीं पुरुषांचीं तरी मुंडकीं उडवाच!" अशा अर्थाची आज्ञा किनतोबा देणार, इतक्यांत मयाणी आपल्या लांकडी ओंड्यावर उभा राहून ह्मणाला "थांबा, थांबा! हे कैदी जरी आपले शत्रु असले, तरी त्यांनां मारणें योग्य नाहीं. शत्रूला आधीं आपल्या धर्मांत येतोस काय असें विचारावें, व तो कबूल होऊन शरण आल्यास त्याला जीवदान द्यावें, असें आपल्या शास्त्रांत सांगितलें

आहे. हे लोक आपल्या धर्मांत येण्यास तयार नसतील, तर त्यांचें मुंडकें एकदम छाटून टाकावें, आणि त्यांचें मांस व त्यांचें रक्त आपल्या देवतांनां व आपल्या कटोहाला अर्पण करावें; पण आपल्या धर्मांत येत असल्यास त्यांनां सोडून द्यावें. या बायकांनां तरी निदान ठार मारूं नये. त्यांनीं बापड्यांनीं काय गुन्हा केला आहे? आणि या कैदी बायकांनां आपल्या फरसानें मारण्यांत कारिसेनी वीराला काय भूषण आहे? या बायका चांगल्या सुंदर आहेत. त्यांनां आपल्या धर्मांत व जातींत घ्यावें, असें मला वाटतें. यांतील लांबट तोंडाची जी सुन्दर तरुण मुलगी दिसत आहे, ती आपल्या सन्मान्य किनतोब्यांनां अर्पण करावी; वृद्ध झालेली जी आहे, ती किनतोब्यांच्या वृद्ध चुलत्याला द्यावी; व वाटोळ्या तोंडाची जी लहान लुसलुशीत आहे, ती—ती आपल्यापैकीं जो श्रेष्ठ वीर असेल, त्यानें आपलें श्रेष्ठत्व दाखवून आपल्या स्वाधीन करून घ्यावी."

ही सूचना किनतोब्याला पसंत पडली. उत्तरा आपणाला मिळावी, अशी त्याची पहिल्यापासूनच खटपट असल्यामुळें त्याला ही सूचना आवडली, यांत आश्चर्य नाहीं. खरी गोष्ट सांगावयाची ह्मणजे ही सूचना त्या कावेबाज किनतोब्याच्या प्रेरणेमुळेंच मयाणीनें केली होती. मीरबल व मयाणी यांची परस्परांत स्पर्धा आहे, व मयाणीच्या हृदयांत आपल्या प्रतिपक्ष्याविषयीं द्वेषहि आहे, असें त्याला ठाऊक होतें. त्यानें मयाणीला त्याच दिवशीं एकीकडे बोलावून नेऊन 'कैदी धरून आणल्यावर त्यांची कशी काय व्यवस्था करावयाची,' याबद्दल वाटाघाट केली होती, व वरील व्यवस्था सुचविली होती. उत्तरेला आपण नजर ह्मणून लाटावी, व रागिणीविषयीं मीरबल, मयाणी वगैरे वीरांत स्पर्धा उत्पन्न करून त्यांचा—व विशेषतः मीरबलाचा—परस्पर नाश घडवून आणावा, असा त्याचा कावा होता !

मयाणीची सूचनाहि त्या चंचल जनसभेला बरी वाटली. 'मीरबल वीर असेल; पण मयाणी हा अधिक शहाणा आहे, व बोलण्यांत तर फार पटाईत आहे,' असें त्यांचें जें अनुभवसिद्ध मत होतें, तें या गोष्टीमुळें अधिक दृढ झालें. रागिणी आतां मयाणीला मिळते, का मीरबलाला मिळते, का तिसऱ्या एकाद्याला मिळते, याविषयीं प्रत्येकजण आपापल्या मनांत विचार करूं लागला. कांहीं तरुण वीरांनां उत्साह चढून आपण मीरबलाशीं युद्ध करून रागिणी आपलीशी करून घ्यावी, अशी ईर्षा उत्पन्न झाली, व त्यांचे बाहु विलक्षण रीतीनें

स्फुरण पावूं लागले. मीरबलाचा मान व त्याचा तोरा सहन न होणाऱ्या वीरांनांहि त्याच्याशीं युद्ध करण्याची संधि मिळणार, या गोष्टीमुळें क्षणभर आनंद झाला; परंतु मीरबलाच्या पराक्रमाची आठवण होऊन तो आनंद जागच्याजागींच जिरला! मीरबलाच्या व मयाणीच्या बायका ( पहिल्याला पांच नावडत्या झालेल्या व दोन आवडत्या अशा सात बायका होत्या, व दुसऱ्याला सहा नावडत्या व दोन आवडत्या अशा आठ बायका होत्या. ) रागिणीकडे अधिक बारकाईनें पाहूं लागल्या, व तिचें सौंदर्य पाहून त्यांच्या नावडत्या बायकांनां आनंद झाला, व आवडत्या बायका मनांत खट्टू होऊन गेल्या! असो.

मयाणीच्या सूचनेची चर्चा सुरू झाल्यावर एका ज्ञात्यानें "आपल्या धर्मांत येण्यास कैदी तयार आहेत किंवा नाहीं, हें तर आधीं विचारा," असें म्हटलें, व त्याबरोबर ती जंगली अडाणी सभा जागी झाल्यासारखी झाली. क्षणानंतर दुभाष्यानें प्रस्तुत प्रश्न नानासाहेबांनां विचारला, व त्याला उत्तरादाखल म्हणून "बरें, सगळ्यांनां विचारून सांगतों," असें नानासाहेब म्हणाले.

"लवकरच उत्तर द्या, नाहीं तर काठी पाठींत बसेल," अशी दुभाष्यानें आपल्याच अधिकारांत त्यांनां धमकी दिली, व दुभाष्याची ही चलाखी 'दर्ग्या'ला पसंत पडून त्यानें हास्य करून त्याच्या बोलण्याला शब्दरहित दुजोरा दिला.

हिंदुधर्म सोडावयाचा का नाहीं?-अशा प्रसंगीं काय करावें,याचें निश्चयात्मक उत्तर कोण देईल? '**आपला** हिंदुधर्म,' '**आपला** सनातन धर्म,' '**आपला** भागवत धर्म,' हे शब्दसमुच्चय स्वाभिमानसूचक व कर्णमधुर आहेत; परंतु जीवावरच प्रसंग येऊन बेतला, म्हणजे आपण 'आपल्या' धर्माला चिकटून राहूंच, अशी थोड्यांनांच खात्री देतां येईल! धर्मावर पुष्कळांची खरी श्रद्धा व निष्ठा असेल; पण असल्या भयंकर प्रसंगीं बहुतेकांची श्रद्धा पंगु-लुली-निर्जीव होते. सर्वसाधारण माणसांची अशी स्थिति होते, तेव्हां जनुभाऊंसारख्या आपमतलबी लुच्च्या माणसानें धर्मांतर करण्याचें एकदम कबूल केल्यास विशेष आश्चर्य आहे, असें नाहीं. जनुभाऊंचें कशाला? नानासाहेब, शास्त्रीबुवा वगैरे मंडळीसुद्धां डळमळली, तेथें इतरांचा काय पाड? असो.

धर्मान्तर करण्याला-हिंदुधर्म सोडून 'जोहो' धर्म स्वीकारण्याला-जनुभाऊ एकदम कबूल झाले, हें वर म्हटलेंच आहे. शास्त्रीबुवांकडे वळून ते म्हणाले

" शास्त्रीबुवा, वृथाभिमान सोडून देऊं या ! कर्मगतीपुढें कांहीं उपाय नाहीं. **' आत्मानं सततं रक्षेत्प्राणैरपि धनैरपि'** हेंच तत्त्व खरें आहे. शिवाय, आतां दोन घटकांपुरतें धर्मान्तर करूं या, व नंतर पुनः प्रायश्चित्त घेऊं म्हणजे झालें !"

यावर दोनतीन मिनिटें कोणीं कांहीं बोललें नाहीं. काय बोलावें, हें कोणाला समजत नव्हतें; व हें समजत असतें, तरी तें बोलण्याला उत्साह असा कोणामध्येंहि नव्हता. परंतु कांहीं तरी बोललें पाहिजे, असा विचार करून भाऊसाहेबांनीं आपलें उदास झालेलें मुख वर केलें; त्यांच्या त्या दुःखी उदास मुखावर पेटलेल्या कटोहाच्या उजेडामुळें एक प्रकारचें कृत्रिम तेज चमकत होतें; व रडून-रडून लाल झालेले डोळे अधिकच लाल दिसत होते. भाऊसाहेबांनीं कांहीं तरी बोलण्याच्या उद्देशानें तोंड वर केलें खरें; पण कांहीं पळें त्यांच्या तोंडावाटे शब्दच बाहेर पडेना ! अखेर मनाचा निश्चय करून ते ह्मणाले " नानासाहेब, मला तर वाटतें, कीं, धर्मान्तर करण्याला कांहीं हरकत नाहीं. आपण ' हिंदु ' कसले ? आपल्यापैकीं कोणाचीहि जुन्या चालीरीतींवर व ग्रंथांवरहि खरी श्रद्धा नाहीं. शिवाय, या मूर्ख रानटी लोकांकरितां आपण यांचा ' जोहो ' धर्म स्वीकारला, ह्मणजे आपला ' आत्मा ' किंवा शरीर भारीच बदलणार आहे ? मग करें काय, नानासाहेब ? "

" माझी तरी कांहीं हरकत नाहीं. मूर्खांबरोबर भांडण्यांत काय अर्थ आहे ? आपणांला उद्यां 'जोहो' ह्मटलें, किंवा ख्रिश्चन म्हटलें, किंवा मुसलमान म्हटलें, म्हणून 'आपण' बदलणार आहों का ? आपण हिंदुधर्मांत इतके दिवस नांवालाच होतों. ' हिंदुधर्म ' हें नांव उद्यांपासून धारण करतां आलें नाहीं, म्हणून काय बिघडणार आहे मोठेंसें ? नांवांत काय आहे ? शास्त्रीबुवा, तुमचें काय म्हणणें आहे ? "

" माझें कांहीं म्हणणें नाहीं. " शास्त्रीबुवांनीं रडतरडत उत्तर दिलें. " तुम्हीं मरण्याला तयार असाल, तर मीहि तयार आहें; तुम्ही नसाल, तर माझाहि विशेष आग्रह नाहीं. धर्माचें नांव बदललें म्हणून तुमचाआमचा आत्मा का बदलणार आहे ? आतां एवढी गोष्ट खरी, कीं, प्राण वांचविण्याकरितां आपण आपला धर्म सोडणें म्हणजे हें एक भ्याडपणाचें व अभिमानशून्यतेचें लक्षण होतें, आणि—"

"शिवाय, यांत आपल्या देशाभिमानालाहि कमीपणा येतो!" आनंदराव मध्येंच आवेशानें म्हणाले. "मी धर्मान्तर करायला तयार नाहीं. प्राण वांचविण्याकरितां देशाच्या अब्रूला काळिमा आणणारांपैकीं मी नाहीं."

"या जंगली लोकांशीं कसला धर्माभिमान आणि देशाभिमान दाखवितां?" नानासाहेबांनीं आनंदरावांनां आवेशानें विचारलें. "साप अंगावर आला असतां पळून जाण्यांत भ्याडपणा कसला आला आहे? हे जंगली लोक सापासारखे आहेत. यांच्याशीं भांडण्यांत तात्पर्य काय?"

"तुमचें म्हणणें खरें आहे, नानासाहेब!" भाऊसाहेब म्हणाले. "वाघाला किंवा सिंहाला भिऊन जसे आपण पळून जातों, तसेंच यांच्याशीं वागतांना. वाघाला भ्यायलें म्हणून 'भ्याडपणा' पदरीं येत नाहीं, व स्वाभिमानहि नष्ट होत नाहीं."

"अगदीं खरें आहे." शास्त्रीबुवा म्हणाले. "आपण जें करणार आहों, तें आपद्धर्म म्हणून करणार आहों. याच्यांत कांहीं पाप आहे, असें मला वाटत नाहीं; आणि खरें पाहिलें,तर मी 'जोहो' धर्माचा असलों काय, किंवा ख्रिश्चन असलों काय, किंवा हिंदु असलों काय, माझा अंतरात्मा या बाह्य उपाधीवर का अवलंबून आहे?"

"मला तुमच्या धर्माची किंवा आचाराची विशेष पर्वा वाटत नाहीं." आनंदराव ह्मणाले. "पण आपल्या या नामर्दपणाच्या कृत्यानें आपल्या देशाची बेअब्रू होते, हें मला खपत नाहीं. हिंदी लोक जरा दटावल्याबरोबर शरण येतात, व धर्मत्याग करण्यालाहि तयार होतात, असें याच्यांत सिद्ध होतें. आपल्या देशांतले लोक पुनः या हिमालयावर आले, तर त्यांनां कोणीहि मान देणार नाहीं. नानासाहेब, हा प्रश्न व्यक्तीपुरता नाहीं. आपल्या भ्याडपणामुळें देशाचें नांव बद्द होईल, हाहि विचार करणें जरूर आहे. आपण दक्षिणी ब्राह्मण ना? ब्राह्मणांनीं–हल्लींच्या दक्षिणार्थी भिक्षुक ब्राह्मणांनीं नव्हे, तर पूर्वींच्या तपोधन ब्राह्मणांनीं–असें कधीं केलें असतें का?"

"तुमचें म्हणणें कांहीं खोटें नाहीं." शास्त्रीबुवा म्हणाले. त्यांचें मन वरील भाषणानें द्विधा झालें, व दोन्ही मार्ग त्यांनां इष्ट व योग्य वाटूं लागले! "देशाच्या दृष्टीनें पहातां, धर्मत्याग न करणें हेंच श्रेयस्कर. तुमच्या सर्व मंडळींची तयारी असेल, तर मी आनंदरावांप्रमाणेंच—"

" माझी तयारी नाहीं." नानासाहेब ठांसून ह्मणाले. " मला देशाची सेवा करायची आहे; पण ज्या धर्मावर माझी श्रद्धा नाहीं, त्या धर्माचा अभिमान धरून प्राणनाश करून घेतल्यानें मी देशाची सेवा कशी करीन, हें मला समजत नाहीं. देशाची सेवा करण्याचे दुसरे मार्ग पुष्कळ आहेत."

" मग तुह्मी खुशाल धर्मान्तर करा." आनंदराव आवेशानें—अथवा संतापानें ह्मटलें तरी चालेल—ह्मणाले. " मी आपला वेडा आहें. ईश्वरकृपेनें माझें लग्नहि झालेलें नाहीं. मला यांनीं या कटोहांत जाळलें, तर जग ओसाड पडणार आहे, अशांतला भाग नाहीं!"

" ज्याला जें पसंत पडेल, तें त्यानें करावें." नानासाहेब शांतपणें व किंचित् उदास स्वरानें ह्मणाले. " अशा प्रसंगीं धर्मत्याग करण्याची मला मुळींच लाज वाटत नाहीं. हिंदु लोकांच्या मारुतीवर, सर्पावर नि गरुडावर माझी कधींच श्रद्धा नव्हती. मी हिंदु कधीं नव्हतों, व आतांहि नाहीं."

इतका वेळ बायकांपैकीं कोणी कांहीं बोललें नव्हतें. परंतु नानासाहेबांचे वरील उद्गार ऐकून आईसाहेब ह्मणाल्या " देवधर्म सोडल्यावर जगायचं तरी कशाला मेलं कुणाला ठाऊक? इतके दिवस सुधारकीपणा केला तो केला, पण देवांनां आणि धर्माला शिव्या देण्यापर्यंत मजल जाईल, असं मला नव्हतं वाटलं. धर्म सोडल्यावर मग रहायलं काय?"

" धर्म म्हणजे काय, हें तुला समजतें आहे का तरी?" नानासाहेब त्या दुःखमय समयींहि किंचित् हास्य करून म्हणाले. " वेडी कुठली!"

आईसाहेब या उद्गारांनींच गप्प बसल्या, व अर्धाएक मिनिट यावर कोणीं कांहींच बोललें नाहीं. या अवधींत शास्त्रीबुवांचें लक्ष्य उत्तरेकडे व रागिणीकडे गेलें, व त्यांनीं 'तुमचें काय म्हणणें आहे?' असा जणूं काय ते प्रश्न विचारीत आहेत, अशा मुद्रेनें त्यांच्याकडे पाहिलें.

उत्तरा कांहीं बोलणार, इतक्यांत शास्त्रीबुवांच्या पाठीमागें उभा राहिलेल्या फरसवाल्या नग्नप्राय जंगली पहारेकऱ्यानें त्यांनां गुडघ्याचा एक ठोसा दिला, व " लवकर ठरवा, लवकर ठरवा," असें मोठ्यानें म्हटलें. गुडघ्याचा ठोसा मिळाल्याबरोबर शास्त्रीबुवांनां पुनः रडूं कोसळलें.

कांहीं क्षणांनंतर उत्तरा म्हणाली " शास्त्रीबुवा, या जंगली लोकांनीं अपमान केला, म्हणून दुःख मानूं नका. तुम्हांला मीं सांगावं असं नाहीं; पण मला रहावलं नाहीं, म्हणून मी—"

उत्तरेनें शास्त्रीबुवांनां धीर देण्याचा प्रयत्न केला; पण तिलाच त्या वेळीं कोणीं तरी धीर द्यावयाला पाहिजे होतें; कारण तिचें वाक्य पुरें झालें नाहीं, तोंच तिला रडूं कोसळलें. हें पाहून शास्त्रीबुवांनां अधिकच रडूं येऊं लागलें. परंतु त्यांनीं तें आवरलें, व नंतर प्रेमळ स्वरानें म्हटलें "उत्तरे, काय हा तुझ्यावर नि आमच्यावर प्रसंग!"

"धर्माकरितां प्राण सोडण्याची माझी इच्छा नाहीं." उत्तरा शास्त्रीबुवांनां म्हणाली. "वाघाच्या गुहेंत सांपडल्यावर तेथून कशी तरी सुटका करून घ्यावी, हेंच चांगलं. त्यांतून, धर्मावर जर विशेष विश्वासच नाहीं, तर मग जीव उगीच कशाला द्यायचा?"

"कशाकरितां नाहीं!" आनंदराव रागानें म्हणाले. "प्राण उराशीं बाळगून शंभर वर्षे तुम्ही जगा!"

"माझं बोलणं पुरतं ऐकून तरी घ्यायचं होतं!" उत्तरा म्हणाली. "मी मरणाला भीत नाहीं. मीहि बरोबर मरायला तयार आहें. पण धर्माकरितां नव्हे. देशाभिमान पुरुषांनांच असतो, असं नाहीं!"

आनंदराव या भाषणानें प्रथम ओशाळले; परंतु नंतर त्यांनां मनापासून फार संतोष झाला. आपल्या देशांत देशाभिमानी स्त्रिया उत्पन्न होत आहेत, आणि त्यांपैकीं आपली आवडती उत्तरा ही एक आहे—हा विचार त्यांनां त्या दुःखमय स्थितींत विशेष आनंददायक झाला, यांत आश्चर्य करण्यासारखें कांहीं नाहीं. असो.

"तुझी नि आनंदरावांची मी आजच सकाळीं ना मस्करी करीत होतों, आणि—" याच्यापुढें शास्त्रीबुवांनां बोलतां येईना. त्यांनां दुःखाचा जो कढ आला, त्यांत त्यांचें सर्व बोलणें लुप्त झालें.

"शास्त्रीबुवा," नानासाहेब म्हणाले. "तुम्ही असा धीर सोडूं नका. आपण सांगोपांग विचार करून येथून सुटून जाण्याचा विचार करूं या. मला वाटतें, या जंगली मूर्ख लोकांनां खूष करण्याकरितां 'जोहो' धर्म स्वीकारून मोकळें व्हावें झालें. करतां काय? अडला नारायण गाढवाचे पाय धरी!"

"आपण आपलं पाहिजे तसं करावं. मी आपली इथंच मरणार." आईसाहेब म्हणाल्या. "मला आतां जगून काय करायचं आहे? दुसरा सुधारकीपणा केला

तेवढा पुरे झाला—पण अजीबात धर्म सोडून द्यायचं पाप नको माथीं लागायला पुरुषांनां देवाधर्माचं कांहीं नाहीं; पण—"

"मोठी शहाणी आली आहे आम्हांला उपदेश करायला!" नानासाहे प्रेमयुक्त कोपानें म्हणाले. "तुला 'धर्म' म्हणजे काय, हें तरी नीटपणें समजतें का?

"मी आपली वेडी आहें, कबूल केलं ना? मी आपली मरेन. त्याच्यां कोणाचं काय गेलं?"

"तुझ्याशीं जास्ती बोलण्याची नि वाद घालण्याची ही वेळ नाहीं." नान साहेब ह्मणाले. "तूं आपली मी सांगेन तें ऐक. स्वतःची अक्कल न चालवूं. विजयगांवांत गेल्यावर तूं सांगशील तें सगळे मी ऐकेन."

"मी नाहीं धर्म सोडायची, कांहीं केलं तरी!" आईसाहेब ठांसून ह्मणाल्य "झालीं पापं तेवढीं पुष्कळ झालीं. याची नको आणखी त्यांत भर पडायला

"तूं माझी बायको ना?"

"हो, मग?"

"पतीची आज्ञा शिरसावंद्य मानावी, हा आपल्या हिंदुस्त्रियांचा धर्म ना हिंदुस्त्रियांनां पति हेंच दैवत!"

"मी कुठं नाहीं म्हणतें? मी जिवंत आहें तोंपर्यंत मी आपली सेवा करी राहीन. धर्म कुणीं सोडला, तरी दिखील मी सेवा करीन. पण मी स्वतः ना धर्म सोडायची!"

"पति जर तुझें दैवत आहे, तर पति सांगेल तें तुला ऐकलें पाहिजे मी सांगतों-तुला आज्ञा करतों, ती ऐक. पतीची आज्ञा ऐकायची नसली, त नको ऐकूं. मी सांगेन तसें तुला वागलें पाहिजे. आहेस का नाहीं कबूल, बोल

"आज्ञाच करायची झाली, मग कांहीं बोलणंच उरत नाहीं. पण मा एवढी विनवणी ऐकावी, नि भलती आज्ञा—"

"मी तुझी विनवणीबिनवणी कांहींएक आतां ऐकणार नाहीं! वेळ कोण आहे, प्रसंग कोणता आहे, आणि 'धर्म' 'धर्म' घेऊन बसली आहेस! वे नाहीं तर! मी तुला आज्ञा करतों, तसें तूं कर. पाप काय लागायचें तें म लागेल, तुला नाहीं ना? मी सगळें पाप सोसायला तयार आहें."

हें निर्वाणीचें बोलणें ऐकून आईसाहेब गप्प बसल्या, व नवऱ्याची अप्रिय आज्ञाहि पाळावयाला तयार असल्याबद्दल त्या साध्वीनें आपल्या मूकभावानेंच संमति दिली! धर्मान्तर करणें ह्मणजे महपाप करणें होय, असें एकीकडे त्यांना वाटत होतें, तरी त्या हिंदुस्त्रीनें पतीची आज्ञा ह्मणून तेंहि करण्याचें कबूल केलें. तिच्या हृदयांत काय चाललें होतें, तें तिच्या डोळ्यांतून गळणाऱ्या अश्रु-धारांनीं जसें स्पष्टपणें त्या मंडळींनां व्यक्त केलें, तसें वाचकांनां शब्दद्वारा व्यक्त करणें माझ्या आटोक्याच्या बाहेरचें आहे!

उत्तरेला आपल्या आईची ती चमत्कारिक स्थिति पाहून तिची दया आली, व आईचा कड घेऊन ती म्हणाली "नाना, तिची जर इच्छा नाहीं, तर तुमचा तरी तिला कां एवढा आग्रह?"

"उत्तरे, 'कां' हें तुला मी मागाहून सांगेन. आतां तुम्ही सगळींजणें माझें ऐका. हा वादविवादाचा का प्रसंग आहे? शास्त्रीबुवा, भाऊसाहेब, आनंदराव, मी सांगतों तसेंच करायचें ना?"

शास्त्रीबुवा व भाऊसाहेब यांनीं कांहीं उत्तर दिलें नाहीं; पण आनंदराव म्हणाले "नाना, आपण ह्मणतां तें योग्यच आहे. पण माझी गोष्ट अगदीं वेगळी आहे. मला आई ना बाप, मी अविवाहित आहें. मी मेलों, तर जग अगदीं ओसाड पडणार आहे, असें नाहीं. मला कांहीं धर्मान्तर करायचें नाहीं."

"मलाहि करायचं नाहीं!" उत्तरा म्हणाली.

"उत्तरे," नानासाहेब प्रेमळ–किंबहुना केंविलवाण्या–स्वरानें म्हणाले. "उत्तरे, तूं माझी मुलगी ना? मी तुला लहानाची मोठी केली ना? तुला शिक्षण मींच दिलें ना?"

"होय."

"मग मी सांगतों तें ऐक."

"नाना, पतीची आज्ञा ऐकावी, कीं, पित्याची?"

"उत्तरे, तुझें अजून लग्न झालेलें नाहीं."

"मीं मनानं वरलं, आणि तुम्हींहि संमति दिलीत, त्या वेळेपासूनच मी—"

पुढें तिच्यानें बोलवेना! याचें कारण केवळ युवतिजनो लज्जा नव्हे. भाविविवाहाची सुखद कल्पना तिच्या मनांत आली, व त्याच क्षणीं त्या

वेळची ती भयंकर स्थितिहि डोळ्यांपुढें दत्त ह्मणून उभी राहिली, व या परस्पर-विरोधी दोन कल्पना एकसमयावच्छेदेंकरून तिच्या मनांत आल्यामुळें तिच्या तोंडून एकहि शब्द बाहेर पडला नाहीं. तिनें आपलें तोंड दोनहि हातांनीं लपविलें, व 'आई, आई !' ह्मणून ओरडली, आणि तिच्या मांडीवर अंग टाकून रडूं लागली. त्याबरोबर तिच्या पाठीमागें उभा राहिलेल्या दुष्ट पहारे-कऱ्यानें तिला एक लाथ मारली, व हात धरून तिच्या आईच्या मांडीवरून तिला वर उचललें.

उत्तरेचा तो दृढनिश्चय व ती पतिनिष्ठ अनन्य भक्ति पाहून नानासाहेब चपापले, व कपाळावर हात ठेवून आपल्याशीं विचार करूं लागले 'या उत्तरेला खरोखरीच एवढा देशाभिमान आहे, कीं, ही आनंदरावांच्या प्रेमानें अंध होऊन असें बोलत आहे? हिला वाखाणावें, कीं, हिची कींव करावी? ही उत्तरा एवढी स्वतंत्र विचाराची व बाण्याची मुलगी, पण आनंदरावांच्या प्रेमानें—त्यांच्या मोहिनीनें—तीसुद्धां मूढपणानें त्यांच्याच प्राणघातकी दुराग्रहाचा अनुवाद करीत आहे, व आपणांला धन्य समजत आहे, तेव्हां हा चमत्कार नाहीं तर काय? हें प्रेम अनुकरणीय कीं निंद्य? का ती प्रेमान्ध नसून तिची देशभक्ति खरोखरीच इतकी उज्ज्वल आहे. उत्तरे, धन्य आहे तुझी! तुला शिक्षण दिलें, हें चांगलें का वाईट, अशी एकाद वेळेला मला शंका येत असे. पण मीं केलें हें चांगलेंच केलें, अशी आतां माझी खात्री झाली. उच्च शिक्षण मिळाल्यामुळें स्त्री असूनहि तुला वीरासारखें श्रेष्ठ धारिष्ट प्राप्त झालें आहे. तूं वीरपत्नी शोभण्या-सारखी आहेस. ईश्वर करो, आणि तुला वीरमाता हेंहि नांव मिळो !'

हे विचार आनंददायक होते. पण भयानक वस्तुस्थितीपुढें हे विचार कसले टिकतात?

"पण ही जर असा दुराग्रह घेऊन बसली," नानासाहेब मनांत म्हणाले. "तर ही आजच मरणार; मग ही वीरपत्नी आणि वीरमाता कसली होते? उत्तरे, आनंदरावांचा नि तुझा आनंदमय संसार पहाण्याची माझी इच्छा होती. तुझ्या मुलाला घेऊन खेळविण्याची माझी इच्छा होती; आणि दैवानें हें काय योजिलें आहे? अथवा, दैवाला तरी कां दोष द्यावा? तुमचाच दुरभिमान तुमच्या नाशाला कारणीभूत होत आहे—

"पण असा विचार करण्यांत तरी काय अर्थ आहे ? यांचें मन कसें तरी करून वळवलेंच पाहिजे. 'हिनें' तर माझी आज्ञा पाळण्याचें कबूल केलेंच आहे. भाऊसाहेब आणि शास्त्रीबुवा हेहि आपलें म्हणणें ऐकतील. आनंदरावांचें मन वळविलें, म्हणजे उत्तरेचें आणि रागिणीचें मन वळविण्यास कठिण नाहीं पडायचें. पाहूं या आनंदरावांनां उपदेशाचे चार शब्द सांगून."

असा मनांत विचार करून नानासाहेब आनंदरावांकडे वळून त्यांनां ह्मणाले "आनंदराव, तुझा देशाभिमान मला पूर्ण मान्य आहे. पण या 'कटोहां'त नाहक मरण्यांत काय पुरुषार्थ आहे ? मला तुझ्यापेक्षां अधिक अनुभव आहे. माझें या वेळेपुरतें तरी ऐका."

"मीं ऐकिलें असतें. पण नानासाहेब, मी मेल्यानें जगाचें काय मोठेंसें नुकसान होणार आहे, तर मीं आपलें उच्च तत्त्व सोडून द्यावें ?"

"जिवंत राहिलास, तर देशाचें तुला हित करतां येईल; आणि हें सोडून दिलें, तरी तुझ्या नादानेंच ही उत्तरा आणि ही रागिणी जीव देण्याला तयार झाल्या आहेत, याचा तूं विचार कर !"

"म्हणजे, आम्हांला स्वतःला देशाभिमान नाहींच म्हणायचा !" उत्तरा रागानें म्हणाली. "आम्ही लोकांच्या ओंजळीनंच पाणी पिणाऱ्या आहोंत म्हणायच्या !"

उत्तरेचे हे उद्गार ऐकून नानासाहेबांनां काय उत्तर द्यावें, हें न सुचल्यामुळें त्यांनीं फक्त मोठा उसासा टाकला, व भाऊसाहेबांकडे निराश दृष्टीनें पाहून त्यांनां म्हटलें "भाऊसाहेब, तुम्ही तरी यांनां सांगून पहा."

नानासाहेबांनीं हें उदास वाक्य उच्चारिलें असेल नसेल, तोंच त्या दर्ग्यांतून खिदीखिदी हंसण्याचा आवाज निघाला, व तो सर्व दर्गा या मंडळीकडे–विशेषतः स्त्रियांकडे–पाहूं लागला. त्या सभेंत कोणीं कांहीं तरी बीभत्स कोटि केली असली पाहिजे, हें सर्वांनीं ओळखलें. पण करतात काय ?

या गोष्टीकडे दुर्लक्ष्य करून भाऊसाहेब ह्मणाले "मी काय सांगणार ? काय उपदेश करावा, हें माझें मलाच समजत नाहीं, तर मी काय सांगूं ?"

"भाऊसाहेब, तुम्ही निराश होऊं नका. युक्तीयुक्तीनें व धोरणानें चालल्यास या संकटांतूनहि आपण सुटून जाऊं."

" पण रागिणी धर्मांतर करायची नाहीं, आणि ती नसल्यावर मला तरी जगून काय करायचें आहे ? मलाहि आतांच मरण आलें तर बरें होईल ! सगळ्या जगाचाच विध्वंस व्हावा, अशी माझी इच्छा आहे. हें दुष्ट पापी जग नसलेलें बरें ! "

भाऊसाहेबांनीं धीर सोडलेला पाहून नानासाहेबांचाहि धीर थोडासा खचला. पण विचारानें त्यांनीं आपलें मनोदौर्बल्य दाबून रागिणीला म्हटलें " रागिणी, उत्तरेपेक्षां तूं वयानें लहान आहेस खरी; पण तुला तिच्यापेक्षां अधिक समजतें. तूं तरी माझें ऐक. आपले अमोलिक प्राण कां खर्चीं घालतां ? "

" मला जगून तरी काय करायचं आहे ? " रागिणी जीवितनिराशेच्या व संसारविरक्तीच्या स्वरानें म्हणाली. " मला ना संसार, ना पोर, ना बाळ ! प्राण वांचवून मला काय असा मोक्ष मिळणार आहे ? उगाच आपला धर्म कशाला सोडूं ? संसाराची आणि प्राणाची आशा धरून मी बरोबर गेलें नाहीं, आणि तिकडे दुःख दिलं. या पापाचीं इतके दिवस फळं भोगलींच. संसाराची किती आशा धरायची ? आपल्या या धर्माच्या प्रेमानं संसारावर लाथ मारून काशीला जाणं झालं; आणि मीं जर हा धर्म सोडून दिला, तर स्वर्गांत काय वाटेल ? पतीला प्रिय असेल तेंच करावं, असा तुम्हीच मला उपदेश करीत होतां ना ? प्राण जाण्याची पाळी आली तरी कर्तव्यकर्म सोडूं नये, असं तुम्हीच सांगत आलांत ना ? स्वदेशाकरितां सर्वस्वाचा स्वार्थत्याग करण्याचा लोकांत जेव्हां जोर येईल तेव्हांच देशाचा उद्धार होईल, असं तुम्हीच म्हणत होतां ना ? "

रागिणीचें हें उत्तर ऐकून नानासाहेबांनां काय बोलावें हें सुचेना ! परस्परविरोधी विचारांनीं त्यावेळीं त्यांच्या हृदयांत रण माजविलें. 'या सुकुमार-परंतु उदात्त वीरस्त्रियांच्या पवित्र निश्चयाच्या आड जावें काय ? नाहीं, हें इष्ट नाहीं ! व्यावहारिक दृष्टीपेक्षां यांची ही दृष्टि उच्चतर आहे. पण खरोखरच उच्चतर आहे का ? कीं, तसें आपलें वाटतें ? विचार करून पाहिलें, तर यांचें हें कर्म समंजस वीर्यकर्म नसून मूढ साहसकर्म आहे, असें दिसून येईल. '

परंतु लगेच दुसऱ्या प्रकारचेहि विचार त्यांच्या मनांत येत. ' धर्म सोडून दिला म्हणजे कांहीं बिघडेल, असें नाहीं. पण माझ्या या पत्नीचें आणि या मुलींचें मन दुखवेल,त्याचें काय ? मला धर्माचें कांहीं नाहीं, पण तिला धर्म प्रिय आहेना ? मी खरा हिंदु नाहीं. ती मात्र खरी हिंदु स्त्री आहे. धर्मान्तर करणें इतकें अप्रिय

असतां, मीं आज्ञा केल्याबरोबर या पतिव्रता स्त्रीनें माझी आज्ञा मान्य केली ! या स्त्रीचें मन जन्मभर दुःखांत लोटावें काय? धर्मान्तर केलें हें मोठें पाप केलें, असें हिला जन्मभर वाटत राहील-हिचा जीव हिलाच नकोसा होईल. माझ्यावर हिची जर निस्सीम भक्ति आहे, तर हिच्या मनाकडे मीं कांहींच बघूं नये काय? बायकांनीं पुरुषांचें ऐकावें, आणि पुरुषांनीं त्यांचें मुळींच ऐकूं नये, असें शास्त्र आहे काय? स्वधर्मत्याग हिला जर मरणप्राय वाटतो, तर मीं हिला ही गोष्ट करण्यास लावावें, हें उचित नाहीं. बस्स, सगळे लोक जर मरण्यास तयार आहेत, तर मीहि तयार आहें. केव्हां तरी मरायचें आहेच ! मग आतां कां होईना?–पण हा विचार समंजसपणाचा नाहीं. उगाच 'Sentimental' होण्यांत अर्थ नाहीं.'

अशा प्रकारें विचार करीत तीनचार मिनिटें नानासाहेब स्वस्थ बसले, व इतर मंडळीहि मूकभाव धरून राहिली. कोण काय बोलणार त्या वेळीं? शास्त्रीबुवा, आईसाहेब व रागिणी हीं हुंदके देऊन रडत होतीं. आनंदराव व उत्तरा यांच्या उदास मुद्रेवर नैराश्याचें स्वास्थ्य व सन्निश्चयाची शांति हीं दिसत होतीं, व तीं भूमीकडे शून्य दृष्टीनें पहात होतीं.

इकडे, त्या कारिसेनी दर्ग्यांचें वादविवादाचें, हंसण्याचें व भांडणाचें काम चाललेंच होतें. मीरबल, मयाणी वगैरे मंडळीचें आपापसांत शाब्दिक भांडण लागून त्यांचें लक्ष्य या कैद्यांवरून कांहीं वेळ निघालें होतें, म्हणून नानासाहेबांनां इतकें तरी बोलावयाला सांपडलें. नानासाहेब योग्यायोग्य मार्गाचा आतां पुनः विचार करीत असतां त्यांचें लक्ष्य त्या जंगली दर्ग्यांकडे गेलें. या वेळीं मीरबल व मयाणी हे भांडतांभांडतां हमरीतुमरीवर आले होते, व आतां तर लढण्याच्या बेतांत होते. दोघांनींहि आपले फरस सावरले होते, व ते अगदीं पवित्र्यांत उभे होते.

त्यांच्यामध्यें कसलें भांडण लागलें होतें, हें नानासाहेबांनां अर्थात्च कळलें नाहीं. या मारामारीचा काय अंत होतो, हें पहाण्याकडे त्यांचें लक्ष्य थोडेंसें गेलें असेल नसेल, इतक्यांत शास्त्रीबुवांनीं त्यांनां हांक मारली, व म्हटलें "नानासाहेब, मग काय ठरलें? त्यांची मारामारी पहात बसण्यांत अर्थ नाहीं !"

"मी तरी काय सांगणार?" नानासाहेब म्हणाले. "माझें कोणी ऐकतच नाहीं, त्याला मी काय करणार! रागिणी, उत्तरा यांनांसुद्धां धर्माचा व देशाभिमानाचा आतां ऊत आला आहे, तेव्हां आपण स्वस्थ—"

" आम्ही बायका जगून आतां काय करणार ? " रागिणी म्हणाली. " या रानटी नरपशूंच्याच हातीं जाणार ना ? त्यापेक्षां मेलेलं बरं नाहीं का ? नाना, तुम्ही प्राण वांचवायला सांगतां; पण आम्हां बायकांवर कसला प्रसंग आला आहे, हें कोणाच्या ध्यानांत कसं येत नाहीं ? जगायचं असलं, तर तुम्हीं पुरुषांनीं जगावं. तुम्हांला अजून पुष्कळ कार्य करायचं आहे. आम्ही तिघी बायका आतां जितक्या लवकर मरूं तितकं चांगलं ! "

रागिणीचे हे हृदयद्रावक विचार ऐकल्यावर नानासाहेब तरी काय बोलणार ? ते आपले शून्यदृष्टीनें इकडेतिकडे पहात स्वस्थ राहिले.

इकडे दर्ग्यांत कडाक्याचीं भांडणें चाललींच होतीं. त्यांतील बायकाहि या भांडणांत शिरल्या होत्या, व एका कोंपऱ्यांतील दोन बायका एकमेकींच्या झिंज्या धरून एकमेकींनां ओढीत होत्या, व दुसऱ्या हाताच्या नखांनीं एकमेकींनां विचकोरे घेत होत्या. दोनचार मिनिटें झाल्यानंतर त्या जंगली सभेंतील एकानें या कैद्यांची सर्वांनां पुनः आठवण करून दिली. त्यामुळें हलकेहलके सर्वत्र पुनः शांतता झाली. "त्यांचें काय ठरलें तें विचार," असें किनतोब्यानें दुभाष्याला अधिकारयुक्त वाणीनें ठांसून सांगितलें.

त्यानें काय सांगितलें, याचा अर्थ दुभाष्याच्या मदतीशिवायच आपल्या या सर्व मंडळींनां कळला. परंतु त्यांपैकीं कोणीं कांहींएक उत्तर दिलें नाहीं. दुभाष्यानें नानासाहेबांकडे पाहून हिंदुस्तानींत प्रश्न विचारला. पण नानासाहेबांनीं त्याला कांहींच उत्तर दिलें नाहीं. एक मिनिट गेलें–दोन मिनिटें गेलीं–तीन मिनिटें गेलीं–पण कोणी कांहींच बोलेना. कोणीं कांहीं उत्तर दिलें नाहीं, यावरून आपल्या धर्मांत येण्याचा या कैद्यांचा विचार नाहीं, असें त्या जंगली लोकांनीं ताडलें, व या अपमानाबद्दल त्यांनां चीड आली, आणि त्यांच्या तोंडून "मारून टाका, व यांनां कटोहामध्यें फेंका," अशा अर्थाचे उद्गार निघूं लागले.

अशा प्रकारची ओरडाओरड सुरू झालेली पाहून कैद्यांच्या पाठीमागें उभे राहिलेल्या फरसवाल्यांनीं जवळच्या लोकांनां " या कैद्यांनां उचला, व कटोहांत टाका," असें सांगितलें.

जनुभाऊ चकण्यांनीं हे शब्द ऐकले, आणि त्यांनां कांपरेंच भरलें ! पण त्यांनीं अखेर धीर करून किनतोब्याकडे वळून दीनवाणीनें हिंदुस्तानींत म्हटलें " थांबा, थांबा, मला तरी कटोहांत टाकूं नका. मी धर्मान्तर करतों—तुम्ही

सांगाल तें करतों; पण मला मारूं नका. पाहिजे असेल तर ( येथें त्यांनीं रागिणीकडे पाहिलें. ) मी तुम्हांला आपली ही बायकोसुद्धां देतों."

हें नीचपणाचें भाषण किनतोब्याला समजलें नाहीं, म्हणून त्यानें दुभाष्याला "काय म्हणतो आहे हा कैदी ?" असें विचारलें. अर्थ कळल्यावर किनतोबा हंसला, व मीरबल, मयाणी वगैरे बडी मंडळीहि हंसली.

हें हास्य आपणांला अनूकूल आहे, असें वाटून जनुभाऊंनां जरासा आनंद झाला. मीरबलानें त्यांनां " या बायकांपैकीं तुझी कोणती बायको ? " असें दुभाष्याकडून विचारविलें, व त्या पठ्ठयानें रागिणीकडे पाहून "ही माझी बायको, ही मी तुम्हांला देतों," असें सांगितलें !

हा प्रकार पाहून रागिणीला काय वाटलें असेल, किंवा नानासाहेब, भाऊसाहेब, उत्तरा वगैरे मंडळींच्या मनांत काय विचार अथवा विकार उत्पन्न झाले असतील, याचें वर्णन करण्यापेक्षां जनुभाऊंचें उत्तर ऐकून किनतोबा, मीरबल वगैरे लोकांनां काय वाटलें, याचें वर्णन करणें अधिक महत्त्वाचें आहे.

ही जंगली मंडळी जनुभाऊंचें उत्तर ऐकून हंसली, व ती जनुभाऊंकडे कौतुकदृष्टीनें पाहूं लागली. आपल्या बायकोला शत्रूच्या स्वाधीन करणारा मनुष्य त्यांनां अपूर्व वाटला, यांत नवल नाहीं. आपण जसे सरकशींतील सिंहाकडे किंवा 'कांगरू'कडे कुतूहलानें मिनिट अर्धमिनिट पहात रहातों, तसे ते या मनुष्यरूपधारी जनुभाऊंकडे पाहूं लागले. या अपूर्व द्विपाद पशूकडे पाहून डोळे शांत झाल्यावर किनतोबा म्हणाला " हा आपल्या बायकोला द्यायला तयार झाला आहे, तेव्हां हा पुरा पाजी आहे, किंवा × तरी आहे. कसेंहि असलें तरी हा आपल्या या शूर जातींत जगण्याला योग्य नाहीं. हा विश्वासघातकी आहे. याला कटोहांत घालून याच्या मांसाची चटणी करून टाकावी. म्हणे, मला वांचवलें तर मी आपली बायको देईन ! याची बायको घ्यावी का न घ्यावी, याबद्दल याची परवानगी नको आहे आम्हांला ! काय मीरबल, याला एकदम कटोहांत टाकायचें ना ? "

" अर्थात् ! " मीरबल म्हणाला. " असले लोक जगून काय करायचे आहेत ? " असें म्हणून त्यानें दोघां तरुणांकडे पाहून "उचला याला, आणि द्या फेंकून नि काय ? " असें म्हटलें, व त्यासरशीं जिकडेतिकडे 'उचला, उचला !' असा ध्वनि दुमदुमला, आणि एका क्षणार्धांत जनुभाऊंनां त्या लोकांनीं कटोहांत फेंकून दिलें !

हा त्या जंगली सभेच्या कामाचा व न्यायाचा एक मासला झाला! ढेंकणाला दिव्यांत किंवा समईत टाकतांना जसें कोणाला त्याचें विशेष कांहीं वाटत नाहीं, तसें आपल्या या जनुभाऊंनां टाकून देतांना त्यांनां कांहीं वाटलें नाहीं! त्यांच्या बायकांनांहि याचें विशेष कांहीं वाटलें नाहीं. असले प्रकार त्यांनीं अनेक वेळां पाहिले होते; त्यांनां याच्यांत कसलें आश्चर्य वाटणार? त्यांनां आश्चर्य वाटलें नाहीं; इतकेंच नव्हे, तर त्यांनीं दोनतीन मिनिटांनीं जनुभाऊंनां—म्हणजे त्यांच्या अर्धवट मुडद्याला-लांब कांठ्यांनीं कटोहाच्या बाहेर ओढून काढलें; पण मुडदा पुरा खमंग भाजला नाहीं, असें पाहून त्यांनीं तो परत कटोहांत काठीनें ढकलीत लोटला.

काय तो भयंकर प्रसंग! त्या वेळीं, आईसाहेबांनां वगैरे काय वाटलें असेल? रागिणीला स्वतःची बायको म्हणणाऱ्या त्या नीच पुरुषाला जें शासन मिळालें तें योग्यच होय, असें त्यांनां वाटलें असेल, व त्यांनां कदाचित् थोडेंसें समाधान झालें असेल; पण त्या वेळीं समाधान कसलें आणि असमाधान तरी कसलें आलें आहे! लवकरच सगळ्यांनां कटोहांतील आगींत तडफडत मरावें लागणार, हें सगळींजणें ओळखून होतीं. तीं सर्व घाबरून-भांबावून गेलीं. आपण आहोंत कोठें, काय प्रकार चालला आहे, येथें कसें वागावयाचें, हें त्यांनां कांहींच समजेना! रागिणीला तर प्रत्यक्ष डोळ्यांनीं पहात असलेला प्रकार खरा आहे का स्वप्नांतला आहे, याची क्षणभर भ्रांति पडली. तिनें अंगाला चिमटा घेतला, व डोळे चोळून ती इकडेतिकडे पाहूं लागते, तों जनुभाऊंच्या मेंदूंतून व मांड्यांतून चरबी गळत आहे, व एक जखिणीसारखी दिसणारी स्त्री त्यांच्या जळणाऱ्या मुडद्याला काठीनें डवचीत आहे, असें तिच्या दृष्टीला पडलें.

जनुभाऊंच्या मुडद्याचे कोयत्यावजा हत्यारानें बायका तुकडे करीत असतां, पुरुष मंडळी मनुष्याचें मांस आज खावयाला मिळणार, याच आनंदांत होती, व हरतऱ्हेच्या गप्पा मारीत होती. किनतोबा आपल्याशींच विचार करीत बसला होता. हे कैदीलोक धर्मान्तर करण्याला तयार नाहींत, हें त्या धूर्त व वृद्ध नायकानें ओळखलेंच, व या दुराग्रहाचा अंत कटोहांत होणार, हेंहि त्याला कळून चुकलें; पण ही दुःखद गोष्ट त्याला सर्वांशानें मान्य नव्हती. 'सर्वांशानें' म्हणण्याचें कारण एवढेंच, कीं, सर्व पुरुष कैदी जाळले गेले असते, तरी त्याला विशेष पर्वा नव्हती. पण बायकांनां वांचवावें—निदान त्याला सौंदर्याची मूर्तीच वाटणारी

अशी ‘लांबट मुखवट्याची व पाणीदार डोळ्यांची उंच तरुणी’-म्हणजे उत्तरा-तरी वांचवावी, अशी त्याची इच्छा होती. परंतु ही गोष्ट उघड बोलण्याची सोय नव्हती. उघड बोललें, तर ‘किनतोबा स्त्रीलंपट आहे,’ असें लोक म्हणावयाचे! असा बभ्रा होऊं नये म्हणून ‘बायकांनां तरी वांचवावें,’ असें त्या अनुभविक धूर्त नायकानें मयाणीला सुचविलें होतें, व रागिणीला-त्याच्या भाषेंत म्हणावयाचें म्हणजे ‘ ‘वाटोळ्या तोंडाच्या व मोठ्या डोळ्यांच्या ठेंगणी’ला पाहिजे तर तूं घे,’ अशी त्याला लालूच दाखविली होती. ‘पाणीदार डोळ्यांची उंच तरुणी’ आपणांला मिळावी, ही किनतोब्याची मुख्य इच्छा होती, हें चाणाक्ष मयाणीनें मनांत ओळखलें, व ‘मोठ्या डोळ्यांची ठेंगणी’ आपण मिळवावी, असा त्यानें बेत केला.

परंतु हा बेत साध्य कसा करावयाचा? बाकीचे बहुतेक सर्व कारिसेन लोक तर ‘बायकांपुरुषांनां कटोहांत जाळून त्यांचें मांस खाऊं या,’ असें म्हणत होते. ‘बरेच दिवसांत आपल्या ‘मनित्या’ला—कटोहदेवतेला-मनुष्याचा बळि मिळाला नाहीं, तेव्हां ही संधि बरी,’ असें ते आपापसांत म्हणत होते. ‘बायकांनां तेवढें वांचवावें,’ असें उघड सांगणें चतुर मयाणीलासुद्धां कठिण पडलें. तरी पण त्यानें पूर्वी एकदां अनुकूल संधि पाहून वरील गोष्ट लोकांनां गोड शब्दांनीं सुचविलीच होती. परंतु ते मूढ रानटी लोक ही गोष्ट या वेळेला बहुतेक विसरूनच गेले होते. ‘सररहा सर्वांनां मारावें,’ असें ते आतां म्हणत होते. अशा स्थितींत किनतोब्यानें आणि मयाणीनें काय करावयाचें?

हे दोघेजण आपल्या मतलबाचा विचार करीत असतां मनुष्याचें मांस खावयाला उत्सुक झालेल्या एका प्रौढ वीरानें “या बाकीच्यांनांहि घाला कटोहांत; उगाच कां उशीर करतां?” असें म्हटलें, व सर्व लोकांचें लक्ष्य पुनः या क्रूर मतलबाकडे वळलें.

“कायरे, तुला आमच्या धर्मांत यायचें आहे, कीं, देऊं तुला सुद्धां फेंकून या कटोहांत?” असें दुभाष्यानें नानासाहेबांनां विचारलें.

परंतु नानासाहेबांनीं कांहींच उत्तर दिलें नाहीं. दुभाष्यानें तोच प्रश्न पुनः अधिक जोरानें व अधिक शिव्या हांसडून विचारला. तरीहि एक ना दोन! त्यानें नंतर तो प्रश्न आनंदरावादि सर्व मंडळींनां-बायकांनां सुद्धां-विचारला, पण कोणींहि त्याला उत्तर दिलें नाहीं.

ही गोष्ट त्या कारिसेनी दर्ग्यांला अपमानकारक वाटली. हे कैदी फारच हट्टी-मस्त-मगरूर आहेत, असें त्यांनीं मनाशीं ठरविलें, व 'यांची रग चांगलीच जिरविली पाहिजे,' असें त्यांपैकीं कांहींजण ओरडूं लागले, व कल्होळ करूं लागले. किनतोब्यानें मोठ्या प्रयासानें गलका बंद केला, व हलकेच "मयाणी, सर्वांनां जाळावें का पुरुषांनां तेवढें जाळावें ?—तुला कसें काय वाटतें ?" असें विचारलें.

"मी तरी काय सांगूं ?" मयाणी मानभावीपणानें ह्मणाला. "या सर्व लोकांनां पसंत पडलें, तर फक्त पुरुषांनांच मारावें. नाहीं तर बायकांनांसुद्धां जाळून टाकावें, झालें! माझी कशालाच विशेष हरकत नाहीं."

हें संभाषण ऐकून एका कोंपऱ्यांतील ओंड्यावर बसलेला एक धर्मनिष्ठ—जोहोधर्मनिष्ठ—गरीब म्हातारा म्हणाला "बायकांनां नका उगाच मारूं. त्यांनां आपल्या धर्मांत घ्या झालें."

"पण त्या आपल्या धर्मांत आल्या पाहिजेत ना?" एका रागीट तरुणानें मध्येंच म्हटलें.

"पहा, त्यांनां पुनः एकदां विचारून पहा." मीरबल गांभीर्यानें म्हणाला. शूर व लोकप्रिय मीरबलानें असें म्हटल्यावर मग काय? दोघांचौघांनीं एकदम उत्तरेला व रागिणीला तोच प्रश्न विचारला.

प्रश्नांतील शब्दार्थ जरी कळला नाहीं, तरी प्रश्नाचें धोरण काय आहे, हें त्या बायकांनीं ओळखलें, व त्यांच्या हृदयांत कसेंसेंच होऊन त्या बेशुद्ध पडण्याच्या बेतांत आल्या. प्रश्नाचें उत्तर मिळालें नाहीं, असें पाहून त्यांपैकीं एका तरुण वीराला चीड आली, व त्यानें आपल्या दंडुक्यानें उत्तरेला पाठीवर एक जरासा धपाटा मारून " ए सटवे, तुला बोलतां येत नाहीं का ? मुकी आहेस कीं बहिरी आहेस तूं ?" अशा अर्थाचे कठोर शब्द कर्कश स्वरानें उच्चारले.

पाठीवर धपाटा मिळालेला पाहून उत्तराहि संतापली, व मोठ्यानें " नाहीं ! मला तुमच्या धर्मांत यायचें नाहीं. तुमच्या कटोहाला मी भीत नाहीं, " असें म्हणाली, व लाल डोळ्यांनीं सर्व दर्ग्यांकडे तिरस्कारदृष्टीनें पाहूं लागली !

झालें ! तिचें नशीब ठरलें ! हा अपमान सहन करणें अशक्य होतें ! 'उचला, उचला या उद्धट पोरीला !' असा ध्वनि सगळीकडून उसळला. पाणीदार डोळ्यांच्या आवडत्या तरुणीला, ही क्षुब्ध झालेली मंडळी आतां जाळून टाकणार, अशी

किनतोब्याला भीति पडली. पण तो प्रसंगावधानी होता. दोनचार लोक उत्तरे-जवळ जाऊन तिला उचलूं लागणार, इतक्यांत तो चाणाक्ष व कावेबाज नायक म्हणाला "लोकहो, थांबा. या बायांनां जाळण्यांत अर्थ नाहीं. यांच्या मनांत आपल्या धर्मांत यायचें नाहीं, तर आपण त्यांनां मुद्दाम आपल्या धर्माची दीक्षा देऊं या, व मग पाहिजे तर त्यांनां कटोहांत फेंकून देऊं. या तरुण स्त्रीनें आपल्या धर्माचा अपमान केला आहे, तेव्हां तिला आपला धर्म खुषीनें नाहीं-तर बळजबरीनें घ्यायला लावलेंच पाहिजे !"

अशा प्रकारें किनतोब्यानें मोठ्या आवाजांत ओरडून सांगितल्यावर मंडळी कांहीं वेळ शांत राहिली, व उत्तरेला वांचविण्याचा किनतोब्याचा मतलब कांहीं वेळ तरी साध्य झाला.

इकडे, आपल्या विजयगांवकर मंडळींचीं प्रथम अत्यंत क्षुब्ध झालेलीं मनें आतां अगदीं श्रान्त-मलूल-बधिर झालीं होतीं. ही मंडळी इतकी निराश झाली होती, कीं, त्यांनां या भयंकर स्थितींतहि एक प्रकारचें मनःस्वास्थ्य आलें होतें. त्यांच्या नैराश्यामुळें त्यांच्या इंद्रियशक्तिच बहुतेक नष्ट झाल्या होत्या! उपाय-योजनेचा त्यांनीं विचारच सोडून दिला होता.

अशा स्थितींत ते पडले असतां वर वर्णन केलेला उत्तरेसंबंधाचा प्रकार घडून आला. आनंदरावांनीं हा प्रकार पाहिला नाहीं-म्हणजे शोकाकुल होऊन डोळे मिटून घेतले असल्यामुळें तो प्रकार अगदीं 'घडतांघडतां पाहिला नाहीं,' इतकाच याचा अर्थ. उत्तरा त्या प्राणसंकटांतून घटकाभर तरी वांचली, ही गोष्ट चांगली झाली का वाईट, याचा ते त्या मलूल स्थितींत झोंपेंतल्याप्रमाणें असंबद्ध रीतीनें व अनुत्साहानें विचार करीत होते.

अशा प्रकारचा विचार करतांकरतां त्यांनां एकदम काय विचार सुचला कोणाला ठाऊक! दचकून जागे झाल्याप्रमाणें ते एकाएकीं मोठ्यानें ओरडले, व लगेच ते किनतोब्याकडे वळून मोडक्या कारिसेनी भाषेंत म्हणाले "नायकजी, आम्ही तुमच्या धर्मांत येतों. पण तुमचा 'जोहो' धर्म आमच्या धर्मापेक्षां अधिक चांगला कसा, हें तुम्ही आपल्या 'उधाऱ्यां' कडून-(उपाध्याकडून) सांगा. तुमचा धर्म आमच्याहून चांगला आहे, अशी आमची खात्री झाली म्हणजे आम्ही तुमचा धर्म स्वीकारतों."

किनतोब्याला याचा अर्थ दुभाष्याकडून कळल्यावर त्याला जरासें बरें वाटल्या-सारखें दिसलें. त्याला आनंदरावांची सूचना पसंत पडली, याचें कारण फारसें

दुर्बोध नाहीं. लोकांचीं मनें क्षुब्ध झालीं असल्यामुळें या वेळीं उत्तरेला वांचवतां येईल किंवा नाहीं, याविषयीं तो किकिरींतच होता, व अशा ऐन वेळींही काल-हरण करणारी सूचना त्याच्या पथ्यावरच पडली. आनंदरावांचाहि हेतु कसेंतरी कालहरण करण्याचा-आजचें मरण उद्यांवर ढकलण्याचा—होता, हें चतुर वाचकांनां सांगण्याची जरूर नाहीं. निराशेनें व असंबद्ध रीतीनें ते विचार करीत असतां 'कॉनन डॉइल' नांवाच्या प्रसिद्ध इंग्रजी कादंबरीकारानें लिहिलेल्या 'Tragedy of the Kurosco' या ग्रंथांत ज्या एका प्रसंगाचें काल्पनिक वर्णन आहे, तसलाच प्रसंग आपणांवर खरोखरच येऊन ठेपला आहे, असा विचार त्यांच्या मनांत आला, व त्या कादंबरींत वर्णिलेल्या एका चतुर युक्तीचीहि त्याबरोबर त्यांनां स्मृति झाली. ही युक्ति म्हणजे दुसरी कांहीं नाहीं;तर '**शुभस्य शीघ्रम् व अशुभस्य कालहरणम्**' म्हणजे, 'शुभ' लवकर उरकून टाकावें, व 'अशुभ' असेल तें शक्य तितकें लांबणीवर लोटण्याचा प्रयत्न करावा, या तत्त्वाचा अवलंब करणें हीच होय. वर सांगितलेल्या कादंबरींत इजिप्तमधील मुसलमानांच्या हातांत सांपडलेल्या एका ख्रिश्चन प्रवाशानें 'माझी खात्री करून द्या, म्हणजे मी तुमचा धर्म स्वीकारीन,' असें बोलून धर्मान्तर करण्याच्या पेंचांतून आपला प्राण व धर्म कांहीं दिवस वांचवण्याचा प्रयत्न केल्याचें वर्णन आहे. आनंदरावांनां या प्रसंगाची आठवण झाल्याबरोबर वर म्हटल्याप्रमाणें ते दचकून जागे झाल्यासारखे झाले, व त्यांनीं एकदम वरील सूचना केली. जीवावरच्या प्रसंगीं कादंबरींतील प्रकरणाची आठवण होऊन जीव वांचविण्याची युक्ति सुचावी, ही तरी एक ध्यानांत ठेवण्यासारखीच गोष्ट आहे. असो.

आनंदरावांची मागणी मतलबी किनतोब्याला पटली, हें वर सांगितलेंच आहे. त्यानें मयाणीकडे व शेजारीं बसलेल्या उधाऱ्याकडे (उपाध्यायाकडे) पाहून म्हटलें "या जवानाची प्रार्थना बरी दिसते. हे लोक आपल्या धर्मांत आले, तर आपल्या देवाला बरें वाटेल. काय उधारजी, तुम्हाला कसें वाटतें?"

उधारजींची किनतोब्याच्या विरुद्ध जाण्याची छाती नव्हती. ते म्हणाले "या लोकांनां मी आपल्या देवतांचे प्रताप सांगतों, आणि आपल्या धर्मांत ते येतात का पहातों. बऱ्या बोलानें आले तर ठीकच; नाहीं तर त्यांच्याकरितां आपला हा कटोह वाट पहात बसलाच आहे!"

मयाणीनेंहि या गोष्टीला अनुमति दर्शविली, व मीरबल वगैरे कोणी विरुद्ध बोलले नाहीं. सामान्य लोक या मंडळींनां कटोहांत टाकण्याला उत्सुक झाले होते; पण त्यांपैकीं मीरबलाखेरीज कोणाचेंहि किनतोब्याविरुद्ध बोलण्याचें धैर्य नव्हतें.

लोक विरुद्ध आहेत, परंतु उघड बोलण्याची त्यांची छाती नाहीं, हें ओळखत असूनहि धोरणी किनतोबा ह्मणाला "उधाऱ्यानें यांनां उपदेश करून पहावें, हें म्हणणें लोकांनां पसंत दिसत आहे. तेव्हां तसें होऊंद्या. हे कैदी म्हणजे उपदेशानें वळतील, असें मला वाटत नाहीं; पण लोकांचें म्हणणेंच आहे, तेव्हां या गोष्टीला माझी हरकत नाहीं. बरें तर, उधारजी, या लोकांनां तुम्ही आज किंवा उद्यां आपल्या जोहो धर्माचा उपदेश करा, आणि पहा येतात का हे आपल्या धर्मांत. आपला धर्म सर्वांत श्रेष्ठ कसा, हें त्यांनां समजावून सांगा."

"अलबत्, अलबत् !" उधारजी म्हणाले. "आपला धर्म श्रेष्ठ आहे, हें सांगण्याची जरूरच नाहीं–त्यांनीं आपल्या 'टाओ'चे (सूर्याचे) व 'वने'चे (विजेचे) प्रताप ऐकले, व प्रत्येक लढाईंत आपल्या कर्शिब्यानें (देवानें) आपणाला कसा जय दिला आहे, व आपल्या शत्रूंचा त्यानें कसा पाडाव केला आहे, हें त्यांनीं ऐकलें, म्हणजे ते आनंदानें आपल्या 'कर्शिब्या'च्या पायां पडतील. आपल्या धर्मांत आलें म्हणजे खाण्यापिण्याला हवें तेवढें मिळतें, मांसाची वगैरे ददात रहात नाहीं हें त्यांनां कळलें, म्हणजे ते आपल्या धर्मांत घेण्याकरितां माझ्या पाठीला लागतील !"

"बरें आहे, मग." मयाणी म्हणाला. "आपल्या कटोहाला आज मनुष्याचा एकच बळि मिळाला एकंदरींत ! बरें आहे, त्याचा थोडाथोडा प्रसाद घेऊन जावें झालें आतां."

असें म्हटल्यावर, सर्व दर्ग्याचें लक्ष्य जनुभाऊंच्या मुडद्याचे तुकडेतुकडे करणाऱ्या म्हाताऱ्या बायकांकडे गेलें. त्यांच्या मांसाची खिरापत घेतल्यावर व मंडळीवर खड्या फरसवाल्यांचा पहारा ठेवण्याची मीरबलानें व्यवस्था केल्यावर किनतोबा, मीरबल, मयाणी इत्यादि रानटी बडे लोक आपापल्या झोंपडींत गेले, व तो दर्गा बरखास्त होऊन आपल्या विजयगांवकर मंडळी-वरील संकट एका दिवसानें तरी टळलें.

या गोष्टीबद्दल आईसाहेब, उत्तरा, रागिणी या पतिव्रतांनां आनंद झाला का दुःखच झालें ?

## प्रकरण पंधरावें.

## आपले जुने मित्र भय्यासाहेब.

मंडळींची इकडे अशी विटंबना होत असतां भय्यासाहेब ब्रह्मज्ञान मिळविण्याच्या हेतूनें प्रियब्रह्मस्वामींचा शोध करीत हिंडत होते! त्यांना बिचाऱ्यांनां आपल्या रागिणीवर भयंकर प्रसंग आला असेल, ही कल्पनाहि नव्हती. प्रियब्रह्मस्वामींचें दर्शन घेऊन त्यांच्यापासून आत्मबोध होऊन मुक्ति मिळते कीं काय हें पहावें, व ही गोष्ट शक्य नाहीं असें ठरल्यास घरीं परत जाऊन मंडळींची क्षमा मागावी, आणि रागिणीसह आनंदानें संसार करीत रहावें, असा त्यांचा हेतु होता. प्रियब्रह्मस्वामींच्या मठाचा शोध करीतकरीत ते हिमालयांत हिंडत असतां त्यांनां एकदांचा तो सांपडला. परंतु तेथें चौकशी करतात, तों स्वामीच तेथें नाहींत! ते दुसऱ्या एका मठांत–'आनंदमठां'त–रहावयाला गेले होते. या बातमीनें भय्यासाहेबांचा थोडासा हिरमोड झाला; पण ते अगदीं निराश झाले नाहींत. तसेच ते शोध घेत आनंदमठाजवळ आले, व आतां मात्र त्यांनां प्रियब्रह्मस्वामींच्या दर्शनाचा व सहवासाचा पुण्यप्रद लाभ मिळाला.

दर्शन झाल्याबरोबर भय्यासाहेबांनीं स्वामींच्या चरणांवर मस्तक ठेवून ह्मटलें "स्वामिन्, मी एक ब्रह्मजिज्ञासु आहें. आपली कीर्ति पुष्कळ दिवस मी ऐकत आलों असून आपलें पुण्यकारक दर्शन घेण्याचा व आपली मोक्षप्रद सेवा करीत रहाण्याचा माझा बऱ्याच दिवसांचा हेतु आहे. हा हेतु आतां सफल होण्याचा सुदैवानें योग आणला आहे. आपणापासून ब्रह्मज्ञान प्राप्त करून घ्यावें, याशिवाय माझी दुसरी कांहीं इच्छा नाहीं. तेव्हां मला आपली सेवा करून आपला उपदेश ऐकण्याची अनुज्ञा असावी. ब्रह्मजिज्ञासेच्या पायीं मीं आपल्या वृद्ध पित्याचा व तरुण पत्नीचा सर्वथा त्याग केला, व इतकें करूनहि आतां जर आपला अनुग्रह माझ्यावर झाला नाहीं, तर माझ्यासारखा अभागी मीच! माझी प्रिय पत्नी—"

"मला सर्व ठाऊक आहे." प्रियब्रह्मस्वामी मंदस्मित करून मध्येंच म्हणाले "बोधस्वरूपस्वामींनीं तुह्माला मेल्याचें सोंग घेण्याचा कसा उपदेश केला, त्यानंतर तुमची आणि तुमच्या रागिणीची कोठेंकोठें व कशी गांठ पडली, हें मला सर्व ठाऊक आहे. आम्रवृक्षावर बसून उत्तरेचा व रागिणीचा संवाद तुह्मी ऐकत होतां, हें मला ठाऊक आहे, आणि—"

" आपणाला हें कसें ठाऊक ?" भय्यासाहेबांनीं आश्चर्यचकित होऊन विचारलें.

" बाळा, " स्वामी मधुर व प्रेमळ वाणीनें ह्मणाले. " याच्यांत विशेष कांहीं नाहीं. कांहीं काळ योगाभ्यास केल्यास तुलाहि अंतर्ज्ञानाची सिद्धि प्राप्त होईल; पण या शक्तीचें मला विशेष महत्त्व वाटत नाहीं."

" कां बरें ?"

" या विश्वांत ईश्वरानें अनेक वस्तूंनां अनेक गुणधर्म किंवा अनेक शक्ति दिल्या आहेत. अमुक वस्तूला अमुक एक गुण आहे, ह्मणून तिला दुसऱ्या वस्तूंवर प्रौढि मिरवण्याचा अधिकार नाहीं. एकाद्या मनुष्याची शारीरिक, बौद्धिक किंवा यौगिक शक्ति किती आहे, या प्रश्नापेक्षां तो मनुष्य आपल्या शक्तीचा सदुपयोग करीत आहे किंवा नाहीं, हा प्रश्न अधिक महत्त्वाचा आहे. असो. एकाद्या मनुष्याला अंतर्ज्ञानानें कांहीं गोष्टी कळतात, एवढ्यावरून तो पूज्य आहे असें मानणें चुकीचें आहे. तुझी बायको हल्लीं मोठ्या संकटांत आहे, हें मला आतां अंतर्ज्ञानानें कळत आहे. पण या ज्ञानाचा—"

" ह्मणजे ? रागिणी संकटांत आहे–कोणत्या–कोठें ?–" भय्यासाहेबांनीं अत्यंत अधीरतेनें विचारलें.

" जवळच्या या गांवांत. प्राणनाशापेक्षांहि महत्तर संकट तिच्यावर आलें आहे."

" महाराज, तर मग कोणी तरी शिष्य बरोबर देऊन मला वाट दाखविण्याची तजवीज करतां काय ?" भय्यासाहेब उत्सुकतेनें ह्मणाले.

" तिला मदत करण्याची वेळ गेली. " प्रियब्रह्मस्वामी उदास चर्या करून गांभीर्यानें ह्मणाले. " जें होणार आहे, तें तुझ्या जाण्यानें टळणार नाहीं !"

" तरी पण मी जातों, आणि प्रयत्न करून पहातों."

" प्रयत्न करण्याची जरूर नाहीं. तिची स्थिति उपायांपलीकडची आहे."

हें वाक्य ऐकतांच भय्यासाहेबांच्या मनाची फार चलबिचल झाली. त्यांचें डोकें भणाणलें, व घेरी येण्याची पाळी आली. पण त्यांनीं मोठा विवेक करून अखेर मन थोडेंबहुत आवरलें, व ह्मटलें " स्वामिन्, आपण अंतर्ज्ञानी आहांत, ही माझी खात्री झाली आहे. आपण ह्मणतां त्याप्रमाणें ती उपायातीत स्थितींत आहे, असें मी समजतों. हें एका अर्थी बरेंच झालें. संसाराचे मोहपाश आतां

पुरे तुटले ! आतां आपल्या सेवेशिवाय व ब्रह्मचर्चेशिवाय मला दुसरें कार्य उरलें नाहीं. आपल्या या मठांत आपली सेवा करीत रहाण्याची मला अनुज्ञा द्यावी, एवढेंच मागणें आहे."

" तुझी ब्रह्मजिज्ञासा तीव्र आहे, हें मीं तुझ्या चर्येवरूनच ओळखलें. खरें प्रेम काय किंवा खरी जिज्ञासा काय, पहातांक्षणींच मनुष्य ओळखूं शकतो. येथें रहाण्याची तुझी उत्कट इच्छा आहे, तेव्हां मी तुझ्या आड येत नाहीं. तुला पाहिल्यापासूनच मी तुला आपला शिष्य समजत आहें. "

" तर मग गुरुजी, माझें कर्तव्य काय आहे तें मला सांगा. माझी पत्नी महत्संकटांत आहे असें आपण ह्मटलें; मी आतां तिकडे जाऊं का येथेंच राहूं ?"

"याचा तूं आपल्या मनाशींच विचार करून काय तें ठरीव. कोणताहि मार्ग स्वीकारलास तरी हरकत नाहीं. "

" तर मग ती जिथें आहे, तिकडेच मी जातों. "

" बायकोचा तुझा मोह सुटला होता ना ? " स्वामी विषरहित विनोदानें ह्मणाले.

" मोह सुटला आहे; पण–पण–काय तें सांगतां येत नाहीं ! "

## प्रकरण सोळावें.

## किनतोब्याचें हृद्गत.

वाचक हो, प्रियब्रह्मस्वामींच्या मठांतील पवित्र रम्य गोष्टी सोडून आपणांला आतां किनतोब्याच्या झोंपडींत काय भयप्रद पापविचार चालले आहेत, तें ऐकावें लागणार आहे. तो पहा किनतोबा आपल्या दोन बायकांच्यामध्यें बसून कसल विचार करीत आहे तो. त्याच्या मनांतले विचार त्याच्या बायकांनां कळत नाहींत, हे त्या बायकांवर उपकारच आहेत! 'किनतोबा असा विचार तरी काय करीत होता?' असें आपण साहजिकपणेंच विचाराल. त्याचे विचार सांगावयाला कांहीं हरकत नाहीं. ऐका त्याचें आत्मगत भाषण:—

"ती चांफेकळी पोरगी मला पाहिजे आहे." किनतोबा म्हणत आहे. "ती मिळाली, म्हणजे माझ्या जन्माचें सार्थक झालें. मला या दोन बायकांचा आतां अगदीं वीट आला आहे. या दोघी एकमेकींशीं भांडत असतात, व मला त्रास देत असतात. यापूर्वी या दिसण्यांत चांगल्या होत्या; पण आतां यांच्यांत कांहीं सौंदर्य राहिलें नाहीं; आणि यांचें सौंदर्य कायम राहिलें असतें, तरीहि त्या नवीन गोऱ्या पोरीपुढें यांचें तेज फिकेंच पडलें असतें. ती चांफेकळीसारख्या नाकाची पोर किनतोब्याला अगदीं शोभण्यासारखी आहे. तिचे ते तुळतुळीत काळेभोर केंस कोणीकडे, आणि माझ्या या बायकांच्या पिकलेल्या केंसांच्या जटा कोणीकडे! तिचे दांत, तिचे डोळे, तिचे हात–तिचें सर्व कांहीं फार मोहक आहे! मी म्हातारा होत चाललों आहें; पण त्या पोरीनें माझ्या अंगांतहि तारुण्याचा उत्साह आणला आहे. ती पोरगी दुसऱ्या धर्मांतली कां असेना, ती मिळविलीच पाहिजे. पण ती मिळवायची कशी? लोक तर 'या साऱ्या माणसांनां कटोहांत जाळून टाका,' असें म्हणत आहेत. कालच त्यांनीं त्यांनां जाळून टाकलें असतें; पण त्या जवान मयाणीनें प्राण वांचविण्याकरितां कांहीं तरी युक्ति काढली म्हणून बरें झालें. त्याची युक्ति चालवूं देणारा मी नाहीं. पण त्या वेळीं त्या पोरीला वांचविण्याकरितां मीं कबूल केली त्याची गोष्ट. या पुरुषांनां आज नाहीं तर उद्यां मी मारून टाकणारच. बायकांनां मात्र घेऊं ठेवून. त्या तिघींपैकीं म्हातारीशी आहे, ती द्यावी आपल्या 'याया' (चुलत्या)ला, आणि तिची लांब नाकाची मुलगी घ्यावी आपण. ती वाटोळ्या तोंडाची पोर सुद्धां कांहीं वाईट नाहीं. पण तिच्यापेक्षां हीच बरी एकंदरींत. मयाणीचें व मीरबलाचें मन

तिसरीवर गेलें आहे, हें माझ्या पथ्यावरच आहे. ते दोघेजण या बायकोकरितां लढतील, आणि एकमेकांनां मारतील; नाहीं तर एकमेकांनां जखमा तरी करून घेतील. कांहीं झालें तरी माझा फायदाच आहे. हे दोघेजण मला अलीकडे डोईजड झाले आहेत. यांनां एकमेकांविरुद्ध लढवून शेवटीं आपलाच फायदा करून घ्यावा झालें!

" माझें हें वर्तन खऱ्या वीराला शोभण्यासारखें नाहीं. पण माझा तरी याला काय उपाय आहे ? माझ्या अंगांत पूर्वीची रग असती, तर या लोकांची पर्वा न करितां मीं आपल्या या आवडत्या पोरीला सर्वांच्या देखत हिसकावून घेतलें असतें. पण त्याचें आतां काय ? किनतोबा होण्यापूर्वी माझ्या हृदयाला भीति कशी ती शिवली नाहीं. पण तोच मी आतां भ्याड व कावेबाज झालों आहें. पूर्वी मी नुसता शूर वीर असतां लोक माझ्या पुढेंपुढें करीत असत. आतां मी बाहेरून 'किनतोबा' आहें खरा, पण माझें उच्चस्थान मीरबलाला किंवा मयाणीला मिळूं नये म्हणून मला त्यांनां व लोकांनां हरतऱ्हेनें खुष ठेवावें लागत आहे. 'कमाना', ( ईश्वरा,) मला तूं किनतोबा केलें नसतेंस, तर मी आतां त्या पोरीला घेऊन बसलों असतों; व जो कोणी मला हरकत करावयाला आला असता, त्याचे तुकडेतुकडे करून टाकले असते. महत्त्वाकांक्षेनें मनुष्य असा भ्याड व कावेबाज होतो ! आणि स्वतःचें वीर्य व औदार्य विसरून जाऊन पाहिजे तें निंद्यकर्म करण्याला प्रवृत्त होतो !"

## प्रकरण सतरावें.

## कैद्यांची स्थिति.

आतां इकडे आपल्या या श्रीमन्त–परंतु हतभागी कैद्यांची कशी काय अवस्था आहे, हें पाहूं या.

दर्गा बरखास्त झाल्यावर आमच्या या विजयगांवकर प्रवासी मंडळीला तेथेंच झाडाखालीं फरसवाल्यांच्या पहाऱ्याखालीं ठेवण्यांत आलें होतें. त्यांनीं रात्रीं पळून जाऊं नये, किंवा दंगामस्ती करूं नये, ह्मणून त्या सर्वांचे हात मागें वळवून पाठीमागें एका चिवट वेलीनें बांधले होते, आणि दोन्ही पायहि तसेच जखडून टाकण्यांत आले होते. दोन्ही दंड अंगाशीं चिकटून राहतील अशा रीतीनें त्यांभोंवतीं एक जाड वेल गुंडाळून ते घट्ट बांधले होते. बायकांचीं मनगटें बांधीत असतां त्या जंगली लोकांचें लक्ष्य त्यांच्या पाटल्यांकडे आणि सोन्याच्या व कांचेच्या बांगड्यांकडे गेलें. त्या लोकांनां सोन्याच्या बांगड्यांचें विशेष कांहीं वाटलें नाहीं. पण कांचेच्या चकचकीत रंगीबेरंगी बांगड्या त्यांनां फार आश्चर्यकारक वाटल्या! ते त्या बांगड्या ओढून काढूं लागले, व अडाण्यांप्रमाणें ते बांगड्या ओढूं लागल्यामुळें त्या बायकांच्या बहुतेक बांगड्या वाढवल्या! काढतांकाढतां बांगड्या फुटतात, असें पाहून त्यांनीं तो नाद सोडून दिला, व 'या बांगड्या यांच्या हातांत गेल्या तरी कशा?' याबद्दल ते मनांत अचंबा करूं लागले. फुटलेल्या बांगड्यांचे कांहीं तुकडे एकानें उचलले, व तो ते चोरून घेऊन जाऊं लागला. पण इतक्यांत एका पहारेकऱ्यानें त्याला पाहिलें, व त्याला ते सर्व तुकडे खालीं ठेवावयाला सांगून त्या पहारेकऱ्यांनीं ते सर्व आपापसांत सारखे वांटून घेतले.

त्या हतभागी बायकांच्या गळ्यांतील दागिन्यांची व कांचेच्या हिरव्यानिळ्या पोतींचीहि अशीच स्थिति झाली. त्या मूढ जंगली लोकांनीं बांगड्यांपेक्षां या लहान, परंतु भोकें असलेल्या मण्यांची फार तारीफ केली! हे 'वाटोळे लहान गोळे' किनतोब्याला विचारल्याशिवाय आपण घेऊं नये, असें त्यांनीं ठरविलें, व त्यांनीं ते एका जाड्याभरड्या फडक्यांत बांधून किनतोब्याकडे पाठवून दिले.

हाय हाय! काय या बिचाऱ्या स्त्रियांची दीन स्थिति! देवा व दैवा, तुह्मांला हें पहावलें तरी कसें? ज्या सुकुमार हातांत सोन्याच्या पाटल्या व बांगड्या असावयाच्या, तेथें आतां घट्ट बांधलेल्या वेलींचे वळ पडले होते! जेथें सोन्याचे

बाजूबंद, तेथें चिवट वेलींचा बंध! जो कंठ सरीनें, हारानें वगैरे भरलेला असावयाचा, त्या कंठांत कांचेचा फुटका मणीसुद्धां आतां राहिला नव्हता, व तो आतां संन्याशाच्या डोक्याप्रमाणें भुंडा झाला होता! ज्या कोमल, सुंदर, सुकुमार ब्राह्मण स्त्रिया पानांफुलांनीं भरलेल्या वेलींप्रमाणें दिसावयाच्या, त्या आतां पाला ओरबडून काढलेल्या मेंदीच्या छडीप्रमाणें दिसत होत्या! दैवा, तुझी लीला विचित्र आहे, यांत शंका नाहीं.

त्या रात्रीं या मंडळीला झोंप आली नाहीं, हें सांगितलेंच पाहिजे असें नाहीं. दुसऱ्या दिवशीं सकाळीं त्यांचे पाय सोडण्यांत आले, व त्यांनां शौच-मुखमार्जन करावयाला नदीवर नेण्यांत आलें. त्यांचे हात मात्र तसेच बांधलेले होते, व प्रत्येकाच्या कंबरेला एक लांब व चिवट वेल बांधून त्याचीं टोकें एकएका पहारेकऱ्यानें आपल्या हातांत घेतलीं होतीं. या स्थितींतच त्यांनां प्रातर्विधि करावा लागला. त्या रानटी पशूंनां कसली लाजलज्जा आली आहे? त्यांनीं त्यांनां नदीवर नेलें, आणि सर्व कैद्यांनां जवळजवळ व आपल्या समोरच—

नको, नको-तें वर्णन नको! आपल्या कट्टया शत्रूवरसुद्धां असला प्रसंग येऊं नये! असले प्रसंग या पुरुषांवर व स्त्रियांवर देवानें आणले, ही गोष्ट खेदाची आहे; पण ती कांहीं आपल्या हातांतली नाहीं. त्या गोष्टींचें किळसवाणें वर्णन न करणें हें मात्र आपल्या हातांत आहे. नानासाहेब, भाऊसाहेब, उत्तरा, रागिणी इत्यादिकांवर हे प्रसंग आले, त्यांनीं निंद्य अपमान सोसले, अवर्णनीय दुःख भोगलें, हें सर्व खरें; पण झालें तें झालें. ते दिवसहि आतां निघून गेले. आतां त्या प्रसंगांची जगाला आठवण करून देण्यांत काय अर्थ आहे? अशा प्रकारचे जे प्रसंग असतात, ते जगाला न कळलेलेच बरे,-अथवा कळले असल्यास त्यांचें विस्मरण झालेलेंच उत्तम!

शौच-मुखमार्जन करून घेतल्यावर कांहीं वेळानें या मंडळीपुढें मांसाचे व जाड भाकऱ्यांचे उरलेसुरले तुकडे, निठाचे खडे, लाल मिरच्या एवढी खाद्यसामग्री टाकण्यांत आली. त्या मांसाच्या व जाड भाकरीच्या तुकड्यांकडे त्यांचें लक्ष्य कसलें जातें? त्यांनीं तिकडे पाहिलें सुद्धां नाहीं. मांसाचे तुकडे आदल्या दिवशींच्या कढोहांत भाजलेले होते, व तें मांस त्या पहारेकऱ्यांनीं फार स्वादिष्ट म्हणून रात्रीं मिटक्या मारीत खाल्लें होतें.. पहारेकऱ्यांनीं पोटभर खाऊन उरलेले तुकडे यांनां दिले होते. कढोहांत भाजलेलें हें स्वादिष्ट

मांस हे कैदी कां खात नाहींत, याचें त्या जंगली नरपशूंनां मोठें आश्चर्य वाटलें, व ते या मंडळींची वेड्यांमध्येंच गणना करूं लागले!

कांहीं वेळानें या कैद्यांनां पहाण्याकरितां त्यांच्या भोंवतीं बायकामुलांची वगैरे गर्दी जमली. तिरकमठा, तीर व फरस घेतलेले तरुण लोकहि या कैद्यांकडे कांहीं वेळ कौतुकानें पहात उभे रहात होते, व नंतर आपल्या शिकारीच्या कामाला जात होते. घिसाडणींसारख्या कांहीं थेरड्या बाया या सुशिक्षित नागरिकांकडे पाहून आपले काळेकुट्ट दांत काढून हंसत, व कडेवरच्या लहान शेंबड्या पोरांनां 'रडलास तर असा बांधून ठेवीन,' अशा प्रकारच्या धमक्या देत होत्या. कांहीं तरुण स्त्रिया आपल्या हट्टी रडव्या मुलांनां या कैद्यांकडे घेऊन येत, व 'हट्ट केलास, तर या बागुलबुवाकडे फेंकून देईन,' असें दरडावून सांगून आपल्या मुलांचा हट्ट थांबवीत होत्या. एक अक्राळविक्राळ तोंडाची व उरःप्रदेश मोकळा टाकलेली म्हातारी कैद्यांजवळ गेली, व त्यांच्याकडे निरखून पाहून उवा झालेलें आपलें डोकें खाजवीतखाजवीत हंसली, आणि 'यांचें मांस आज रात्रीं आपणाला खावयाला मिळेल,' असें वाटून मनांत आनंद पावली. कांहीं कोमल मनाच्या तरुण बाया त्या सुकुमार कैदी बायकांकडे आश्चर्यानें पहात होत्या, व 'यांनां जाळून टाकूं नये,' असें आपल्या जिवलग मैत्रिणींशीं म्हणत होत्या. त्या जंगली लोकांपैकीं कांहीं उच्छृंखल व नग्नप्राय तरुण उत्तरेच्या किंवा रागिणीच्या समोर येत, व डोळे मारून जात होते. कांहीं वात्रट शेंबडीं पोरें त्यांनां खडे मारून पळून जात होतीं. कांहीं पोरें बोरें खाऊन आंतील बिया या दीन कैद्यांवर फेंकीत होतीं. एका नवशिक्या व भित्र्या पोरानें एक बी लांबून कैद्यांकडे फेंकली; पण ती पहारेकऱ्यालाच लागली; त्याबरोबर तें पोर लांब पळून गेलें. पण त्या पहारेकऱ्यानें त्याला खुणेनें बोलावलें, व 'या बायकांकडे बिया मार,' असें त्याला डोळयाच्या खुणेनें सुचविलें! कित्येक स्त्रिया किंनरीकडे पाहून स्वजाति सोडून लग्न लावल्याबद्दल तिला टोमणे देत होत्या. तिच्या मैत्रिणी टिल्लूकडे पाहून व त्याचा काळा रंग निरखून 'हा आपल्या जातीचाच असावा,' असें म्हणत होत्या, व किंनरीनें याच्याशीं लग्न लावलें, यांत कांहीं वाईट केलें नाहीं, अशी हुजत घालीत होत्या. मीरबलाची आवडती व रूपगर्विष्ठ स्त्रीहि या कैदी बायकांनां चांगलें निरखून पहाण्याकरितां आली होती. उत्तरेकडे व रागिणीकडे क्षणभर पाहिल्याबरोबरच तिला कळून आलें, कीं, 'या स्त्रिया जर जीवंत

राहिल्या, तर मग आपल्या नवऱ्याचें प्रेम आपल्यावर फार दिवस रहाणें शक्य नाहीं!' हा विचार आल्याबरोबर 'आज रात्रीं या बायकांना कटोहांत टाकून जाळण्याची कांहीं तरी युक्ति केलीच पाहिजे,' असा तिनें मनाशीं निश्चय केला. तिच्या सवती-मीरबलच्या नावडत्या स्त्रिया-जवळ उभ्या होत्याच. त्यांनीं तिला चिडवण्याकरितां 'या बायकांकडे पाहिलंत का?' असें या गर्विष्ठ सवतीला अर्थसूचक स्वरानें विचारलें. तिनें त्यांचा हेतु ओळखला, व 'मला डोळे आहेत,' असें रागानें म्हटलें, आणि या टोमण्याबद्दल आपल्या सवतींचा केव्हां तरी चांगलाच सूड घ्यावयाचा, असा तिनें मनाशीं निश्चय केला. मीरबलहि तेथें एकदां येऊन कैद्यांची विचारपूस करून गेला होता. विचारपूस करतांना रागिणीच्या सुखाची त्याला विशेष आस्था आहे, असें दिसलें. किनतोबाहि चौकशी करून व उत्तरेची विशेष बरदास्त ठेवण्याला पहारेकऱ्यांनां सांगून त्याच सुमाराला आपल्या कामाला गेला होता. मीरबलाचें किंवा किनतोब्याचें हें अगत्य पाहून मंडळीला बरें वाटलें, कीं, राग आला, हें समंजस वाचकांनां सांगण्याची जरूर नाहीं. असो.

अशा रीतीनें ते श्रीमंतींत वाढलेले, व वादविवाद करून ईश्वराला न्यायी किंवा अन्यायी ठरविणारे ईश्वराचेहि न्यायाधीश, आणि त्यांच्या त्या सुविनीत सुकुमार स्त्रिया, त्या जंगली व क्रूर माणसांच्या हास्याला, कौतुकाला, असूयेला व चेष्टेला पात्र झालीं, व त्यांनां चावट पोरांचे खडे, पुरुषांच्या शिव्या, म्हाताऱ्या बायांची चेष्टा इत्यादि प्रकारचे हरतऱ्हेचे अपमान दिवसभर निमूटपणें सोसावे लागले. पण यानंतर रात्रीं जो त्यांच्यावर प्रसंग आला, त्याच्यापुढें हे अपमान कांहींच नाहींत! रात्रीं त्या स्त्रीपुरुषांच्या प्राणांवर बेतली; इतकेंच नव्हे, तर प्राणांपेक्षांहि प्रिय असलेल्या अब्रूचाहि—

# प्रकरण अठरावें.

## ‘ रागिणीला कटोहांत—’

रात्रीं नवांच्या सुमाराला त्या क्रूर लोकांचा पुनः दर्गा भरला. शुद्ध पक्षांतील चतुर्थीची ती रात्र. चंद्राची कोर नुकतीच नभोमंडलांत उगवली होती, व या डोंगरावर घडून येणाऱ्या भयंकर प्रसंगाची आगाऊ अटकळ झाल्यामुळेंच कीं काय, तिचा प्रकाश उदास व अंधुक दिसत होता. आकाशांत काळे ढग आले होते, व ते दुर्मुख होऊन मंदपणें फिरत होते. चंद्रप्रकाश स्पष्ट नव्हता, म्हणून त्या निर्दय लोकांनां विशेष वाईट वाटलें, अशांतला भाग नाहीं. त्यांनां चंद्रप्रकाशाची काय पर्वा? त्यांचा कटोह त्यांच्या कामाला पुरून उरण्यासारखा होता. तो कटोह बराच प्रकाश देत होता, व या प्रकाशांत सौम्यता किंवा आल्हादकत्व मुळींच नव्हतें; उलट तो अत्यन्त भयप्रद दिसत होता. त्याचा प्रकाश लांब बऱ्याच अंतरापर्यंत पसरला होता. कालमुखाप्रमाणें पसरलेलें त्याचें मुख आपल्या ज्वालारूपी अनेक जिभा मागेंपुढें करून ‘बळि द्या, बळि द्या,’ असेंच जणूं काय सुचवीत होतें!

त्या दर्ग्यांत,—त्या अर्धनग्न स्त्रियांच्या, अकाळ-विक्राळ म्हाताऱ्यांच्या, लहान पोरांच्या, फरसवाल्या पुरुषांच्या दर्ग्यांत—प्रथम बराच वेळ हंशा व गोंगाटच चालला होता. कांहीं वेळानें किनतोब्यानें सर्वांनां गप्प बसावयाला मोठ्यानें सांगितलें, व क्रमाक्रमानें तेथें थोडीबहुत शांतता प्रस्थापित झाली. ‘थोडीबहुत’ ह्मणण्याचें कारण एवढेंच, कीं, रडणाऱ्या पोरांचा, हळुहळू गप्पा मारणाऱ्या पुरुषांचा, भोंभों करून भुंकणाऱ्या कुत्र्यांचा, कटोहांतील जळणाऱ्या व पडणाऱ्या लांकडांचा, आणि आकाशांतील ढगांच्या गर्जनेचा मधुनमधून आवाज येतच होता.

साधारण शांतता झाल्यावर किनतोबा आपल्या ओंड्यावर बसूनच उच्च स्वरानें ह्मणाला “धर्मात येण्याला हे लोक अद्यापि तयार नाहींत, असें उधारजींनीं मला सांगितलें आहे. पुरुष भलत्याभलत्या शंका विचारतात, व आपल्या धर्माची निंदा करतात, असें उधारजी ह्मणतात. तर या पुरुषांनां आजच कटोहांत बळि द्यावयाचें किंवा कसें, याचा आज आपण विचार करूं.”

किनतोबा असें ह्मणाल्यावर मयाणी ह्मणाला “यांनां आजच्याआज जाळून टाकावें!”

त्याचें हें म्हणणें सर्वांनां पसंत पडल्यासारखें दिसलें. परंतु मीरबल म्हणाला "हे लोक शूर दिसत आहेत. यांनां मारण्यापेक्षां, त्यांनां आपल्या धर्मात आणण्याचा अधिक प्रयत्न करावा, असें मला वाटतें. आज जरी हे कबूल नसले, तरी चारआठ दिवसांतच कबूल होतील. आपल्या धर्मात ते आले, तर आपल्या जातींतील बायका यांनां करून द्याव्यात, व यांच्या बायका आपण कराव्यात."

मीरबलानें सुचविलेला हा विचार किनतोब्याला विशेष पटला, असें नाहीं. तथापि मीरबलाला नाखूष करण्याची त्याची इच्छा नसल्यामुळें तो त्याच्या विरुद्ध बोलला नाहीं. तो जरी स्तब्ध बसला, तरी वक्तृत्वाभिमानी मयाणी स्वस्थ बसणारांपैकीं नव्हता. मीरबलाच्या विरुद्ध बोलतांना तर त्याला फारच जोर यावयाचा. तो म्हणाला "मीरबलाचें म्हणणें औदार्याचें आहे; पण हे कैदी लोक आपल्या बायका आम्हांला खुषीनें देतील, असें मीरबलला वाटतें तरी कसें? आणि हे पुरुष जीवंत ठेवून आपल्या जातीचा काय मोठा फायदा होणार आहे?"

यावर तिसरा एकजण म्हणाला "या लोकांनां वास्तविक कालच जाळून टाकलें पाहिजे होतें. शत्रूला आपल्या बायका देण्याची कल्पना मला मुळींच पसंत नाहीं!"

"शत्रु शूर असला, तर त्याला जातींतील बायको दिली म्हणून वाईट काय झालें?" मीरबल आवेशानें म्हणाला.

"पण आपल्या जातींतील बायका करण्याला हे तयार आहेत का नाहींत, हें आधीं यांनां विचारूं या, आणि मग वाटलें तर आपण भांडूं." एकजण समंजस धोरणी म्हातारा मनुष्य म्हणाला.

दुभाष्यानें वरील प्रश्न नानासाहेबांनां विचारला; परंतु एकदोन मिनिटें त्याला कांहीं उत्तरच मिळालें नाहीं परंतु पुनः तोच प्रश्न त्यानें जोरानें विचारल्यावर नानासाहेब म्हणाले "आम्ही तुमच्या धर्मात येऊं; पण तुमच्या उधारजींनीं आमच्या शंकांचें आधीं समाधान केलें पाहिजे. आज त्यांनीं आपल्या धर्माची जी माहिती सांगितली, ती ऐकून आम्ही खुष झालों आहोंत; पण अद्यापि कांहीं शंकांचें निवारण झालें नाहीं. तेव्हां आठ दिवसांची आम्हांला

मुदत दिल्यास व आमच्या शंकांचें समाधान झाल्यास आम्ही कदाचित् तुमच्या धर्मांत येऊं !"

हें उत्तर ऐकून किनतोबा मनांत हंसला, आणि "हे लोक पक्के लुच्चे आहेत,' असें तो आपणाशीं म्हणाला. आठ दिवस मुदत द्यावयाची कीं नाहीं, याविषयीं त्या अव्यवस्थित सभेंत गोंगाट, वादविवाद व भांडण होऊन अखेर 'आतांच्या आतां एक उत्तर द्या,' असें नानासाहेबांनां निक्षून विचारण्यांत आलें, व त्याबरोबरच "धर्मांत नाहीं आलांत, तर हा आमचा कटोह तुमची वाट पहात बसलाच आहे!" असेंहि सांगण्यांत आलें.

झालें. '**अशुभस्य कालहरणम्**' या तत्त्वाप्रमाणें चालून आजचें मरण उद्यांवर ढकलण्याचा प्रयत्न याप्रमाणें विफल झाला! आतां प्रसंगाला शांतपणें सादर होण्यापेक्षां दुसरें कांहीं गत्यंतर राहिलें नव्हतें. हा प्रसंग केव्हांना केव्हां तरी येणार, हें तीं सर्वजणें ओळखून होतीं; पण प्राणान्तिक प्रसंग अगदीं जवळ आल्यावर शांत रहाणें कठिण आहे. कोमल मनाच्या पुरुषांनां व स्त्रियांनां तर ही गोष्ट बहुतेक अशक्यच आहे. आईसाहेब, उत्तरा व रागिणी धाय मोकलून रडूं लागल्या. पुरुष मंडळीच्या डोळ्यांतून टपटप आंसवें गळूं लागलीं. रागिणीनें भाऊसाहेबांच्या मांडीवर डोकें टाकलें, व हें पाहिल्याबरोबर तर भाऊसाहेबहि मोठ्यानें रडूं लागले! उत्तरा आपल्या आईच्या अंगावर पडली, व नानासाहेब तिचें सांत्वन करूं लागले. पण त्या सांत्वनांत कांहीं अर्थ नव्हता. स्वतःच त्यांनां चांगलें रडूं कोसळण्याच्या बेतांत होतें, तेव्हां ते दुसऱ्याचें काय सांत्वन करणार? आणि सांत्वन करण्याला त्यांनां विशेष अवकाश तरी कोठें मिळाला? "लवकर बोला, लवकर बोला," असें एकसारखें दुभाष्याचें टुमणें चाललेंच होतें, व एका पहारेकऱ्यानें तर त्यांनां दोनतीन लाथाहि तितक्यांत मारून घेतल्या!

नानासाहेबांनीं वैतागून अखेर "आम्हांला तुमच्या धर्मांत यायचें नाहीं, काय पाहिजे तें करून घ्या!" असें जोरानें म्हटलें, व किनतोब्याकडे ते बेफिकीरीनें व अभिमानानें पहात राहिले! कांहीं वेळानें शास्त्रीबुवांनीं, आनंदरावांनीं व बायकांनींहि आपला दुःखावेग आवरला, व त्या प्राणसंकटप्रसंगींहि श्रेष्ठ धारिष्ट धरून आपलें कर्तव्यकर्म न सोडतां ती सर्व मंडळी अग्निनारायणाला प्राणांची आहुति देण्याला शांत चित्तानें तयार झाली.

नानासाहेबांचें उत्तर ऐकल्यावर त्या जंगली व मनुष्यभक्षक लोकांमध्यें 'पुरुषांनांच मारावयाचें, का बायकांनांसुद्धां त्यांच्याबरोबर मारावयाचें?' याविषयीं पूर्वीसारखाच वाद सुरू झाला. या वेळीं चंद्राची कोर बरीच वरती आली होती; परंतु ढग आड आल्यामुळें तिचा प्रकाश मुळींच पडत नव्हता. ती चंद्रकला सजीव असून खालीं घडून येणारा प्रकार न पहावल्यामुळें तर तिनें मेघांचा बुरखा घेतला नव्हता ना? वायूलासुद्धां दुःख झालें होतें कीं काय कोणाला ठाऊक! तोहि मंदमंद व उष्ण उसासे टाकीत होता. आकाश मेघांनीं व्याप्त झाल्यामुळें कृष्णवर्ण व उदास झालें होतें, व जणूं काय तो भयंकर कटोह विझविण्याकरितां पर्जन्यवृष्टि करण्याच्या बेतांत होतें. सभोंवतालचे वृक्ष चाललेल्या प्रकाराकडे निरुपाय म्हणून तटस्थपणें पहात होते. लतांनां तो भयंकर प्रकार पहावा लागत होता, व त्यांची कोमल तनु कांपूं लागून त्या पुष्परूपी अश्रु ढाळीत होत्या. झाडांवर रहाणाऱ्या पक्ष्यांपैकीं कांहींजणांनांहि घडून येत असलेल्या गोष्टी कळत होत्या म्हणूनच कीं काय, ते घिरट्या घालीत ओरडत होते. घुबडाचा घूघूत्कार तर आज अधिकच उदास, भयानक व अशुभसूचक होता.

सृष्टीचें स्वरूप अशा प्रकारचें असतां त्या मानव राक्षसांनां अत्यंत आनंद होत होता. मनुष्यांचें मांस खावयाला सांपडेल, या आशेनें पुष्कळ मुलें व बायका त्या रात्रीं जागत होतीं. बायकांनां वांचविलें, तर त्यांपैकीं एकादी आपण वश करून घेऊं, या आशेनें तरुण पुरुषहि खुषींत आले होते. बायकांनां वांचवावें किंवा नाहीं, याबद्दल तरुण वीरांमध्यें भांडण होऊन अखेर त्यांची झुंझ होईल, व ती आपणांला पहावयाला सांपडेल, या आशेनें कांहीं म्हातारे लोक मनांत खूष झाले होते. यांच्या मानानें समंजस व दूरदर्शी असलेले दुसरे कांहीं म्हातारे शत्रु एकदांचे कटोहांत आतां मरणार, या विचारानें संतोष पावले होते. असो.

त्या मनुष्यभक्षक मानवराक्षसांत सांपडलेली आपली विजयगांवकर मंडळी ज्या संकटांत सांपडली होती, तें इतकें चमत्कारिक, भयंकर व अकल्पित होतें, कीं, हें संकट खरें आहे, कीं, आपण स्वप्नांत आहों, अशी एकाद्या वेळेला त्या मंडळीला शंका येई, व नानासाहेबांनीं तर ही गोष्ट बोलूनहि दाखविली. पण आमची विजयगांवकर पुरुष मंडळी त्या संकटाहूनहि चमत्कारिक! मृत्यु इतका 'आ' पसरून व लाल डोळे करून पहात असतां कधीं कोणीं विनोद केला आहे का? पण या मंडळीला या प्रसंगींहि विनोद सुचला! नानासाहेबांनीं

तें निर्वाणीचें उत्तर दिल्यावर कांहीं चमत्कारिक रीतीनें त्या सर्वांनां एक प्रकारचें दिव्य धारिष्ट आलें, आणि त्यांची वृत्ति शांत झाली-आनंदी झाली, असें ह्मणावयालाहि हरकत नाहीं. सर्व प्रसंगच चमत्कारिक व कल्पनातीत; तेव्हां या पुरुष मंडळीची वृत्तिहि तशीच झाली. याशिवाय त्या भयंकर प्रसंगींच्या त्या भलत्या वृत्तीचें दुसरें कारण कोण काय सांगणार ?

“ शास्त्रीबुवा, ” आनंदराव मदस्मित करून ह्मणाले “ ‘**सत्यमेव जयते,**’ हें खरें कीं नाहीं ? आणि जगांत सुखापेक्षां दुःख कमी आहे, हेंहि खरेंच आहे, होय ना शास्त्रीबुवा ? ”

“ अगदीं खरें ! तुह्माला जर खरोखर दुःख होत असतें, तर तुम्हीं हे प्रश्नच विचारले नसतेत ! ”

“ आम्ही आतां नंदनवनांत अथवा ब्रह्मानंदांतच आहों ह्मणायचे !”

“ अगदीं खरें आहे ! ब्रह्मानंदाला नंदनवन नको आहे; येथेंहि तो असूं शकेल. ”

· “ अगदीं खरें आहे तुमचें ह्मणणें ! ” भाऊसाहेब उपरोधिक स्वरानें ह्मणाले. “ ‘**आनंदं ब्रह्मणो विद्वान्न बिभेति कदाचन ।**’ ”

“ बरोबर बोललांत.” शास्त्रीबुवांनीं उत्तर दिलें. “हें वचन खरें नसतें, तर लोकांनां भयंकर वाटणाऱ्या या प्रसंगीं तुह्मीं असा विनोद केलाच नसतात !”

“ आह्मी ब्रह्मवेत्तेच आहोंत मुळीं ! ” आनंदराव ह्मणाले.

“ ब्रह्मज्ञानाचा तुमच्यांत अंश आहे, यांत शंकाच नाहीं ! ”

“ भलत्याच वेळीं कसला विनोद नि वादविवाद? ” आईसाहेब उदास क्रोधानें ह्मणाल्या. “मेला सुचतो तरी कसा कुणाला ठाऊक ! ”

“ वादविवाद ‘ मेला ’ नाहीं अजून कटोहांत-दहा मिनिटें तरी जीवंत आहेच आहे ! ” शास्त्रीबुवा आईसाहेबांच्या ‘ मेला ’ या शब्दावर काहीं तरी कोटि करून म्हणाले.

ही अर्थहीन कोटि ऐकून नानासाहेब हंसले, व बाकीच्यांनींहि मंदस्मित केलें.

परंतु त्या सर्वांची ही आनंदी वृत्ति फार वेळ टिकली नाहीं. त्या कठोर व भयानक प्रसंगाची आठवण फार वेळ विसरणें शक्य नव्हतें. आतां ते ओढून-ताणून चंद्रबळ आणून व धीराचा पोकळ आव आणून विनोद करण्याचा प्रयत्न करूं लागले; पण त्याच्यांत कांहीं अर्थ नव्हता, आणि ही कृत्रिम विनोदवृत्तिहि

लकरच लय पावली, व सर्व मंडळी अगदीं स्तब्ध बसली. क्षुद्र लोकांप्रमाणें त्या वेळीं ओक्साबोक्शीं कोणी रडलें मात्र नाहीं. उलट, बायकांनां आपल्या दुःखामुळें दुःख होऊं नये, ह्मणून आपण धीर सोडला नाहीं, असें दाखविण्याचा ते प्रयत्न करीत होते; पण ही वृत्ति तरी फार वेळ कसली टिकते?

चंद्रावर आलेल्या कृष्णमेघांप्रमाणें त्यांच्या चर्येवर औदासीन्याचें दाट कृष्णपटल चढलें, व कटोहाच्या किंचित् पांढऱ्या व किंचित् लाल उजेडांत त्यांचें तें आरक्तनयन शोकाकुल मुख फारच भयानक दिसूं लागलें. ते भूमीकडे शांतपणें व शून्यदृष्टीनें पहात बसले. त्यांच्या हृदयांत कसले विचार चालले होते, हें सांगण्याची आवश्यकता नाहीं. एक गोष्ट मात्र सांगितली पाहिजे, आणि ती ही, कीं, त्या स्थितींतहि त्यांनां एक प्रकारचा दिव्य आनंद वाटत होता. त्यांच्या त्या निरुत्साह, उदास–परंतु शांत समाधानवृत्तीला 'आनंद' हा शब्द लावणें चुकीचें असल्यास ते 'आनंदी' नव्हते, असें मी कबूल करतों; परंतु जंगली लोकांनां बायका दिल्यास नंदनवनाचीं सुखें उपभोगण्याला मिळतील, असें जरी प्रत्यक्ष ईश्वरानें त्यांनां आश्वासन दिलें असतें, तरी तीं नंदनवनांतील सुखें जीवितसंशयाच्या स्थितींतहि तुच्छ लेखण्याइतकी त्यांनां आपली स्वाभिमानाची समाधानवृत्ति–शांति–प्रिय होती, यांत शंका नाहीं. या शांतीला पाहिजे तर 'आनंद' ह्मणूं नका; किती केलें तरी ती उदासवृत्तिच होय, असा आग्रह असल्यास ही कर्तव्यनिष्ठ आत्मसंतुष्ट उदासवृत्ति दिव्यविलाससुखांपेक्षांहि त्यांनां प्रियतर होती, हें विसरूं नये ह्मणजे झालें.

या अवधींत त्या कारिसेनी राक्षसी दर्ग्यामध्यें वाद होऊन 'पुरुषांनां व बायकांनांसुद्धां कटोहांत टाकावें,' असें बहुतेक ठरल्यासारखें झालें. किनतोब्यानें व मयाणीनें बायकांनां जिवें मारूं नये, याविषयीं बरीच मतलबी लटपट केली; पण मयाणीचें वक्तृत्व व किनतोब्याचा धूर्तपणा यांचेंहि त्या क्षुब्ध झालेल्या लोकांपुढें कांहीं चाललें नाहीं. किनतोबा संतापला, व आंतल्या आंत जळफळूं लागला. महत्त्वाकांक्षेपेक्षां कामविकार प्रबळ होऊन तारुण्यांतील उत्साह, जोर, तडफड व मग्रुरी हीं त्याच्या हृदयांत उचल करूं लागलीं, आणि तो आपल्या मनांत 'काय होईल तें होवो; लोकांनां न जुमानतां आपणांला आवडत असलेली ही पोरगी आपण बाहुबलानें बायको ह्मणून घ्यावीच, व वेळ पडल्यास तिच्यासाठीं लढाईहि करावी,' असा विचार करूं लागला.

## ‘ रागिणीला कटोहांत—’

इकडे ‘ सररहा सर्वांची कत्तल करावी, ’ असें म्हणणाऱ्या पक्षाची त्या चलचित्त जनसमेमध्यें सरशी झाली, व लोक क्षुब्ध होऊन “बायकांनांच आधीं टाका, बायकांनांच आधीं टाका,” असें ओरडूं लागले, व त्याप्रमाणें दोघां धटिं-गणांनीं रागिणीला उचललें, व ते तिला कटोहाकडे घेऊन जाऊं लागलेहि !

“ आई, आई ! ” म्हणून रागिणीनें हंबरडा फोडला. भाऊसाहेबांच्या मुखांतून एकदम केविलवाणी किंकाळी निघाली, व ते धाडकन् खालीं बेशुद्ध पडले, आणि त्यांच्या या घोर पापाबद्दल पाठीमागून काळयाकुट्ट पहारेकऱ्यानें त्यांनां जोरानें एक लाथ मारली !

इकडे रागिणीला उचलून ते नरपशु चारपांच पावलें चालले असतील नसतील, इतक्यांत मीरबल उठला, व त्यांनां दरडावून म्हणाला “ हिला एकदम खालीं ठेवा; नाहीं तर या फरसानें तुमचीं मी डोकींच उडवीन ! ही पोर आतां-पासून माझी बायको झाली आहे. हिला हात लावण्याची कोणाची छाती अस-ल्यास त्यानें माझ्याशीं लढायला यावें !”

इतक्यांत मेघांचा मोठा कडकडाट झाला, व वीज चमकली. ते मित्रे धटिंगण थांबले, व मीरबलाच्या भीतीनें त्यांनीं रागिणीला खालीं ठेवलें. मीरबल पुढें सरसावला, व पवित्रा ठोकून त्यांच्याजवळ उभा राहिला, आणि फरस वाटोळा फिरवूं लागला. त्या तीक्ष्ण फरसाची धार कटोहाच्या उजेडांत विजे-सारखी चमकूं लागली, व मीरबल घनध्वनीसारख्या प्रचंड स्वरानें पुनः म्हणाला “ तुम्ही लोक मला कांहींहि म्हणा व कांहींहि करा ! ही गुलाबाची कळी आजपासून माझी बायको झाली. हिला कटोहांत टाकण्याची ज्याची छाती असेल, त्यानें—”

परंतु वाक्य पुरें होण्यापूर्वींच आपला प्रतिस्पर्धी मयाणी आपला फरस सांवरून पुढें सरसावत आहे, असें मीरबलानें पाहिलें, व वाक्य पुरें न करतां तो मयाणीशीं झुंज करावयाला सावधगिरीनें उभा राहिला. अचानक जाऊन मीरबलाला मारण्याची आपली युक्ति फसली, असें पाहून मयाणी जरासा ओशाळला. पण त्याच्या अंगांतहि पाणी खेळत होतें, व मीरबलाशीं दोन हात करण्याचें त्याच्याहि मनांतून पुष्कळ दिवस होतें. झालें, दोघांची लढाई जुंपली !

“ भांडूं नका, भांडूं नका,” असें किनतोबा बाह्यात्कारीं बोलूं लागला; पण या प्रबल वीरांनीं एकमेकांनां मारून टाकलें तर बरें होईल, असें तो मनांत म्हणत होता ! असो.

झुंज लागलेली पाहून पुष्कळ तरुणींचे डोळे तिकडे लागले. मीरबलाची बायको त्याला उत्तेजन देऊं लागली. इतक्यांत मयाणीचा एक वार मीरबलाच्या खांद्याला चाटून गेला, व तेथून घळघळ रक्त गळूं लागलें. परंतु लढाईच्या त्या जोरांत मीरबलाचें तिकडे लक्ष्यहि गेलें नसेल. त्यानें पायावर घाव मारण्याची बतावणी करून मयाणीच्या डोक्यावर आपल्या तीक्ष्ण फरसाचा असा सफाईनें वार केला, कीं, तत्क्षणीं त्याच्या मस्तकाचा एक खपल कटोऱ्हांत जाऊन पडला, आणि अर्धे मस्तक गेलेला मुडदा जवळच असलेल्या रागिणीच्या अंगावर धाडकन् आपटला, आणि तिचें लुगडें रक्ताच्या धारांनीं भरून गेलें !

## प्रकरण एकोणिसावें.

## दुसरा एक बळि !

याच सुमाराला एक वृद्ध मनुष्य–किंनरीचा बाप–कांहीं मिनिटांपूर्वी आपल्या मुलीला सोडविण्याकरितां लपतछपत कैद्यांजवळ गेला. हलकेच तो किंनरीजवळ सरकला, आणि आपल्या हातांतील सुऱ्यानें तिच्या पायांनां बांधलेले वेल तोडूं लागला. परंतु किंनरीनें आपल्या पतीचे–टिल्लूचे–हातपाय आधीं सोडावे, असें बापाला सांगितलें.

" त्याचे हातपाय मागून सोडीन." तिचा बाप म्हणाला.

"नाहीं, नाहीं, त्यांचे आधीं सोडा. " किंनरी निश्चयपूर्वक ह्मणाली.

" अग, हळू बोल. आपलें बोलणें यांनीं ऐकलें, तर मला नि तुला ते एकदम कटोहांत टाकतील, ठाऊक नाहीं का तुला ?"

" हळू बोलतें मी." किंनरी ह्मणाली. "पण त्यांचे पाय आधीं सोडा. तें काम करूं लागा, ह्मणजे मी मुळीं बोलतच नाहीं. "

किंनरी ही अज्ञानी रानटी बायको होती; पण तिचें हें भाषण रानटीपणाचें होतें काय ? रानटीपणा रंगावर, पोषाखावर, भाषेवर किंवा चालीरीतींवर अवलंबून असेल. तर ती रानटी होती. पण ज्या पतिव्रतेचा आत्मा प्रसंगीं इतका आत्मनिरपेक्ष होऊं शकतो, तिच्यांत कांहीं तरी दिव्य अंश आहे, असें मला वाटतें. असो.

इकडे, मयाणीला मारलेलें पाहून किनतोब्याला आपला एक प्रबल प्रतिस्पर्धी गेला, असें वाटलें, व त्याला मनांतून फार आनंद झाला. पण लगेच त्या दूरदर्शी, धूर्त व धोरणी नायकाच्या ध्यानांत आलें, कीं, या युद्धांत मीरबल विजयी झाल्यामुळें त्याचें वजन अधिक वाढेल, आणि यापुढें तोहि अधिक मग्रूर व महत्त्वाकांक्षी होईल ! ही गोष्ट त्या वृद्ध किनतोब्याला अर्थात्च विशेष प्रिय होण्यासारखी नव्हती. मीरबलाचा नक्षा कसा उतरावा, याचा तो आपल्या मनाशीं क्षणार्ध विचार करीत आहे, तोंच तेथील एका कोंपऱ्यांत कांहीं गडबड व मारामारी होत आहे, असें त्यानें पाहिलें.

ही मारामारी व बोलाचाली किंनरीचा बाप व एक पहारेकरी यांच्यामध्यें चालली होती. कोणाचे हातपाय आधीं सोडावयाचे, याविषयीं त्या प्रेमळ-बापलेकींमध्यें बराच वेळ चाललेली कुजबूज अखेर एका पहारेकऱ्याच्या

कानांवर गेली, व तो त्यांच्याकडे बारकाईनें पाहूं लागला. अर्थात् पहारेकऱ्याला लवकरच किंनरीच्या बापाच्या हातांतील सुरा दिसला, व त्याचा हेतु त्याच्या एकदम ध्यानांत आला. किंनरीच्या बापाला त्यानें ताबडतोब पकडलें, व त्या दोघांमध्यें मारामारीला सुरुवात झाली.

'काय आहे?' ह्मणून किनतोब्यानें विचारल्यावर पहारेकरी धापा टाकीत ह्मणाला "किंनरीचा हा ह्मातारडा बाप आपल्या पोरीला सोडविण्याकरितां चोरून येथें आला होता. याला एकदम कटोहांतच टाकलें पाहिजे!"

किनतोब्यानें किंनरीच्या बापाला आपल्यासमोर आणावयाला सांगितलें. ह्माताऱ्यानें आपला सर्व गुन्हा कबूल केला, व "मला पाहिजे तर मारा; परंतु माझ्या मुलीला जाळूं नका," असें तो किनतोब्याला विनवूं लागला.

"असल्या अपराध्याला चांगलीच शिक्षा केली पाहिजे," असें किनतोबा ह्मणाला, व सर्व दर्गाहि "जाळा–मारा–कटोहांत फेंका," अशा अर्थाचे शब्द उच्चारूं लागला.

लगेच दोन पहारेकऱ्यांनीं ह्माताऱ्याला उचललें, व कटोहाकडे त्याला ते घेऊन चालले. परंतु वाटेंत मीरबलानें त्यांनां पुनः अडविलें. मयाणीचा खून त्याच्या अंगावर चढला होता ह्मणा, किंवा रागिणीला आपलें शौर्य दाखविण्याला तो उत्सुक झाला होता ह्मणून ह्मणा, किंवा त्या जंगली वीराच्या हृदयांत उदारबुद्धि वसत होती असें पाहिजे तर म्हणा, त्यानें पहारेकऱ्यांनां अडविलें, व दर्ग्याला उद्देशून आवेशानें तो ह्मणाला "या गरीब बिचाऱ्या म्हाताऱ्याला कां ह्मणून जाळतां? यानें तुमचा काय एवढा मोठा गुन्हा केला आहे? आपल्या मुलीच्या प्रेमानें त्यानें ही गोष्ट केली आहे; त्याला एवढी जबर शिक्षा कशाला? तुमच्यापैकीं कोणाची मुलगी अशी सांपडली असती, तर तुह्मीं काय केलें असतें?"

मीरबलाचा आवेश पाहून व मयाणीला नुकतेंच त्यानें कसें मारलें होतें याची आठवण होऊन, ते पहारेकरी तर जेथल्या तेथें थबकले! पण मीरबलाचा आंतून द्वेष करणारे शत्रु जोरांत पुढें आले, व त्याच्याशीं भांडूं लागले.

"मयाणीला मारलेंस म्हणून तुझ्या गमजा आमच्याजवळ चालायच्या नाहींत!" त्यांपैकीं एकजण म्हणाला "किनतोब्यानें चढविलें, ह्मणून जेव्हांतेव्हां तूं सर्व दर्ग्याच्या विरुद्ध जातोस, हें आह्मांला ठाऊक आहे; पण आतां तुझे

दिवस भरले, असें समज ! या थेरड्याला आह्मी तुझ्यादेखत–तुझ्या नाकावर पाय देऊन—कटोहांत जाळणार !"

हें वीरश्रीचें भाषण ऐकून सर्व दर्‍योनें जयजयकार केला. मीरबल सर्वांचा आवडता होता; पण त्याची मग्रुरी लोकांनां कशी पसंत पडेल ?

लोकांचें आपणांला पाठबळ आहे,असें पाहून मीरबलाच्या शत्रूंनीं किंनरीच्या बापाला उचललें. मीरबल अर्थात् त्यांच्याशीं लढूं लागला. त्यानें पुनः एकाचें मुंडकें उडवलें, व दुसर्‍याची तंगडी तोडली. तिसर्‍यालाहि त्यानें लवकरच लोळवलें. परंतु कोणीं एकानें पाठीमागून येऊन त्याच्या डोक्यावर सोंटा लगावल्यामुळें तो एकदम खालीं पडला. लगेच दोघांतिघांनीं किंनरीच्या बापाला उचलून कटोहांत टाकलें. मीरबल खालीं पडलेला पाहून किनतोब्याला फार आनंद झाला, व त्याच्या डोक्यावर कोणी फरस मारतो कीं काय, याची तो उत्कंठेनें प्रतीक्षा करीत राहिला.

इतक्यांत मीरबलहि सावध होऊन उठलाच; परंतु त्याला त्याच्या पक्षाच्याच लोकांनीं आवरून धरलें, व शांत व्हावयाला सांगितलें. परंतु मीरबलाच्या अंगावर या वेळीं खून चढला होता. त्यानें चलाखी करून आपल्या दोस्तांच्या हातून आपली सुटका करून घेतली, व पुनः फरस घेऊन "म्हातार्‍याला कोण हात लावतो आहे, तें पाहूं द्या मला !" असें तो आवेशानें ओरडला.

पण लगेच त्याला कटोहांत जळणारें ह्मातार्‍याचें प्रेत दिसलें, व तो ओशाळला. त्याला ओशाळलेला पाहून त्याचे शत्रु फिदीफिदी हंसले. त्यांच्याकडे पाहून मीरबल ह्मणाला " ह्मातार्‍याला तर तुह्मीं मी सावध नसतांना मारलेंत! पण या पोरीला–या माझ्या बायकोला–हात लावण्याची कोणाची छाती आहे, तें पाहूं द्या मला ! "

यावर उत्तरादाखल कोणी कांहीं बोललें नाहीं, व मारामारी करावयालाहि कोणी धजलें नाहीं. हें पाहून मीरबल जरा शांत झाला, व पुनः ह्मणाला "वीर हो ! तुह्मी या सुंदर बायकांनां वेड्यासारखें कां जाळतां ? या बायका जाळण्याकरितां का ईश्वरानें केलेल्या असतील? फुलें जाळण्याकरितां का निर्माण झालेलीं असतात ? सुंदर द्राक्षांच्या रसाचा स्वाद घ्यावयाचा, कीं, तीं जाळून टाकावयाचीं ? तुम्ही वीर असून या स्त्रियांनां जाळून टाकण्याचें मनांत आणतां, तेव्हां तुमची धन्य आहे ! या स्त्रिया किती सुंदर आहेत, हें नीट पहा !

सर्वांत लहान असलेली ही गुलाबासारखी पोरगी–ही माझी नवीन बायको–जशी सुंदर आहे, तशी साऱ्या जगांत दुसरी कोणी सांपडेल का? ती दुःखी–कष्टी आहे; पण तिच्या तोंडावर जें तेज आहे, तें तेज आपल्या जातींतल्या कोणत्या तरी स्त्रीच्या तोंडावर आहे का? वीर हो! तुम्ही मला कांहींहि ह्मणा; मी तुह्मांला या माझ्या नवीन बायकोला हात लावूं देणार नाहीं!" असें ह्मणून तो दर्ग्याकडे बेमुर्वतपणें पहात ऐटींत उभा राहिला.

यावर कोणी कांहीं बोलेल, व मारामारी होऊन मीरबल ठार मारला जाईल, या आशेनें किनतोबा कांहीं वेळ स्वस्थ राहिला; परंतु कोणी कांहींच बोललें नाहीं; तेव्हां तो लुच्चा कृतकस्मित करून मीरबलाला ह्मणाला "मीरबल, तूं आज आपल्या जातींतील सर्व स्त्रियांची नालस्ती केली आहेस, म्हणून मला तुझा जरासा राग आला आहे. परंतु तुझ्या गुणांकडे व शौर्याकडे पाहून मी तुला क्षमा करतों. या तरुण मुलींविषयीं तूं जें ह्मणत आहेस, त्याचा आपण उद्यां विचार करूं. सुंदर फुलें कटोहांत जाळणें जसें वाईट, तसेंच या सुकुमार स्त्रियांनां जाळणें वाईट, हें तुझें ह्मणणें थोडेंसें खरें आहे. परंतु या गोष्टीचा सांगोपांग विचार झाला पाहिजे. उद्यां पुनः दर्गा भरेल, व त्या वेळीं जें ठरेल, तसें आपण करूं. आज पुरुषांनांच तेवढें मारूं या."

इतक्यांत किनतोब्याची बहीण म्हणाली "बायकांनां जर वांचवितां, तर मग पुरुषांनींच काय पाप केलं आहे? या वीरांनां जर तुम्हीं जीवदान दिलंत, तर यांपैकीं एकाशीं–त्या तरुणाशीं–मी लग्न लावायला तयार आहें!"

यावर दुसऱ्या एकदोन बायाहि असेंच ह्मणाल्या.

"पुरुषांनां जशा सुंदर बायका आवडतात, तसे बायकांनां तरुण पुरुष आवडतात." असें यावर एक ह्मातारी ह्मणाली, व तिचें हें मोठें तात्त्विक विधान ऐकून सर्व पुरुष मंडळी हंसली.

यावर बराच वादविवाद झाला. अखेर पुरुषांनांहि आज जाळून न टाकतां उद्यां जो निकाल ठरेल त्याप्रमाणें करावें, व तोंपर्यंत या सर्वांनां मीरबलानें पहाऱ्याखालीं ठेवावें, असें सर्व दर्ग्यांत ठरलें, आणि दर्गा बरखास्त झाला.

आपल्या झोंपडींत जाण्यापूर्वीं किनतोब्यानें मीरबलाला एकीकडे नेलें, व मयाणीला सफाईनें मारल्याबद्दल त्यानें त्याची मोठी वाहवा केली. नंतर हलकेच तो म्हणाला "तूं त्या वाटोळ्या तोंडाच्या लहान पोरीला 'बायको' ह्मणत आहेस, पण ती कबूल आहे का?"

# दुसरा एक बळि !

" कबूल नसली ह्मणून मी तिला सोडणार आहें का ?" मीरबलानें उत्तर दिलें.

" हें तर खरेंच;" किनतोबा ह्मणाला. "पण ह्मटलें, तूं आधीं विचारून पाहिलें आहेस का काय ?"

"विचारून पाहिलें नाहीं." मीरबल सरळ भावानें व मोकळ्या मनानें ह्मणाला "पण ती कबूल होईल, असें मला वाटतें. तिनें कां कबूल होऊं नये, हेंच मला समजत नाहीं. मी उच्च कुलांतला आहें, तरुण आहें, माझें शौर्य तिला ठाऊक झालेंच आहे, व मीं तिचे प्राण वांचविले आहेत; मग ती माझ्याशीं लग्न करायला कां कबूल होणार नाहीं ? "

मीरबलाची ही कल्पना चुकीची असेल; पण त्याचा अभिमान स्वाभाविक होता, हें कबूल केलें पाहिजे. 'मला वरणार नाहीं अशी या जगांत स्त्रीच नाहीं !' असें त्याला जें वाटत होतें, तें क्षम्य होतें; कारण, त्या रानटी स्त्रियांच्या जगांत त्याचा अभिमान खराच होता. त्याच्यासारख्या शूर व तरुण वीराला नाकारणारी त्या स्त्रियांमध्यें एकहि स्त्री नव्हती. कित्येक बायका खरोखरच मीरबलाच्या गळीं पडत असत, व त्याला त्यांना झिटकारून टाकावें लागत असे. मीरबलानें या गळीं पडणाऱ्या बायकांपैकीं तीनच काय त्या बायका ह्मणून पत्करल्या होत्या. बाकीच्या त्याच्या बायका त्यानें त्यांचे नवरे मारून मिळविलेल्या होत्या. ज्यानें नवरा मारला, त्याबरोबर लग्न करणें त्या जातीच्या बायकांमध्यें वाईट समजलें जात नव्हतें, व लढाई करून आपणाला आवडेल ती स्त्री मिळविणें, हें त्या जातींतील तरुण पुरुषांचें एक कर्तव्यकर्मच होतें; हा त्या वीरांचा धर्मच होता. आपल्या जातींतील स्त्रियांच्या अनुभवावरून शत्रूची गुलाबासारखी मुलगीहि आपणाला एकदम वश होईल, असा अभिमान मीरबलाला वाटणें साहजिक होतें.

किनतोब्याशीं आपले विचार मन मोकळें करून त्यानें सांगितले, व " ती ' लांबट तोंडाची सुंदरी' तुम्हाला पाहिजे ना?" असा त्यानें त्याला सरळ प्रश्न केला.

धोरणी किनतोब्यानें त्याच्या या प्रश्नाला सरळ उत्तर दिलें नाहीं; पण संभाषण संपण्यापूर्वीं त्यानें मीरबलाकडून " मी दर्यांत ती आवडती सुंदरी तुम्हाला अर्पण करीन," असें वचन मोठ्या खुबीनें मिळविलें, हें सांगितलें ह्मणजे त्याच्या मनांत काय होतें, हें स्पष्ट सांगण्याची जरूर नाहीं.

# प्रकरण विसावें.

## देवाचा धांवा.

दर्गा बरखास्त होऊन दोनतीन घटका झाल्या. विजयगांवकर कैदीमंडळी चार फरसवाल्यांच्या पहाऱ्याखालीं उदास व दीन होऊन स्वस्थ बसली होती. कोणाला कांहीं एक बोलावेंसें वाटत नव्हतें. पहारेकरी मात्र एकमेकांत ग्राम्य चेष्टा करून हंसत होते. चंद्र आतां चांगला डोकीवर आला होता, व मेघमालेंतूनहि मुक्त झाला होता. वायु अति शीतल होऊन जोरानें वाहूं लागला होता, व जवळच कटोह नसता, तर त्या मंडळींनां चांगली थंडी वाजली असती. किंनरीच्या बापाचा बळि मिळाला म्हणूनच कीं काय, त्या सर्वभक्षक कटोहाच्या ज्वाला शांत व कमी भीषण झाल्या होत्या. त्याचा प्रकाश आतां मंद झाला होता; पण चंद्रप्रकाश अधिकअधिक स्पष्ट झाल्यामुळें प्रकाशांत कांहीं फरक झाला आहे, असें कोणाला वाटलें नाहीं. त्या प्रशांत चंद्रिकेंत गप्पागोष्टी सांगणें किंवा प्रेमाचा वादविवाद करीत बसणें फार आल्हाददायक झालें असतें; परंतु त्या भयंकर प्रसंगीं गप्पागोष्टी किंवा वादविवाद कोणाला सुचणार ? टिल्लू व किंनरीशिवाय सर्वजणें माना खालीं घालून दीनवाणीं होऊन मलूल बसलीं होतीं. टिल्लू मात्र तेथेंच अर्धवट भ्रमिष्टच होऊन आडवा झाला होता, व मान हातांत घालून पडला होता, आणि किंनरी हुंदके देऊन शोक करीत होती.

मंडळी अशा चिंतातुर दीन स्थितींत असतां मीरबल हातांत एक सोंट्या घेऊन पहारेकऱ्यांवर देखरेख करण्याकरितां आला. पहारेकऱ्यांपैकीं एकजण लवंडून गप्पा मारीत होता, व बाकीचे तिघे उभे राहून हंसतखेळत पहारा करीत होते. मीरबल अचानक आल्यामुळें जमिनीवर लोळणारा चुकार पहारेकरी ओशाळला, आणि मीरबलाच्या शिव्या व कदाचित् त्याच्या सोंट्याचे तडाखेहि खावे लागणार, अशी त्याच्या मनांत भीति पडली. परंतु सुदैवानें तसें कांहीं झालें नाहीं. मीरबलानें त्याच्याकडे फक्त क्रोधदृष्टीनें व तिरस्कारानें पाहिलें, आणि नंतर " कांहीं कैद्यांनां त्या पलीकडील झाडाखालीं घेऊन जा, व कांहींनां या पाठीमागच्या अंबराईत घेऊन जा," असा त्यानें हुकूम दिला.

"तिकडे त्यांनां थंडी वाजेल," पुढेंपुढें करणारा एक फाजील फरसवाला म्हणाला " आणि तिकडे जरासा काळोखहि आहे."

## देवाचा धांवा.

"तुला जास्त बोलण्याची जरूर नाहीं!" मीरबल जोरानें व रागानें ह्मणाला. "त्यांनां घोंगड्या आणून द्या, व त्यांनां एका बाजूला कोंपऱ्यांत स्वस्थ निजूं द्या. पहारा करण्यापुरता झाडींत उजेड नाहीं, असें नाहीं."

मीरबलानें अशा रीतीनें त्या पहारेकऱ्याला दाबल्यावर तो ओशाळून स्वस्थ बसला. दुसरा पहारेकरी नंतर ह्मणाला "कोणाला आंबराईत न्यावयाचें, व कोणाला त्या समोरच्या झाडींत?"

"सगळ्या बायकांनां आंबराईत न्या." मीरबलानें हुकूम सोडला. पण नंतर त्याला काहीं विचार सुचला, व तो म्हणाला "या लहान मुलीलाच (रागिणीलाच) आंबराईत एकजण घेऊन जा, व बाकीच्यांनां समोरच्या झाडींत घेऊन चला."

मीरबलाच्या पुढें कमीजास्ती बोलण्याची कोणाची छाती नव्हती. पहारेकऱ्यांनां मीरबलाचा हेतु समजला असेल, परंतु त्याविषयीं ते तेथें कांहींएक बोलले नाहींत. एक पहारेकरी घोंगड्या आणण्याकरितां गेला, दुसरा रागिणीला घेऊन आंबराईत गेला, व बाकीचे दोघे इतरांनां घेऊन गेले.

मीरबल कांहीं वेळ तेथेंच आकाशांतील ताऱ्यांकडे पहात उभा राहिला. कांहीं वेळानें नानासाहेबांनां वगैरे घोंगड्या मिळाल्या किंवा नाहीं, हें तो पाहून आला, व नंतर तो आंबराईत शिरला.

रागिणी घोंगडी पांघरून जमिनीवरच निजली होती. तिला झोंप अर्थात्च लागलेली नव्हती. मीरबलाची चाहूल तिनें स्पष्ट ऐकली, व तो पहारेकऱ्याला "तूं येथून जा; मी स्वतःच येथें पहारा करतों," अशा अर्थाचें जें वाक्य आपल्या भाषेंत ह्मणाला, तेंहि तिनें ऐकलें; पण त्या वाक्याचा तिला अर्थ कळला नाहीं.

पहारेकरी लांब गेल्यावर मीरबल रागिणीजवळ गेला, व तिचा त्यानें हळूच हात धरला; त्याबरोबर रागिणी विजेसारखी झटकन् उठून बसली, व घाबरून जाऊन बावरल्यासारखी इकडेतिकडे पाहूं लागली.

मीरबल तिला आपल्या भाषेंत ह्मणाला "तरुणि, तुझें हें गुलाबासारखें तोंड पाहून मी तुझ्यावर खूष झालों आहें. माझी तूं बायको हो. मीं तुला त्या भयंकर कटोहांतून वांचविलें आहे, हें तुझ्या ध्यानांत आहे ना?"

रागिणीला त्याची भाषा जरी कळत नव्हती, तरी त्याच्या मुद्रेवरून वगैरे त्याच्या भाषणाचा तिला अर्थ चांगला कळला. येथून कसेंतरी पळून जावें, नाहीं

तर कटोहांत उडी टाकून जीव द्यावा, अशी तिला इच्छा झाली; परंतु इच्छा होऊन उपयोग काय? हातपाय बांधलेले!

मीरबल तिची पुनः मनधरणी करूं लागला, त्याचे शब्द तरी ऐकूं नयेत, म्हणून तिनें कानांत बोटें घातलीं, व त्याचें मुखावलोकनहि नको, ह्मणून तिनें डोळे मिटले. पण मीरबल आतां तिच्याजवळ गेला, व तिच्या खांद्यावर हात ठेवून आपल्या भाषेत आपलें हृद्गत तिच्यापाशीं व्यक्त करूं लागला.

मीरबलानें खांद्यावर हात ठेवल्याबरोबर रागिणी दचकून तेथून सरकली, व डोळे उघडून त्या जंगली वीराकडे तिनें दीन दृष्टीनें पाहिलें, आणि ह्मटलें "आपण शूर आहांत. गरीब अबलेपुढें आपलें शौर्य कां गाजवितां? आपण मला जीवदान दिलंत-पुनर्जन्म दिलात-तेव्हां आपण मला माझ्या वडिलांसारखे आहांत. आपण पापविचार मनांत आणूं नये!"

मीरबलाला तिच्या बोलण्याचा भावार्थ नकारार्थी आहे, एवढें कळलें. तो निराश न होतां मंद स्मित करून स्वभाषेत पुनः ह्मणाला "कोमल फुला, मी जर नसतों, तर तुला त्या लोकांनीं कटोहांत जाळलें असतें, व मीं जर तुझें यापुढें रक्षण केलें नाहीं, तर तुला अजूनहि कदाचित् हे लोक जाळतील, हें ध्यानांत ठेव. ईश्वरानें तुझ्यासारख्या कोमल फुलाला जाळून खाक होण्याकरितां केलेलें नाहीं. हे तरुण मुली, मी कोण आहें, हें तूं पूर्णपणें ओळखलें नाहींस. आमच्या या जातींत किनतोव्याच्या बरोबरीची माझी योग्यता आहे. आमच्या या टापूंतील कोणत्याहि स्त्रीची मीं मागणी केली, तर ती एकदम कबूल होईल, आणि ती जरी कबूल नाहीं झाली, तरी मी आपल्या बाहुबलानें तिला आपली बायको करून घेईन. दुसऱ्याच्या बायकोवर माझें मन गेलें, तर मी तिच्या नवऱ्याला मारून आपलीशी करून घेतों. माझी नवी बायको अशाच रीतीनें मीं मिळविलेली आहे. तिच्या नवऱ्याशीं व भावांशीं वगैरे मला याकरितां युद्ध करावें लागलें; पण त्या सर्वांनांहि मी भारी होतों. दोन बैलांची जशी टक्कर होते, तशी तिच्या नवऱ्याची व माझी टक्कर झाली, व तींत मीं तिच्या नवऱ्याला चित केलें. तिच्या प्रत्येक भावाशींहि मी लढलों, व त्यांचे फरसानें तुकडेतुकडे करून टाकले. ते कांहीं कमी योद्धे नव्हते; त्यांनीं केलेल्या या जखमा पहा!"

असें ह्मणून मीरबलानें आपल्या अंगावरील जखमा रागिणीला मोठ्या अभिमानानें दाखविल्या, व क्षण भरानें तो पुढें ह्मणाला "तेव्हां, हे सुकुमार

मुली, तूं मला बऱ्या बोलानें वश हो. तुला पाहिल्यापासून माझी ही नवीन बायकोसुद्धां मला आवडेनाशी झाली आहे. गुलाबाचें फूल पाहिल्यावर भेंडीचीं किंवा करवंदीचीं फुलें कशीं बरें कोणाला आवडतील ? ”

मीरबलाची अशा प्रकारची दुष्ट वल्गना चालली असतां रागिणी बिचारी दोनचार निराशेचे उद्गार काढून स्वस्थ बसली होती. या नीचाच्या हातून आपले प्राण वांचले गेले नसते, व रात्रींच मरण आलें असतें, तर फार बरें झालें असतें, असें तिला वाटलें.

रागिणी कांहींच उत्तर देत नाहीं, असें पाहून तो दुष्ट तरुण पुनः थोडेंसें गोडीगुलाबीचें व थोडेंसें धमकीचें भाषण करूं लागला "हे कोंवळ्या व पिंवळ्या वेली, तूं इतकी सुंदर कां झालीस ? तुझें तोंड फुलासारखें कां खुलून दिसत आहे ? या फुलाचा वास मला या आंब्यांच्या मोहरापेक्षांहि मधुर वाटत आहे. हे हट्टी पोरी, तुझा हट्ट इतका वेळ चांगला होता. पण फार वेळ हट्ट करूं नये. माझ्यासारख्या वीराजवळ तर कोणींहि हट्ट करूं नये. मी प्रसंगीं किनतोब्यालाहि विचारीत नाहीं, तर तुझ्यासारख्या बायकांनां मी दाद देईन, असें का तुला वाटतें ? माझ्या आड येणारा असा या जगतांत कोणीच नाहीं ! आजच रात्रीं दोघांतिघांनां मीं कसें लोळवलें, हें तूं पाहिलेंस ना ? तुझा नवरा-भाऊ-बाप-कोणी असतील, ते सगळे अडकलेले आहेत. तूं माझ्या मनाप्रमाणें वागण्यास कबूल हो, ह्मणजे मी त्यांनां सोडवतों. तूं आपल्या नवऱ्याला भीत असलीस, तर तो मला दाखीव, ह्मणजे मी त्याचें मस्तक माझ्या फरसानें एकदम उडवून टाकतों. सुंदरि, माझें ह्मणणें तुला अखेर कबूल करावें लागणारच; मग उगाच कां स्वतःला दुःखीकष्टी करून घेतेस ? हे तरुणि, तूं शत्रूकडील आहेस; पण मला अत्यंत प्रिय आहेस. माझ्या हाताखालीं कितीतरी लोक आहेत; मी सर्वांचा नायक आहें. पण मीहि तुझा दास व्हायला तयार आहें. तूं आपलें तोंड असें कां करते आहेस ? मी तुला आवडत नाहीं का ? मी काय ह्मातारा आहें-का खुळा आहें, का बावळा आहें-का हीन जातीचा आहें ? मी काळा आहें, ह्मणून तर तुला संकोच वाटत नाहीं ना ? पण लहान पोरी, माझ्या जातींतील पुष्कळ स्त्रिया याच माझ्या सतेज काळ्या रंगावर लुब्ध आहेत, हें ध्यानांत ठेव. काळें वांगें पांढऱ्या वांग्यापेक्षां गोडींत कमी का असतें ? मग माझ्या काळ्या रंगाचा तुला कां तिटकारा येतो ? तरुण पोरी, तूं कांहींच बोलत नाहींस, हें काय ? तुला

तुझ्या पहिल्या नवऱ्याची भीति का वाटत आहे? ही तुझी भीति निरर्थक आहे. मीं आजपर्यंत कमींतकमी पन्नाससाठ तरी मुंडकीं आपल्या फरसानें उडविलीं आहेत, हें तुला ठाऊक नसेल. सुंदरि, मी असा वीर असतां तूं माझ्याशीं रहायला कां कबूल होत नाहींस? तुला मी माझ्या सर्व बायकांवर पट्टराणी करीन. मी तुला रोज गाईचें व हरिणांचें मांस खायला देईन. सुंदरि, लवकर बोल. तुझा हट्ट माझ्याशीं चालायचा नाहीं, हें ध्यानांत धर."

बिचारी रागिणी त्या कामांध नरपशूला काय उत्तर देणार? तिला आईची आठवण झाली, व ती मुक्तकंठ रडूं लागली, आणि रडतांरडतां मनांत देवाचा धांवा करूं लागली "ईश्वरा, आज काय हा माझ्यावर प्रसंग आणलास? बाल-वैधव्याचं दुःख पुरं नाहीं का झालं? भक्तवत्सला कृष्णा! द्रौपदीची विटंबना होऊं लागली असतां तूं तिला साहाय्य केलंस. आतां माझ्यावर तसलाच प्रसंग आला आहे. कृष्णा, धांव, धांव! दयाघना, तुला या दीनेची दया कशी येत नाहीं? का तूं निजला आहेस? रामा, कृष्णा, कोणी तरी धांवा!"

पण रागिणीचा हा धांवा ऐकून कृष्ण किंवा राम कोणीहि धांवून आला नाहीं! "कसला कृष्ण नि कसला राम!" तिला वाटूं लागलें "कृष्णाच्या नि रामाच्या देवळांत कथाच ऐकाव्यात झालं!" उसासा टाकून ती अर्धवट मोठ्यानें—पण मनाशींच म्हणाली.

इतक्यांत तिला एक विचार सुचला, व तिच्या चर्येवर आनंदाची छटा दिसूं लागली. ती मनांत म्हणाली "आहे, कृष्ण आहे, यांत शंकाच नाहीं. तो प्रत्यक्ष आला नाहीं, पण त्यानेंच मला ही युक्ति सुचविली आहे."

मनांत आलेल्या या विचारामुळें रागिणीला विलक्षण धैर्य आलें. तिनें मीर-बलाकडे आतां मधुरस्मितयुक्त मुद्रेनें पाहिलें, व जरासें लाजून त्याला म्हटलें "माझ्यावर जर प्रेम आहे, तर मग माझे हे हातपाय कशाला बांधले आहेत?"

असें बोलून रागिणीनें आपल्या डोळ्यांनीं व मुद्रेनें हातपाय सोडण्याविषयीं मीरबलाला सुचविलें. तो अगदीं कामान्ध झाला असल्यामुळें तिच्या मधुर-स्मिताला तो क्षणार्धात भुलला, आणि त्यानें आनंदानें तिच्या पाठीवर एक हलकी थापट मारली, व "हें आधींच कां सांगितलें नाहींस?" अशा अर्थाचे लाडिक शब्द उच्चारीत तो तिचे पाय बंधमुक्त करूं लागला.

# देवाचा धांवा.

पाय मोकळे झाल्याबरोबर हात मोकळे होण्याची वाटहि न पहातां रागिणीनें एकदम हरिणीप्रमाणें टणकन् उडी मारली, व ती कटोहांत जीव देण्याच्या इराद्यानें तिकडे धूम धांवत सुटली!

'ही पोर आता कबूल काय झाली, व आतां भरधांव पळत काय सुटली आहे?' हें कोडें मीरबलाला क्षणभर सुटलें नाहीं, व तो खांबासारखा तिच्याकडे पहात तटस्थ उभा राहिला! पण लगेच सावध होऊन तो तिच्या पाठीमागे लांबलांब उड्या टाकीत धांवूं लागला. रागिणी कटोहाजवळ जाते न जाते, तोंच तिचे केंस त्यानें चटकन् पकडले! तिला त्यानें तेथें खालीं पाडलें, व पांचसात लाथा दिल्या, आणि नंतर बेहोष होऊन तो तिला उचलून घेऊन पुनः अंबराईत गेला.

मीरबलानें तेथें रागिणीला खालीं ठेवलें—अथवा टाकलें म्हटलें तरी चालेल, व तिला त्यानें पुनः पांचसात लाथा दिल्या. नंतर तिच्या छातीवर पाय देऊन तो तिरस्कारबुद्धीनें तिच्याकडे पहात विसावा घेऊं लागला, आणि आपली इच्छा बलात्कारानें पूर्ण करवी कीं नाहीं, याचा तो विचार करूं लागला. रागिणीच्या युक्तीचें व तिच्या पातिव्रत्याचें त्याला कौतुक वाटलें. आपल्या जातींतल्या बायका आपल्या पाठीला लागतात, व या बायकोची आपण मनधरणी करीत आहों, तरी ही कबूल होत नाहीं, याचें त्याला फार आश्चर्य वाटलें. दुसऱ्याची बायको अशा रीतीनें घेण्यांत त्याला पाप वाटत नव्हतें. वीराचें हें कर्तव्य आहे, असें तो व त्याची सर्व जात मानीत असे. त्यानें जी नवीन बायको केली होती, ती अशीच दुसऱ्याची बलात्कारानें हिसकावून घेतलेली होती. आपल्या नवऱ्याला मारणाराशीं लग्न कसें करावें, असें त्या बायकोलाहि कधीं वाटलें नाहीं, मग मीरबलाला त्याच्यांत कांहीं वाटलें नाहीं, याचें काय नवल?

रागिणीला बलात्कारानें आपल्यापाशीं ठेवून घेण्याचा त्याच्या मनांत विचार आला. हें कृत्य करणें ह्मणजे पाप करणें, असा विचार त्याला शिवलाच नाहीं; पण मीरबल हा फार अभिमानी होता. त्याला आजपर्यंत कोणत्याहि स्त्रीनें कधीं झिडकारलें नव्हतें. ज्या स्त्रीनें आपला असा अपमान केला, तिला बाळगण्यांत तरी काय भूषण आहे, असें त्या अभिमानी तरुणाला वाटूं लागलें. कामविकार त्याला एकीकडे ओढीत होता, व हा अभिमान दुसरीकडे नेत होता.

मीरबलाच्या मनांत अशा प्रकारचे विचार चालले असतां त्याच्या पायाखालीं पडलेल्या रागिणीच्या हृदयांत काय चाललें होतें, याचें वर्णन करूं लाग-

त्यास डोळ्यांत अश्रु येऊन गोष्ट सांगण्याचें कामच थबकण्याचा संभव आहे, तेव्हां तो प्रयत्नच मी करीत नाहीं. एवढें मात्र सांगतों, कीं, कटोहांत जीव देण्याची युक्ति फसलेली पाहून बाह्यतः तरी आपण पापकर्म करावयाला कबूल कां झालों, याचा तिला फार पश्चात्ताप झाला, व ती आतां कृष्णाचा धांवा न करतां त्याला 'कृष्णा, मला साहाय्य करायला येत नाहींस तो नाहींस, व मरूंहि देत नाहींस, काय हा निर्दयपणा?' अशा प्रकारें दोष देऊं लागली आणि–आणि आईची आठवण करून रडूं लागली, दुसरें काय?

## प्रकरण एकविसावें.

## काय होणार ?

इकडे नानासाहेब, शास्त्रीबुवा इत्यादि मंडळीला घोंगड्या दिल्यावर पहारेकऱ्यांनीं त्यांनां स्वस्थ निजावयाला सांगितलें. परंतु त्या वेळेला झोंप घेण्याची कोणाला इच्छा होणार, व झोंप तरी कोणाला येणार? हलकेहलके शास्त्रीबुवा नानासाहेबांशीं बोलूं लागले, व धैर्याचा आव आणून विनोद करण्याचा प्रयत्न करूं लागले. आपल्या पत्नीला, मुलीला व इतरांनां धीर यावा म्हणून नानासाहेबांनींहि त्यांनां विनोदी उत्तरें देण्याचा आपणाकडून यत्न केला. परंतु ओढूनताणून आणलेलें हें चंद्रबळ किती वेळ टिकणार? कांहीं आकस्मिक शब्दांवरून शास्त्रीबुवांनां घरची आठवण झाली, व आपल्या पत्नीची, लहान मुलांची व मुलींची आठवण होऊन त्यांच्या हृदयांत क्षोभ झाला, आणि तो शोकरूपानें बाहेर पडूं लागला "देवा, आतां तिचें कसें होणार? मीं काय असा अपराध केला आहे, म्हणून माझ्यावर हा प्रसंग आणलास? ती आतां मुलांचें पोट कसें भरणार? मीं पाप केलें असलें, तर मला शासन कर; पण माझ्या गरीब बिचाऱ्या मुलांनां तूं कां छळतोस?"

शास्त्रीबुवांनां अशा रीतीनें शोक करतांना—ओक्साबोक्शीं रडतांना—क्वचित्च कोणीं पाहिलें असेल. ते आपल्या बायकोसंबंधानें व मुलांसंबंधानें बहुधा निंदापर भाषणें करीत असत; यावरून त्यांचें आपल्या बायकोवर व मुलांवर विशेष प्रेम नव्हतें, असें लोकांनां व आईसाहेबांनांहि वाटत असे. पण खरी गोष्ट तशी नव्हती. त्यांचें बायकोवर व मुलांवर फार प्रेम होतें. त्या प्रेमामुळें त्यांचा सारा वेदान्त आतां बाजूला राहिला, व ते आतां लहान मुलाप्रमाणें रडूं लागले. प्रेम बहुधा हृदयांतच राहिलें, जिव्हेच्या द्वारें बाहेर पडलें नाहीं, म्हणून मुळीं प्रेमच नाहीं, असें कसें होईल?

काव्यशास्त्रज्ञ व विवेकी शास्त्रीबुवांची जेथें अशी स्थिति झाली, तेथें साध्याभोळ्या आईसाहेबांची कशी स्थिति झाली असेल, याची वाचकांनां वर्णनाशिवाय कल्पना येईलच. उत्तरा व आनंदराव हीं आनंदाच्या उच्च शिखरावरून एकदम दुःखदरींत पडल्यामुळें त्यांनां जो धक्का बसला, त्यामुळें शोक करण्याची सुद्धां त्यांनां आतां शुद्ध नव्हती. लतेवरच अर्धवट वाळून गळून पडलेल्या फुलांप्रमाणें तीं म्लान होऊन जवळजवळ पडलीं होतीं.

भाऊसाहेबांची अवस्था थोडीबहुत तशीच झाली होती. रागिणीला दुसरीकडे नेतांना जेव्हां त्यांनीं पाहिलें, तेव्हां त्यांची कंबरच खचली, व आपल्या जिवाचा कोणी लचकाच तोडला कीं काय, असें त्यांना झालें. ते आतां कोणाशीं कांहीं बोलत नव्हते. केवळ शून्यदृष्टीनें आकाशांतील तारागणाकडे पहात होते, व या जगांतील अगाध ईश्वरी लीलेचा भ्रांत चित्तानें विचार करीत होते.

भाऊसाहेबांसारख्यांना विवेकाचें व तात्त्विक विचाराचें पाठबळ असूनहि त्यांची अशी शोचनीय व दीन अवस्था झाली, तर मग अडाणी व अज्ञानी टिल्लूनें काय करावें? त्याला बिचाऱ्याला आपल्या म्हातारीची आठवण झाली, व जनुभाऊ चकण्यांना आणि किंनरीच्या बापाला जसें या क्रूर लोकांनीं कटोहांत जाळलें, तसा आपणावरहि प्रसंग येणार कीं काय, अशी भीति वाटून तो गळा काढून रडूं व ओरडूं लागला.

किंनरी त्याच्याजवळच मुळुमुळू रडत होती, व बापाच्या मरणाबद्दल शोक करीत होती. कटोहांत आपणाला जाळतील, हें तिला ठाऊक होतें; पण या गोष्टीला ती फारशी भ्याली नाहीं. याचें कारण सांगणें जरासें कठिण आहे. कटोहांतील मानवबलींचा देखावा तिनें अनेकदां पाहिल्यामुळें तिची भीति कदाचित् कमी झाली असेल, किंवा रानटी लोकांना मरणाची विशेष भीति वाटत नसेल, किंवा दुसरें एकादें कारण असेल,—एवढी गोष्ट खरी, कीं, तिला त्या वेळीं मरणाची विशेष भीति वाटली नाहीं.

शास्त्रीबुवांनीं कांहीं वेळ मुक्तकंठ शोक केल्यावर त्यांचा हृदयक्षोभ जरासा शांत झाला, व बोलावयाला पुनः आरंभ करून "उगाच शोक करण्यांत तरी काय अर्थ आहे?" असें ते म्हणाले, आणि शोक आवरण्याचा आपल्या मित्रांना उपदेश करूं लागले.

रडूनरडून डोळ्यांतलें पाणी आटलें म्हणून कीं काय, आईसाहेबांचें व टिल्लूचें हृदयद्रावक रोदन आतां बंद झालें होतें, व सर्वत्र शांतता होती. शास्त्रीबुवा बोलूं लागल्यावर पहारेकऱ्यांनीं त्यांच्याकडे रागीट व साशंक मुद्रेनें पाहिलें; परंतु कैदी पळून जाण्याचा वगैरे विचार करीत नाहींत, अशी त्यांची खात्री झाल्यामुळें त्यांनीं शास्त्रीबुवांच्या बोलण्याकडे कानाडोळा केला.

"शोक आवरला आम्हीं शास्त्रीबुवा! पण पुढें काय?" आनंदराव म्हणाले.

## काय होणार?

" सर्व कांहीं ईश्वराच्या स्वाधीन आहे, तो आपल्याला वांचवील. " शास्त्री-बुवा वर आकाशाकडे डोळे करून ह्मणाले.

" ईश्वर आहे का नाहीं, कोणाला ठाऊक!" आनंदराव निराश विनोदानें ह्मणाले.

यावर उत्तरा कांहीं ह्मणणार होती, आणि त्याकरितां जराशी मान वरती करून आनंदरावांकडे ती पाहूं लागली. तिच्या मनांतून कांहींतरी बोलावयाचें आहे, असें तिच्या मुद्रेवरून दिसलें; परंतु तिच्या तोंडांतून त्या वेळीं शब्दच निघाला नाहीं! तिची ती स्थिति पाहून सर्वांनां फार वाईट वाटलें, व क्षणभर कोणीं कांहीं बोललें नाहीं. नंतर शास्त्रीबुवा ह्मणाले " आपण दुःखांत असलों, ह्मणून जगांत ईश्वरच नाहीं, असें नाहीं ह्मणतां येणार."

यावर आनंदराव कांहीं आक्षेप घेऊं लागले. इतक्यांत एक पहारेकरी ओरडून आपल्या भाषेंत ह्मणाला "ए गद्धेलोक, आतां एकमेकांशीं बोलायचें नाहीं. स्वस्थ पडून रहा, नाहींतर फरस मारीन, आणि डोकेंच उडवीन!"

पहारेकऱ्याची ही धमकी ऐकल्यावर मंडळी पुनः आपल्या शोकमय विचारांत बुडून गेली. त्या क्रूर जंगली पहारेकऱ्यांपैकींसुद्धां एकाला आपल्या सोबत्याचें हें मग्रूरीचें भाषण आवडलें नाहीं. तो आपल्या मग्रूर सोबत्याला ह्मणाला " अरे, कां त्यांनां उगाच छळतोस? गरीब बिचारे उद्यां कटोहांत मरणार आहेत. त्यांनां पुरतें बोलूंहि देत नाहींस?"

हें ऐकून तिसरा पहारेकरी ह्मणाला " अरे, तूं ह्मणतोस तें सर्व खरें; पण या कैद्यांनां बोलूं दिलें, तर मीरबल आपल्या मानेबरच गदा आणील."

" आहे ठाऊक मीरबल मला!" पहिला मगरूर पहारेकरी ह्मणाला. "त्याची ऐट माझ्यापुढें नाहीं चालायची! आम्हांला यंव करा आणि त्यंव करा, असें तो सांगत असतो; पण आपण कसें वागतो, पहा ना? त्या तरुण पोरीला एकटीलाच आंबराईत घेऊन तो गेला आहे, यांतलें इंगित आह्मांला काय कळत नाहीं, होय? माझ्यापुढें बोलायला त्याला येऊं द्या, ह्मणजे सांगतों काय आहे तें त्याच्या तोंडावर—"

" अरे, मीरबलाचें करणें मीरबलाला शोभून जातें." तिसरा पहारेकरी मध्येंच ह्मणाला. "आपण तसें करून कसें चालेल?"

" कसें ह्मणजे? तसेंच! मीहि यांतल्या एका पोरीला त्याच्यासारखेंच—"

" ह्मणजे ?" तिसरा पहारेकरी आश्चर्यचकित होऊन ह्मणाला. " वेड्या, भलतेंसलतें करूं नकोस हो कांहीं ! निदान आमच्या पहाऱ्याच्या वेळीं तरी नको. उद्यां तूं आपला पाहिजे तें—"

" अरे, भितां काय ? मीरबल जें करतो, तें आपणाला करायला काय भीति आहे ?"

" शहाणाच आहेस ह्मणायचा तूं !" दुसरा पहारेकरी ह्मणाला.

आपल्या सोबत्यांचा भित्रेपणा पाहून तो पापबुद्धि पहारेकरी मोठ्यानें हंसला, व ह्मणाला " अरे, तुमचें काय जातें ?"

" तेवढें शहाणपण आम्हांला नको शिकवूं ! " तिसरा पहारेकरी ह्मणाला. "मीरबलानें पाहिलें, तर तो तुझें तर डोकें एकदम उडवीलच, पण लगेच आमचेंहि उडवील !"

आपले सोबती भित्रे भागुबाई आहेत, असें पाहून पहिल्या पहारेकऱ्यानें आपला पापविचार सोडून दिला, व त्यांचें भाषण कांहीं वेळ तेथेंच थांबलें. कांहीं वेळानें तो ह्मणाला "अरे, तिघांजणांनीं पहारा करून काय करायचें आहे ? मी निजतों झालें."

" तूं पाहिजे तें कर. " त्याचा भित्रा सोबती ह्मणाला. " मीरबलनें पाहिलें, तर मग जगण्याची मात्र आशा करूं नकोस !"

" अरे जा ! पुष्कळ पाहिले आहेत असले मीरबल मीं !" असें ह्मणून पांघरूण घेऊन बेफिकीरपणें तो भुईवर पसरला, व लगेच झोंपींहि गेला.

बाकीचे दोघे कटोहाकडे तोंड करून व आपल्या सुशिक्षित कैदीमंडळीकडे पाठ करून गप्पा मारीत उभे असतां किंनरीनें आपल्या हाताला बांधलेली वेल दांतांनीं हलकेहलके कुरतडून टाकली, व नंतर आपले पायहि तिनें मोकळे करून घेतले. लगेच ती हळुहळू मुळींच आवाज न करतां टिल्लूजवळ लोळत-लोळत गेली, व त्याचेहि बांधलेले हातपाय तिनें सोडले.

"आपण आतां पळून जाऊं या." ती ह्मणाली.

"नाहीं." टिल्लू म्हणाला. " आधीं या आपल्या धन्यांनां आपण मोकळें करूं, आणि मग पळून जाऊं."

किंनरी आपल्या नवऱ्याला आपला जीव आधीं वांचविण्याचें शिकवूं लागली; पण टिल्लू आपला आग्रह सोडीना. अखेर त्यांचें कुजबुजणें पहारे-

कऱ्यांच्या कानांवर गेलें. पण सुदैवानें त्यांनीं "बोलूं नका," एवढेंच जोरानें बजावून सांगितलें, व एवढ्यावरच तो प्रसंग टळला.

या गोष्टीमुळें सावध होऊन हुजत घालण्याचें सोडून देऊन किंनरी लपतछपत हळुहळू उत्तरेजवळ व आईसाहेबांजवळ गेली, व स्तब्धपणें पडावयाला त्यांनां हलकेच बजावून तिनें त्यांचे हातपाय सोडविले. टिल्लूनें याच रीतीनें नानासाहेबांनां वगैरे बंधमुक्त केल्यावर सर्वांनीं मिळून एकदम पळून जावें, असें टिल्लूनें हलकेच सुचविलें; पण नानासाहेब म्हणाले "टिल्लू, आधीं आपण त्या आंबराईंत जाऊं या, व रागिणीला सोडवूं या. तिला एकटीला या राक्षसांच्या हातांत सोडून मी नाहीं जाणार."

सगळ्यांनां हा विचार पसंत पडला, व टिल्लूनें शीळ घातल्यावर सगळ्यांनीं एकदम उठावयाचें, असा त्यांचा बेत झाला. पण त्याला बराच वेळ चांगलीशी संधिच मिळेना. दोघे पहारेकरी जागे असतां पळून जाण्याचा प्रयत्न करणें मूर्खपणाचें आहे, हें ते ओळखून होते.

बराच वेळ गेला, तरी या दोन पहारेकऱ्यांपैकीं कोणी निजत नाहीं, किंवा कोठें जातहि नाहीं, असें पाहून टिल्लूनें एक धाडसाची युक्ति काढली. भाऊसाहेब त्याच्याजवळच पडले होते, त्यांनां त्यानें ती सांगितली, व लगेच त्यानें हलकेच शीळ दिली, तत्क्षणीं भाऊसाहेब आणि तो एकदम उडी मारून उठले, आणि कटोहाकडे तोंड करून बेसावधपणें उभे असलेल्या पहारेकऱ्यांपैकीं एकाच्या हातून टिल्लूनें व दुसऱ्याच्या हातून भाऊसाहेबांनीं एकदम फरस हिसकावून घेतले, आणि लगेच त्या दोघांनांहि त्यांनीं तेथेंच ठार केलें, व लगेच सगळी मंडळी तशीच जी धूम धांवत सुटली, ती आंबराईंत शिरली.

तेथें मीरबल मागें वर्णन केल्याप्रमाणें रागिणीच्या छातीवर पाय देऊन हिच्यावर बलात्कार करावा किंवा नाहीं, या विचारांत निमग्न झाला होता. मीरबलानें आपल्या जातींतील कोणत्याहि स्त्रीला 'पत्नी हो,' असें म्हटलें, कीं, ती आनंदानें कबूल व्हावयाची, असा त्याचा आजपर्यंतचा अनुभव असल्यामुळें आपण हिची इतकी मनधरणी करीत असतां हिनें आपणाला झिडकारावें, याचा त्याला मोठा अचंबा वाटला, व असा अपमान करणारी स्त्री बायको म्हणून घ्यावी, का तिचे दोन तुकडे करून टाकावे, याची तो मानी वीर आपल्या मनाशीं वाटाघाट करीत होता, हें मागें सांगितलेंच आहे. रागिणीची आपल्या

पतीवरील भक्ति व तिचा निश्चय पाहून ही स्त्री आपल्या जातींतील स्त्रियांहून निराळ्या व उच्च प्रकारची आहे, असें त्याला वाटूं लागलें होतें, आणि त्याची प्रसुप्त सदसद्विवेकबुद्धि जागृत होऊन हिच्यावर बलात्कार करणें योग्य नाहीं, अशी भावना त्याच्या हृदयांत उदित होत होती. परंतु तिचें सौंदर्य व तिचा हा दृढनिश्चय पाहून ती त्याला अधिक आदरणीय वाटूं लागली, व त्याचा कामविकार अखेर जवळजवळ नाहींसाच झाला. मीरबल रानटी असला, तरी हाडाचा खरा वीर होता. लढवय्याशीं लढण्यांत त्याला आनंद होत असे; पण या अनाथ स्त्रीवर जुल्म करणें त्याच्या जीवावर आलें.

"हें वीराला शोभत नाहीं!" तो मनांत ह्मणाला. "मला नाकारून हिनें माझा अपमान केला आहे, तेव्हां ही अशी स्त्री मला नकोच!"

असा विचार करून मीरबल तिच्या छातीवरचा पाय काढणार, इतक्यांत दैवयोग असा, कीं, त्या वेळेलाच भाऊसाहेब त्याच्याजवळ आले, आणि त्यांनीं त्याच्या हातांतील फरस हिसकावून घेतला! तोच फरस त्याला ते मारणार, इतक्यांत मीरबलानें तो चुकविला. परंतु तो वीर पळाला नाहीं. हातांत शस्त्र नसतांहि विजेसारखा तो भाऊसाहेबांच्या अंगावर तुटून पडला, व त्यानें त्यांनां जमिनीवर लोळविलें. परंतु इतक्यांत नानासाहेब, आनंदराव व टिल्लू तेथें आलेच, व त्यांनीं त्याला खालीं पाडलें, आणि नानासाहेब "मारूं नको—मारूं नको" ह्मणत आहेत, तोंच टिल्लूनें त्या जंगली वीराचें गर्दन तोडलें! दैवयोग ह्मणतात तो याला!

## प्रकरण बाविसावें.

## गुरु शिष्य झाले !

कारिसेनी राज्यांतील घोर वर्णन सोडून देऊन प्रियब्रह्मस्वामींच्या आनंद-मठांतील शांत संभाषणाकडे वळणें किती आल्हादकारक आहे! ज्या रात्रीं त्या रानटी राज्यांत मागें वर्णन केलेला घोर प्रकार घडला,त्याच रात्रीं प्रियब्रह्म-स्वामी व भय्यासाहेब एकीकडे बसून गुरुशिष्यांप्रमाणें अनेक विषयांची चर्चा करीत होते.

" स्वामिन्," भय्यासाहेब म्हणत होते "माझ्या पत्नीवर असा प्रसंग येणार आहे हें आपणाला ठाऊक होतें, तर मग आपण या मंडळींनां तिकडे धाडलें तरी कसें? आणि आज तरी मला तिकडचा मार्ग कां दाखविला नाहीं? आपणांला एवढी योगसिद्धि असतांना आपण या गोष्टीचा प्रतिकार कां केला नाहीं?"

"बाळ, मला जरी अनेक सिद्धि असल्या, तरी त्यांचा उपयोग सृष्टि-नियमांचें निरर्थक उल्लंघन करण्याच्या कामीं करणें चांगलें नाहीं."

"संकटांत सांपडलेल्या या बायकापुरुषांनां साहाय्य करणें 'निरर्थक' आहे, असें का आपलें ह्मणणें?" भय्यासाहेबांनीं उत्साहानें विचारलें.

"त्यांनां साहाय्य करणें 'निरर्थकच' नव्हे, अनर्थावह होतें." स्वामींनीं शांतपणें उत्तर दिलें.

"कसें?"

"कसें तें सविस्तर सांगण्यांत अर्थ नाहीं; पण एवढें तुला सांगतों, कीं, त्यांनां जर कारिसेनी देशांत मीं पाठविलें नसतें, व त्यांच्यावर हा प्रसंग आला नसता, तर हल्लीं त्यांनां जें दुःख होत आहे, त्यापेक्षां अधिक दुःख सोसावें लागलें असतें!"

"यापेक्षां अधिक दुःख व अधिक अपमान तो काय असणार?"

"जर काल जनुभाऊ चकणे कटोहांत मेले नसते, तर त्यांनीं या बायकांवर आतांच्यापेक्षांहि भयंकर प्रसंग आणला असता, व सर्वांच्या सुखाचा आणि अब्रूचाहि अधिक शोचनीय नाश केला असता!"

"पण जनुभाऊंचा कांटा काढण्याकरितां का असला प्रसंग यांच्यावर आंणा-वयाचा? या बायकांनां त्या रानटी लोकांनीं जर बळजबरीनें—"

"हें सर्व मी ओळखून आहें." स्वामी मध्येंच ह्मणाले. "पण या सर्व गोष्टी घडून येणें त्यांच्या व जगताच्या दृष्टीनें हितावहच आहे!"

"हें आपण म्हणतां म्हणून खरें मानलें पाहिजे; पण जगताच्या हिताकरितां माझ्या पत्नीला 'मीरबल' का कोण ह्मणतां, त्या दुष्टाच्या हातांत देणें, हें चांगलें का?"

"मीं केली ही गोष्ट जगताच्याच नव्हे, तर तिच्याहि हिताची आहे." स्वामी शांतपणें ह्मणाले.

"तिचा पातिव्रत्यभंग झाला, म्हणजे जगाचें व तिचें स्वतःचें कल्याण कसें होणार?"

"पातिव्रत्यभंग झाला, तर तिचा शरीरनाश होईल; पण या गोष्टीमुळें तिचा आत्मनाश होईल असें नाहीं. शिवाय या संकटांतून ती जर नशिबानें वांचली—"

"कसली वांचते आतां?" भय्यासाहेब निराशेनें मध्येंच ह्मणाले. "आपण गोष्टींत हात घालावयाचा नाहीं ह्मणतां, आणि मला तर तिकडचा मार्ग सांपडत नाहीं."

"समज, कीं, यदाकदाचित् नशिबानें ती वांचली, तर तिला आपल्या सदाचाराबद्दल जो आत्मप्रत्यय येईल, तो आत्मप्रत्यय हीं संकटें तिच्यावर आलीं नसतीं, तर तिला प्राप्त झाला असता काय? आणि हा मुद्दा सोडून दिला, तरी सर्व विश्वाच्या हिताकडे पाहिलें असतां, या सर्व मंडळीवर असला प्रसंग येणें आवश्यक होतें. बाळ, जगतांतील लहानशा गोष्टीचाहि दुसऱ्या महत्त्वाच्या गोष्टीशीं निकट संबंध असतो. या शोचनीय–परंतु आवश्यक संकटाचा तिच्या कुटुंबावर–गांवावर–प्रान्तावर–हिंदुस्तानच्या इतिहासावर कसा परिणाम होणार आहे, याची तुला कल्पना नाहीं; पण मला ती चांगली आहे."

"दुसरें कांहीं उत्तर नसल्यावर अशा प्रकारें समाधान करून घेणें साहजिकच आहे." भय्यासाहेब निराश व उदास स्वरानें ह्मणाले.

"तुला ही गोष्ट खरी वाटणार नाहीं, हें मी कबूल करतों." स्वामी प्रेमपूर्ण स्वरानें ह्मणाले. "पण मी सांगतों या गोष्टीचा नीट विचार कर. तिनें या जन्मीं किंवा पूर्वजन्मीं पापें केलीं असलीं, तर त्यांबद्दल तिला शासन मिळणें जगताच्या दृष्टीनें आवश्यक आहे ना?"

" होय."

"मग तिच्या पापकर्माबद्दलच हें शासन आहे, असें तूं कां समजत नाहींस ? शिवाय, या संकटाचे जगताला दुसरे आनुषंगिक अनेक उपयोग आहेत."

"असतील, असतील !" भय्यासाहेबांनां दुःखाचा उमाळा येऊन ते हुंदके देत ह्मणाले. "मला या गोष्टी ऐकण्याची मुळींच इच्छा नाहीं. तिनें पाप केलें असलें, किंवा तिच्या मनांत पापविचार आले असले, तर त्या सर्वांचें कारण मी आहें. तिचा स्वभाव जात्या पापी नव्हता."

" तुला माझें ह्मणणें कडू वाटेल; पण खरी गोष्ट सांगितली पाहिजे. तूं तिला सोडून देण्याचें अविचारानें जें पाप केलेंस, त्याबद्दल ईश्वरी शासन म्हणूनच तिच्यावरचा हा प्रसंग तुला ऐकावा लागत आहे. तुला शासन मिळावें, व तुला सन्मार्गावर आणावें,हा या विलक्षण प्रसंगाचा एक आनुषंगिक हेतु आहे."

स्वामींचे हे शब्द भय्यासाहेबांनां फारच झोंबले. पण ते यथार्थ व न्याय्य होते, असें त्यांचें मन त्यांनां सांगत असल्यामुळें याच्यावर ते काय उत्तर देणार ? आपण आपल्या बायकोच्या अधःपाताला कारणीभूत झालों, हा विचार त्यांच्या हृदयाला शल्याप्रमाणें टोंचूं लागला. त्यांची विवेकबुद्धि आतां मलिन झाली, धीर सुटला, मनावरचा ताबा गेला, आणि ते तेथेंच मुक्तकंठ रडूं लागले, व पश्चात्तापाचे उद्गार काढूं लागले.

प्रियब्रह्मस्वामींनांहि हें पाहून फार वाईट वाटलें. "परमेश्वरा !" ते मनांत म्हणाले "मीं या मंडळींच्या व अखिल विश्वाच्या कल्याणाकडे लक्ष्य देऊनच त्यांनां त्या संकटमय प्रदेशांत पाठविलें. माझा याच्यांत सद्धेतुच होता, व मला ही गोष्ट साधण्याला अन्य मार्ग दिसत नव्हता. ज्या ज्या गोष्टी घडून आल्या, त्या त्या घडून आल्या नसत्या, तर या मंडळींनां अधिक दुःख झालें असतें, हें मला अंतर्ज्ञानानें स्पष्ट दिसत होतें. पण ईश्वरा, या सच्छील स्त्रीपुरुषांनां दुःखदरींत लोटण्याशिवाय मला दुसरा मार्ग सांपडूं नये, अशी जगताची घटना तूं कां केलीस ? असले प्रसंग ज्या जगतांत आवश्यक नाहींत, असें जग तुला उत्पन्न करतां येत नव्हतें काय ? ईश्वरा, जगाचें हें कोडें कधीं तरी कोणाला उलगडलें आहे काय ? मला योगसिद्धि अनेक आहेत पण हें ज्ञान नाहीं. जगांत ज्या ज्या वस्तु आहेत, किंवा गोष्टी घडत आहेत, त्या त्या आवश्यक आहेत; इतकेंच नव्हे, तर त्या सर्वोत्कृष्ट–निर्दोष आहेत, असें

ज्याला कळेल, आणि ज्याचें मन निःशंक व शांत होईल, तोच खरा सिद्ध आणि तोच स्थितप्रज्ञ. मला अनेक सिद्धि असल्या तरी मी सिद्ध नाहीं, हें मीं ध्यानांत ठेवलें पाहिजे.

" पण 'सिद्ध' किंवा सर्वज्ञ नाहीं, ह्मणून शोक करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. जगताचें गूढ तत्त्व अस्पष्ट असलें, तरी माझें कर्तव्य स्पष्ट आहे. कर्तव्य करावें, आणि मग जगाचें गूढ तत्त्व शोधण्याची इच्छा धरावी. नुसत्या तर्कानें किंवा विद्वत्तेनें हें कोडें सुटावयाचें नाहीं. हें उच्चतम ब्रह्मज्ञान अथवा आत्मज्ञान श्रुतींत ह्मटल्याप्रमाणें प्रवचनावर, बुद्धीवर, अध्ययनावर, विद्वत्तेवर किंवा दुसऱ्या कशावर अवलंबून नाहीं. तें कर्तव्यनिष्ठ मनुष्यालाच आपोआप प्राप्त होत जातें. कर्तव्यकर्मांत रत राहिल्यानें मनुष्याचें मन शांत रहातें, व कर्तव्यनिष्ठ नसलेल्या मनुष्याला जें ज्ञान शक्य नसतें, त्या ज्ञानाची त्याला अंतःस्फूर्ति होते. ज्ञान हें बुद्धीवरच अवलंबून नाहीं. तें मनोवृत्तीवरहि अवलंबून असतें. नीतीच्या आचरणाशिवाय मन शांत व्हावयाचें नाहीं, व मन शांत आणि प्रसन्न असल्याशिवाय तत्त्वस्फूर्ति व्हावयाची नाहीं !"

प्रियब्रह्मस्वामी अशा प्रकारें विचार करीत असतां भय्यासाहेबांचा उमाळा शांत होत गेला, व या सुमाराला त्यांचें मन बरेंच शांत झालें होतें. त्या वेळीं स्वामींनीं दुरून कोणी येत आहे असें पाहिलें, व येणारे गृहस्थ कोण असावेत, याचा डोळे मिटून त्यांनीं मनाशीं विचार केला. लगेच त्यांनां कसलीशी आठवण झाल्यासारखें होऊन त्यांनीं भय्यासाहेबांनां आपल्या खोलींत जावयाला सांगितलें. भय्यासाहेबांनांहि चर्चेची आतां अधिक इच्छा नसल्यामुळें ते त्या मठांतील नेमून दिलेल्या आपल्या खोलींत आनंदानें गेले, व रागिणीवरील प्रसंगाचा विचार करीत पडले.

इकडे दुरून येणारे गृहस्थ-अथवा त्यांनां आतां 'स्वामी' ह्मणावें, कारण ते आपणांला परिचित असलेले बोधस्वरूपस्वामीच होते–आनंदमठाजवळ आले. प्रियब्रह्मस्वामींचें दर्शन झाल्याबरोबर त्यांनीं त्यांनां साष्टांगप्रणिपात घातला, व "अपराधांची क्षमा करा, व या पापी पुरुषाचा उद्धार करा," असें ते त्यांनां विनवूं लागले.

" बोधस्वरूपस्वामी, उठा. तुह्मी कोण आहांत, हें मीं ओळखलें, व तुह्मांला तुमच्या पूर्वकर्मांचा पूर्ण पश्चात्ताप झालेला आहे, हेंहि मला ठाऊक आहे.

तुह्मीं भय्यासाहेब नांवाच्या मनुष्याला फुसलावून नेलेंत, व पुढें त्याला आपण मेल्याची बातमी स्वतःच जगांत पसरविण्याला शिकविलेंत, इत्यादि गोष्टी मला ठाऊक आहेत."

"महाराज!" बोधस्वरूपस्वामी रडतरडत केंविलवाण्या स्वरानें ह्मणाले "आपण ह्मणतां त्या सर्व गोष्टी खऱ्या आहेत. फार काय, याहूनहि मीं घोर कर्मे केलीं आहेत. त्यांचा उच्चार करण्यांत काय अर्थ आहे? महाराज, मला क्षमा करावी. माझ्यासारखा पापी कोणी नसेल. मला आपण सन्मार्ग दाखवावा, व आपली सेवा करूं द्यावी, एवढीच माझी इच्छा आहे. मीं इतके दिवस भोंदू गुरूचें काम केलें; पण आतां मी खरा शिष्य होऊं इच्छीत आहें. भोंदु गुरु असतांना व ह्मातार्‍या आणि विद्वान् माणसांनांहि ऐटीनें उपदेश करतांना मला जो आनंद होत होता, त्यापेक्षां आपला शिष्य होऊन आपली सेवा करण्यांत मला अधिक आनंद आहे."

बोधस्वरूपस्वामींच्या चर्येवरून त्यांचा पश्चात्ताप वरकरणी किंवा अल्पकालीन नसून तो अंतःकरणापासूनचा व शाश्वत होता, हें उघड दिसत होतें. त्यांनीं प्रियब्रह्मस्वामींजवळ आपलीं सर्व पापें कबूल केलीं, व त्यांनां ते अनन्यभावानें शरण गेले.

बुद्धिमान्, परंतु भोंदू बोधस्वरूपस्वामींनां अखेर पश्चात्ताप होणार आहे, हें प्रियब्रम्हस्वामींनां अंतर्ज्ञानानें जरी पूर्वीच कळलें होतें, तरी त्यांचे ते पश्चात्तापोद्गार प्रत्यक्ष श्रवण केल्यावर त्यांनां एक प्रकारचें अवर्णनीय समाधान झालें. या पश्चात्तापदग्ध पुरुषाला वाक्प्रहार करून आणखी दुःख देणें योग्य नाहीं, असा विचार करून ते त्यांनां सौम्यपणें ह्मणाले "बोधस्वरूपजी, प्रत्येक मनुष्य पापी आहे.कोणाचीहि निंदा करण्याचा किंवा कोणाला आढ्यतेनें उपदेश करण्याचा कोणालाहि अधिकार नाहीं. परंतु तुम्ही माझ्याकडे आलांच आहांत, तेव्हां एवढेंच सांगतों, कीं, तुम्ही येथें मनांत कांहींएक न आणतां स्वस्थ चित्तानें रहा, व गतगोष्टींचा आणि पापांचा शोक करण्याचें सोडून द्या. मीं तर तुह्माला आतांच क्षमा केली आहे; पण तुमचा पश्चात्ताप हृदयांतच न राहतां तुमच्या कृतींत व जीवनक्रमांत दिसून आला, तर परमेश्वर-सर्व जग-तुमचे शत्रूहि-तुह्मांला क्षमा करतील, याविषयीं खात्री असूं द्या."

बोधस्वरूपस्वामींनां वाटेंत अशी भीति पडली होती, कीं, प्रियब्रह्मस्वामी आपणाला जवळ उभेसुद्धां राहूं द्यावयाचे नाहींत. ‘माझ्यासारख्या उलट्या काळजाच्या पाप्याला कोण आश्रय देण्याला धजेल?’ असें त्यांनां वाटत होतें. त्यांची अशी अपेक्षा असल्यामुळें जेव्हां त्यांनीं प्रियब्रह्मस्वामींचे सौम्य, मधुर व आश्वासनपर शब्द ऐकले, आणि त्यांची शांत, दयाशील, गंभीर वृत्ति पाहिली, तेव्हां त्यांनां आश्चर्य व आनंद वाटून स्वतःच्या जीवाची थोडीशी धन्यता वाटली.

“आपण मला क्षमा केली,” ते आपल्या गुरुस्थानीय स्वामींनां ह्मणाले “हें आपल्या उदार बुद्धीला साजेसेंच आहे; पण माझे शत्रु मला कधीं क्षमा करणार नाहींत. त्यांनां मीं अशीं नीच कर्में करून फसविलें आहे, कीं,—”

“तुह्माला जर खरा पश्चात्ताप झाला असला, तर तुमचे शत्रुहि तुह्माला क्षमा करतील.” असें ह्मणून प्रियब्रह्मस्वामींनीं ‘पल्लव’ नांवाच्या आपल्या शिष्याला हांक मारली, व “नवीन आलेल्या पाहुण्यांला इकडे धाडून दे,” असें त्याला सांगितलें.

ते पाहुणे आल्यावर बोधस्वरूपस्वामी ओशाळले, व गडबडले; पण त्यांनां आतां पूर्ण पश्चात्ताप झाला असल्यामुळें त्यांचें मन लवकरच स्थिर झालें, व ते ह्मणाले “स्वामीजी, याच तरुण मनुष्याला मीं पत्नीचा त्याग करावयाला सांगितलें, व अखेर त्याला मीं भलतेंच कर्म करण्यास लावण्याचा प्रयत्न केला. या मनुष्याकडे पाहून माझी मलाच लाज वाटत आहे, व माझा जीव मला नकोसा झाला आहे. त्याचे ते शेवटले शब्द माझ्या हृदयांत असे सलत आहेत, कीं, मला आतां जीव द्यावासा वाटत आहे.” असें ह्मणून बोधस्वरूपस्वामींनीं डोळ्यांवर हात ठेवले, व ते तेथें अश्रु ढाळूं लागले.

भय्यासाहेबांनीं बोधस्वरूपस्वामींनां पाहिल्यावर ते येथें कसे आले, याचा त्यांनां प्रथम अचंबा वाटला. परंतु त्यांनां स्वामींच्या नीच कर्मांची लगेच आठवण होऊन ते संतापानें अगदीं लाल झाले !

हें पाहून प्रियब्रम्हस्वामी त्यांच्याकडे पाहून ह्मणाले “तुला खरी ब्रह्मजिज्ञासा आहे किंवा नाहीं, याची मी आतां परीक्षाच घेणार आहें. ज्याला ब्रह्मज्ञान पाहिजे असेल, त्याची वृत्ति सदैव शांत, दयाशील, क्षमाशील असली पाहिजे. त्यानें कोणाचाहि –शत्रूचाहि– निरर्थक द्वेष करतां कामा नये. शत्रूच्या पापा-

चरणाचें नियमन करण्यापुरताच त्यानें शत्रूंचा द्वेष करावा. शत्रूला पश्चात्ताप झाल्यावर ब्रह्मजिज्ञासु मनुष्यानें त्याला क्षमा केली पाहिजे. इतकेंच नव्हे, तर त्याच्यावर प्रेम करावयाला तत्पर असलें पाहिजे."

"स्वामिन्!" भय्यासाहेब जरा शांत होऊन ह्मणाले "मी शत्रूचा निरर्थक द्वेष करणारांपैकीं नांहीं. पण या बोधस्वरूपस्वामींसारख्या भोंदू–लुचा–नीच –पाजी–हलकट—"

आपल्या पूर्वीच्या गुरुजींकडे कठोर, तिरस्कारपूर्ण व द्वेषयुक्त मुद्रेनें पहात भय्यासाहेब हीं विशेषणें जणूं काय मोजूनमोजून उच्चारीत होते, आणि जणूं काय बंदुकीच्या गोळ्यांप्रमाणें शिव्यांचा भडिमार करीत होते!

त्यांचा हा भडिमार पुरा होण्यापूर्वीच प्रियब्रह्मस्वामी म्हणाले "आतां या स्वामींनां खरा पश्चात्ताप झाला आहे. तुला पाहून त्यांनां मेल्यासारखें झालें आहे. मेलेल्याला अधिक मारण्यांत काय पौरुष अथवा समंजसपणा आहे? ज्या वेळेला त्यांनीं तुला अनुचित कर्म करावयाला सांगितलें, त्या वेळेला त्यांनां तूं जे वाक्प्रहार केलेस, ते यथायोग्यच होते. स्वामींनां आतां जो पश्चात्ताप झाला आहे, तो तुझ्या त्या वेळच्या कठोर शब्दांचाच परिणाम आहे; पण आतां व्यर्थ शिव्यागाळी करण्यांत तात्पर्य काय आहे? त्यांनीं महत्पाप केलें आहे, हें कबूल; पण या जगांत पाप केलें नाहीं, असा कोण आहे? तूं तरी निष्पाप आहेस काय?"

स्वामींचा हा शेवटला प्रश्न भय्यासाहेबांनां वर्मींच लागला, व शरमून ते अगदीं गोरेमोरे झाले. क्षणानंतर ते ह्मणाले "स्वामिन्, यांनां जर खरा पश्चात्ताप झाला असेल, तर माझा त्यांच्यावर आजपासून मुळींच रोष रहाणार नाहीं. फार काय, आपण म्हणतां त्याप्रमाणें मी त्यांच्यावर प्रेम करावयालाहि तयार आहें."

भय्यासाहेबांचें हें औदार्याचें वाक्य ऐकून बोधस्वरूपस्वामींनां पुनः गहिंवर आला, व ते रडूं लागले. भय्यासाहेब त्यांच्याजवळ गेले, व त्यांचा हात आपल्या हातांत घेऊन ह्मणाले "स्वामिन्! मी तुम्हाला आतां जे अपशब्द बोललों, त्याबद्दल मला क्षमा करा. माझा सर्व रोष गेला आहे. या स्वामींच्या सन्निध आल्यापासून आणि त्यांचा उपदेश श्रवण केल्यापासून माझें मन विलक्षण समाधान पावलें आहे व आतांचा त्यांचा उच्चतम उपदेश मानण्याइतकी त्यांच्या पुण्यप्रतापानें माझ्या हृदयांत पात्रता आली आहे. स्वामिजी, उठा,

तुह्मी आणि मी आजपासून मित्र आहों. तुम्ही आणि मी या श्रेष्ठ स्वामींचे शिष्य आहोंत, तेव्हां आपण आतां गुरुबंधु झालों आहों. तुम्हीं माझा द्वेष केला, तरी देखील मी तुमच्यावर प्रेम करीन; यापेक्षां अधिक काय सांगूं? ”

वाचक हो, प्रियब्रह्मस्वामींसारखे पुण्यप्रताप, तपोधन, सन्मार्गदर्शक गुरु व भय्यासाहेबांसारखे सात्त्विक, सदाचारप्रिय, द्वेषहीन व ब्रह्मजिज्ञासु शिष्य हे दोघेहि आपापल्या परीनें धन्य नाहींत काय ?

# प्रकरण तेविसावें.

## आनंदमठाला परत.

मीरबलाच्या तावडींतून भाऊसाहेब सुटून मीरबल मरून खालीं पडल्याबरोबर रागिणीनें भाऊसाहेबांनां एकदम मिठी मारली, व तीं दोघेंजण पुनः मुक्तकंठ रडूं लागलीं. नानासाहेबांनांहि गहिंवर आल्यासारखें झालें; पण त्यांनीं आपलें मन आवरलें, व ते भाऊसाहेबांनां म्हणाले " भाऊसाहेब, हा प्रसंग कोणता, इकडे लक्ष्य द्या. येथें क्षणभरहि उभें रहाण्याची सोय नाहीं आतां. चला, धांवा आश्रमाकडे. रागिणी, सोड, सोड भाऊसाहेबांनां. "

असें ह्मणून नानासाहेबांनीं त्या दोघांनां एकमेकांच्या बाहुपाशांतून सोडविलें, व त्यांनां घेऊन ते धांवूं लागले. त्या सुकुमार बायकांनां किंवा त्या प्रौढ पुरुषांनां वीस पावलेंहि धांवण्याची सवय नसेल. पण ही मंडळी आतां दोनतीन मैल धापा टाकीतटाकीत धांवत गेली, व अखेर आश्रम आल्यावर थोडासा विसांवा घेण्याकरितां तेथें बसली.

प्रियब्रह्मस्वामींचे शिष्य तेथें होतेच. "आज दिवसा कोठें होतां ?" असें एका शिष्यानें विचारल्यावर आनंदरावांनीं " तुम्ही आज कोठें होतां ?" असा रागानें उलट प्रश्न केला.

" आह्मी येथेंच होतों. " एकजण शिष्य ह्मणाला.

" इथेंच होतां, तर मग आमची चौकशी करण्याला फुरसत नाहीं झाली वाटतें ? " आनंदराव पुनः उपरोधिक स्वरानें ह्मणाले. " आह्मी कोठें आहोंत,— जीवंत आहों का मेलों आहों, याची चौकशी करण्याची तुह्मांला कांहीं इच्छाच झाली नाहीं ना ? तुमच्यासारख्या स्नेह्यांचा संकटाच्या वेळीं चांगला उपयोग होईल ! स्नेही असावेत ते असेच अस्थेवाईक असावेत !"

" आनंदराव, " त्यांच्यापैकीं प्रौढ व मुख्य शिष्य ह्मणाला "आमच्यावर तुह्मी रागावलां आहांत, हें साहजिक आहे. पण आमचा याच्यांत खरोखर कांहीं दोष नाहीं. तुह्मी मंडळी कोठें व कोणत्या स्थितींत आहांत, हें आम्हांला ठाऊक होतें. तुमच्यावर कसें संकट येणार आहे, तुमच्यापैकीं एका मनुष्याला— जनुभाऊंनां—कसें जाळण्यांत येणार आहे, तुमच्या बायकांवर कोणता प्रसंग ओढवणार आहे, या सर्व गोष्टी आमच्या प्रियब्रह्मस्वामींनीं मला इकडे येतांना सांगून ठेविल्या होत्या, व या प्रसंगाकडे दुर्लक्ष्य करायला त्यांनीं मला आज्ञा

दिली होती. 'असें कां ?' म्हणून मीं स्वामींनां विचारलें, व त्यांनीं मला 'या गोष्टी अशा घडल्याच पाहिजेत, याच्यांतच या मंडळींचें खरें हित आहे,' असें सांगितलें. असलीं भलतीं संकटें येऊन तुमचें खरें हित कसें साधणार, हें मला समजलें नाहीं; पण माझी स्वामींवर अत्यंत भक्ति असल्यामुळें त्यांची आज्ञा मीं शिरसावंद्य केली. आज आमच्यांतली कांहीं मंडळी तुमचा शोध घेण्याकरितां येणार होती. पण गुरूंची आज्ञा लक्ष्यांत घेऊन मींच त्यांनां या गोष्टीपासून परावृत्त केलें. असो. तुम्ही आतां थकलां आहांत, तेव्हां आतां येथें स्वस्थपणें निजा. आम्ही आतां पहारा करतों. भिण्याचें मुळींच कारण नाहीं."

प्रियब्रह्मस्वामींनीं अशा प्रकारच्या विलक्षण संकटांत आपणांला जाणून उमजून कां लोटलें असावें, असा त्या सर्व मंडळीच्या मनांत विचार आला. पण ती विचार करण्याची वेळ नव्हती. निदान आईसाहेबांनां तरी असला विचार करण्याला फुरसत नव्हती. पूर्वनिर्दिष्ट प्रौढ शिष्याकडे वळून त्या ह्मणाल्या "झालं तें झालं. त्याचं आतां काय ? पण आह्मांला कांहीं आश्रमांत आतां क्षणभर सुद्धां रहायचं नाहीं. इतके दिवस राहिलों, नि सुखसोहाळे भोगले तेवढे पुष्कळ झाले. आम्ही आतांच्या आतां घरचा रस्ता धरणार !"

या गोष्टीला उत्तरेनें सुद्धां संमति दिली, व पुरुषमंडळीहि तेथें रहावयाला राजी नव्हती. आतां यापुढें कसली भीति नाहीं, असें शिष्यमंडळी त्यांनां सांगत होती व एक दिवस तरी झोंप आणि विश्रान्ति घेऊन मग पहिजे तर जावें, असा ते शिष्य आग्रह करीत होते पण आग्रहाबद्दल त्यांचे आभार मानून ती मंडळी लगेच रस्ता चालूं लागली. वाट दाखविण्याकरितां शिष्य अर्थात्च बरोबर निघाले, व ती मंडळी प्रियब्रह्मस्वामींच्या जवळच्याच आनंदमठाला तिसऱ्या दिवशीं सुखरूप पोहोंचली.

## प्रकरण चोविसावें.

## प्रत्यक्ष पतीची ओळख पटत नाहीं !

कारिसेनी राज्यांतील आश्रमांतून विजयगांवकर मंडळी जी निघाली, ती तिसऱ्या दिवशीं सकाळीं प्रियब्रह्मस्वामींच्या आनंदमठांत आली. वाट दाखविण्याला वगैरे स्वामींचे शिष्य असल्यामुळें वाटेंत त्यांचे विशेष कांहीं हाल झाले नाहींत.

मंडळी महत्संकटांतून नुकतीच सुटली असल्यामुळें मार्गांतील अवर्णनीय सौंदर्य त्यांनां फारच रमणीय व सुखकर वाटलें. चालतांचालतां त्यांच्यामध्यें अनेक प्रकारचे गंभीर व विनोदात्मक वादविवाद झाले, हें या मंडळींची ज्यांनां थोडीबहुत माहिती असेल, त्यांनां सांगण्याची जरूर नाहीं. मृत्यूच्या दाढेंत सांपडले असतांनासुद्धां ज्यांनां तात्त्विक चर्चा व विनोद सुचला, त्यांनां अशा रम्य प्रवासांत वाद केल्याशिवाय चैन पडेल, ही गोष्टच मुळीं अशक्य !

या वादविवादाचें वर्णन करण्याचें मात्र प्रयोजन नाहीं, व वाचकांच्या मनःस्थितीकडे लक्ष्य देतां तें इष्टहि नाहीं. वाचकांनीं गोष्टीचा शेवट कसा होणार, हें आतां आपल्या बुद्ध्यनुसार कमीजास्त प्रमाणांत बरोबर ओळखलें असेलच; तथापि आपला अंदाज बरोबर आहे किंवा नाहीं, याबद्दल खात्री करून घ्यावयाला ते आतां उत्सुक झाले असतील. अशा वेळीं कथानकांत तात्त्विक चर्चा आणणें म्हणजे अरसिकता दाखविणें आहे; इतकेंच नव्हे, तर वाचकांच्या मनोवृत्तींविषयीं पूर्ण बेफिकीरपणा दाखविण्यासारखेंच आहे. तेव्हां वादविवादाचें वर्णन करण्याच्या भानगडींत न पडतां मंडळी आनंदमठांत पोहोंचल्यावर काय झालें, याचें थोडक्यांत दिग्दर्शन करतों.

ज्या वेळेला आपली ही मंडळी मठांत शिरली, त्या वेळीं प्रियब्रह्मस्वामींचें शिष्यगणांसमोर एका उपनिषद्वाक्यावर प्रवचन चाललें होतें. भय्यासाहेब व त्यांचे पहिले गुरु–बोधस्वरूपस्वामी–हे स्नानाकरितां बाहेर गेले होते. प्रियब्रह्म-स्वामींनीं मंडळीला पाहिल्याबरोबर आनंदस्मित करून मोठ्या प्रेमानें "या मंडळी! कसें काय ? ठीक आहे ना?" असें म्हटलें, व शिष्यांनां पोथी गुंडाळून जावयाला सांगून त्यांनीं मंडळींचा आदरसत्कार केला, आणि बेताबेतानें प्रेमपूर्वक त्यांच्या प्रकृतीची वगैरे विचारपूसहि केली.

बहुतेकांनीं ‘ ठीक आहे, ’ ‘ ठीक आहे, ’ असें उडवाउडवीचें उत्तर देऊन मनांतील विचार प्रकट केले नाहींत. पण शास्त्रीबुवांकडे पाहून स्वामींनीं जेव्हां कुशलप्रश्न विचारला, तेव्हां ते स्मितपूर्वक विनोदस्वरानें ह्मणाले “ वाः, स्वामिमहाराज, आह्मांला तिकडे यमपुरींत धाडूनसवरून पुनः शांतपणें कुशल-प्रश्न विचारणें आहेच का ? ”

“ ह्मणजे ? ” स्वामी ह्मणाले, व शास्त्रीबुवांच्या बोलण्याचा आपणाला कांहीं अर्थच कळला नाहीं, असें त्यांनीं दाखविलें. शास्त्रीबुवांनीं मग आपल्या हालअपेष्टांचें व आपल्यावरील दुर्धर प्रसंगांचें तिखटमीठ लावून रसभरित वर्णन केलें. चाळीसएक तासांपूर्वी त्या प्रसंगांचा प्रत्यक्ष अनुभव घेत असतांना त्यांनां जेवढें दुःख होत होतें, तेवढा किंवा त्याहूनहि अधिक आनंद त्यांनां या वर्णनाच्या प्रसंगीं होत होता, असें त्यांच्या चर्येवरून दिसत होतें. काव्य-रसाची भर घालून त्यांनीं आपल्यावरील संकटांचें जणूं काय मिटक्या मारीतच रसपूर्ण वर्णन केलें, व “ आम्हांला या अशा प्रदेशांत कां धाडून दिलें ? ” अशा प्रकारचे स्वामींनां प्रश्न विचारून त्यांनां विनोदबुद्धीनें बाह्यतः दोष दिला.

“ तुमचाच आग्रह होता तिकडे जाण्याचा ! मीं तुह्मांला फक्त मार्ग दाख-विला. ” असें ह्मणून स्वामींनीं आपल्यावरील जबाबदारी टाळण्याचा प्रथम प्रयत्न केला; परंतु कांहीं वेळानें त्यांनीं गंभीर मुद्रा करून शांतपणें म्हटलें “ मला या सर्व गोष्टी होणार आहेत, हें पूर्णपणें ठाऊक होतें; तरीहि मीं तुम्हांला तिकडे धाडलें. ”

स्वामींचें हें वाक्य ऐकल्याबरोबर मंडळी स्वामींकडे व एकमेकांकडे आश्चर्यानें टकमक पाहूं लागली. हें पाहून स्वामी ह्मणाले “तुह्मांला या गोष्टीचें आश्चर्य वाटावें, हें साहजिक आहे. पण मीं जें केलें, तें करण्यांत माझे काय हेतु होते, हें मी आतांच सांगत नाहीं. ही गोष्ट मीं सद्बुद्धीनें केलेली आहे, एवढेंच मात्र मी आतां सांगतों. मी आपले सर्व हेतु आतांच उघडपणें सांगूं लागलों, तर सारा दिवस पुरणार नाहीं, आणि त्यांतून तुम्ही मंडळी आतां दमूनभागून आलां आहांत. तुम्ही आतां थोडीशी विश्रांति घ्या; मागून आपण याबद्दल पुष्कळ बोलूं. ”

“ आह्मी कांहीं दमलेले नाहीं. ” नानासाहेब ह्मणाले, व आनंदरावांनींहि त्याला दुजोरा दिला, आणि हेतूद्घाटन करावयाला स्वामींनां अप्रत्यक्षपणें सुचविलें.

## प्रत्यक्ष पतीची ओळख पटत नाहीं !

" आम्हांला जी रम्य वनश्री लागली, ती पहात चालणाराला शंभर कोस चाललें तरी श्रम ह्मणून वाटणार नाहींत ! " शास्त्रीबुवाहि ह्मणाले, व स्वामींचे हेतु काय होते, हें जाणण्याविषयीं औत्सुक्य दाखवूं लागले.

भाऊसाहेबांनीं, उत्तरेनें आणि रागिणीनेंहि अशाच प्रकारची इच्छा दर्शविली. परंतु स्वामींनीं त्यांनां विश्रांति घ्यावयाला व थोडासा फलाहार करावयाला शांतपणें प्रेमपूर्वक आग्रह केला; त्यामुळें या सर्व मंडळीची जिज्ञासा त्या वेळीं अतृप्तच राहिली.

फलाहार वगैरे झाल्यावर आईसाहेब "कपाळ दुखतं आहे, मी जरा निजतें," असें ह्मणाल्या. उत्तरा, रागिणी, किंनरी याहि दमल्याभागल्या असल्यामुळें झोंप घ्यावयाला उत्सुक असतील, असें स्वामींनीं ओळखलें, व त्यांनीं शेजारच्याच खोलींत कांहीं ऊबदार ऊर्णावस्त्रें आणि व्याघ्राजिनें शिष्यांकडून पसरवून त्यांची निजण्याची सोय करून दिली.

पुरुषमंडळींपैकीं टिल्लूनें मठांतील एका कोंपऱ्यांत झोंप घेण्याची आपली आपणच शिष्यमंडळीकडून सोय लावून घेतली होती, व तो आतां घोरूंहि लागला होता. बाकीच्यांनां झोंप येत होती; पण स्वामींची मुद्रा गूढार्थपरिपूर्ण दिसत असल्यामुळें त्यांच्याशीं बोलण्याची त्यांनां अधिक इच्छा होती. शास्त्रीबुवांनीं आपल्यावरील आलेल्या प्रसंगाची गोष्ट मुद्दाम उकरून काढली, व " आह्मांला बुद्धिपुरःसर संकटांत कां लोटलें ? " अशा अर्थाचे स्वामींनां ते अनेक तऱ्हेनें प्रश्न विचारूं लागले. परंतु प्रियब्रह्मस्वामींनीं त्यांनां दाद दिली नाहीं. ते कांहीं तरी दुसराच प्रश्न काढीत, व मुख्य प्रश्नाचें उत्तर देण्याचें टाळीत !

बोलतांबोलतां स्वामींनीं मीरबलाच्या स्वभावाची बरीच स्तुति केली. "तो बाहेरून किती क्रूर दिसला, तरी त्याचें हृदय खऱ्या वीराला शोभण्यासारखें होतें." ते ह्मणाले.

" परस्त्रियांनां छळणाऱ्या मनुष्याला ' वीर ' ही पदवी मिळाली, ह्मणजे मग ' वीर ' शब्दाचा अर्थच बदलला पाहिजे ! " शास्त्रीबुवा म्हणाले.

ही टीका ऐकून स्वामी म्हणाले " मीरबलाच्या रानटी जातींत वरील गोष्ट 'पाप' म्हणून समजली जात नाहीं. उलट, अशी गोष्ट करणारा मान्य समजला जातो. अशी स्थिति असल्यामुळें मीरबल हा बुद्धिपुरःसर पापाचरण करणारा होता, असें म्हणतां येत नाहीं. परंतु जनुभाऊंसारखे लोक 'पाप कोणतें, व पुण्य

कोणतें,' हें कळत असून देखील जेव्हां नीचपणा करतात, तेव्हां ते मात्र खरे गर्हणीय समजले पाहिजेत. जनुभाऊंसारख्या भित्र्या व चोरट्या पापी लोकांपेक्षां मीरबलासारखे रानटी दांडगे वीर कितीतरी श्रेष्ठ ! मीरबलामध्यें जें औदार्य व वीर्य होतें, तें जनुभाऊंमध्यें होतें काय? किंनरीच्या बापाला वांचवावें म्हणून त्यानें किती मोठ्या उदारबुद्धीनें सुचविलें, हें तुम्हीं पाहिलेंतच. त्यानंतर लोक जेव्हां त्याच्या मताची पर्वा न करतां किंनरीच्या बापाला जाळूं लागले, तेव्हां त्यानें लोकांची किंवा प्रत्यक्ष किनतोब्याचीहि प्रतिष्ठा ठेवली नाहीं, हेंहि तुम्हीं पाहिलेंत. आपला प्राण धोक्यांत घालून दुसऱ्याचा प्राण वांचविणारा मनुष्य 'जंगली' कसा म्हणतां येईल ?"

"अगदीं खरें आहे हें!" भाऊसाहेब म्हणाले. "त्याचें वर्तन आपल्या दृष्टीनें किती जरी निंद्य असलें, तरी त्याच्यामध्यें एक प्रकारचें स्पृहणीय वीर्य होतें, यांत शंका नाहीं. तो जर आपल्या जातींत जन्मला व वाढला असता, तर तो असंमजस लोकमताची पर्वा न करणारा, निर्भीड, करारी व उदार असा सामाजिक किंवा राजकीय सुधारक झाला असता ! "

भाऊसाहेबांचें बोलणें संपलें असेलनसेल, इतक्यांत स्नानसंध्या करावयाला गेलेले बोधस्वरूपस्वामी व भय्यासाहेब मठांत परत आले. त्या दोघांकडे पाहिल्यावर नानासाहेब वगैरे मंडळी त्यांच्याकडे टक लावून पाहूं लागली. कोठें तरी या दोघांनां आपण पाहिलें असावें, असें त्यांनां वाटलें; पण कोठें पाहिलें असावें, व हे कोण आहेत, याचा त्यांनां निश्चय होईना ! भय्यासाहेब व बोधस्वरूपस्वामी यांनीं मात्र त्या सर्वांनां पाहिल्याबरोबर ओळखलें, व ते या अकल्पित भेटीमुळें जरासे दचकले.

"काय आनंदराव, तुम्ही कोणीकडे इकडे?" असे शब्द भय्यासाहेबांच्या अगदीं ओंठांशीं आले होते, इतक्यांत नानासाहेब स्वामींकडे पाहून म्हणाले "या स्वामींनां व यांनां (या वेळीं त्यांनीं आपली तीक्ष्ण दृष्टि भय्यासाहेबांकडे लाविली होती ) कोठें तरी पाहिलें आहे आम्हीं. पण नांव, गांव वगैरे कांहीं आठवत नाहीं."

हें ऐकून प्रियब्रह्मस्वामींनीं आनंदगर्भ मंदस्मित केलें, व "चांगली आठवण करून पहा," असें त्यांनीं सर्वांनां सांगितलें.

## प्रत्यक्ष पतीची ओळख पटत नाहीं !

त्या दोघांकडे बारकाईनें पाहून मंडळी आठवण करीत असतां भय्यासाहेबांनीं भाऊसाहेबांकडे पाहून विचारलें "मला ओळखलें नाहीं का?"

"नाहीं." भाऊसाहेब म्हणाले. "तुम्हाला कोठें तरी मीं पुष्कळ वेळ पाहिलेलें आहे. आमच्या भय्यासाहेबांसारखा तुमचा तोंडवळा आहे."

नंतर क्षणभर थांबून, कांहीं आठवल्यासारखें करून ते म्हणाले "छेः! पण भय्यासाहेबांनां सख्खा भाऊ तर नव्हताच. त्यांचे चुलतभाऊ तर नाहीं आपण? पण चुलतभाऊहि त्यांनां नव्हता."

"भय्यासाहेबांचे हे अगदीं जवळचे नातलग आहेत. जवळचे म्हणजे फारच जवळचे–तेच ते म्हणा ना?" प्रियब्रह्मस्वामी हंसत म्हणाले.

"म्हणजे?" सर्वजणांच्या तोंडून एकदम उद्गार निघाला.

"म्हणजे असें, कीं, भय्यासाहेब नदींत बुडून मरण पावले, हा तुमचा समज चुकीचा आहे."

स्वामींचे हे शब्द ऐकून भाऊसाहेबांनां, नानासाहेबांनां, आनंदरावांनां किंवा शास्त्रीबुवांनां काय वाटलें असेल, याचें आतां वर्णन केलेंच पाहिजे, असें नाहीं. गंगेवरील प्रेताच्या बोटांत भय्यासाहेबांची आंगठी कोणीं, केव्हां व कोणत्या उद्देशानें घातली, याचा बोधस्वरूपस्वामींनीं आपल्या तोंडानें परिस्फोट केल्यावर शंकेला विशेष स्थानच उरलें नाहीं; आणि गंगेच्या घांटावर ज्या तरुण संन्याशाला साप चावला, व ज्याला आनंदरावांच्या औषधोपचारानें बरें वाटलें, तो संन्यासी ह्मणजे भय्यासाहेबच; रागिणीला आणि उत्तरेला गंगोत्री येथें आम्रवृक्षावर जो संन्यासी दिसला, व ज्याला भूत समजून त्या पळाल्या, तो संन्यासी भय्यासाहेबच; या गोष्टी कळल्यावर मंडळींनां आश्चर्य अधिक वाटलें, का आनंद अधिक झाला, याचाहि येथें निर्णय करण्याची जरूर नाहीं. तसेंच बोधस्वरूपस्वामींनीं 'मींच यांनां संन्यास घ्यावयाचा उपदेश केला, व प्रेताच्या बोटांत आंगठी घालण्यालाहि मींच यांनां सांगितलें,' असें जेव्हां स्वतः होऊन कबूल केलें, व आपला दृढ हेतु मंडळीपुढें व्यक्त केला, तेव्हां त्या नीच ढोंगी व 'धर्मध्वजी'–परंतु आतां पश्चात्तापदग्ध असलेल्या स्वामींचा त्यांनां अधिक राग आला, किंवा त्यांची त्यांनीं अधिक कींव केली, याचेंहि विवेचन करण्याचें येथें प्रयोजन नाहीं.

भय्यासाहेब हे भय्यासाहेबच, अशी सर्वांची खात्री झाल्यावर भाऊसाहेब त्यांनां ह्मणाले "गंगोत्रीला रागिणीला पाहून देखील तुम्ही निर्दयपणें—"

हें वाक्य त्यांनीं पुरें केलें नाहीं, तरी त्याचा अर्थ भय्यासाहेबांनां कळला, व त्यांनां फार दुःख झालें; तरी दुःख आवरून ते म्हणाले " मी त्या वेळेलाच येणार होतों. परंतु पुनः असा विचार आला, कीं, एवींतेवीं संसार सुटलाच आहे, तर आतां ब्रह्मजिज्ञासा कडेला तरी नेऊन पहावी. या स्वामींची ( येथें त्यांनीं प्रियब्रह्मस्वामींकडे पाहिलें ) मीं बरीच कीर्ति ऐकली होती. तेव्हां यांचें दर्शन घेऊन मोक्षमार्ग सांपडतो कीं काय, हें मला पहायचें होतें. "

" भय्यासाहेब ! " आनंदराव प्रेमगर्भ, पण निर्भर्त्सनात्मक स्वरानें ह्मणाले. "रागिणीला किती दुःख होत होतें, याचा तुह्मीं विचार तरी केला होता का? तिला तुह्मीं वैधव्यदुःखच नव्हे, तर—"

" आनंदराव, मीं मोठी भयंकर चूक केली, हें मी कबूल करतों. "भय्यासाहेब क्षमायाचनात्मक दीन स्वरानें मध्येंच ह्मणाले. परंतु लगेच आपलें थोडेंसें समर्थन करण्याच्या इराद्यानें ते म्हणाले " मी सर्वस्वीं गुन्हेगार आहें. पण माझे हेतु वाईट होते का ? मीं जें केलें, तें सद्बुद्धीनें केलें. मी मूर्ख असेन; पण पापी नाहीं !"

" सद्गृहस्था ! " आनंदराव आपल्या जिवलग स्नेह्याला प्रेमाच्या सलगीनें व किंचित् कोपानें ह्मणाले " असला घोर घातुक मूर्खपणा केल्यावर ' सद्धेतु ' घेऊन काय जाळायचे आहेत ?"

" आनंदराव, भाऊसाहेब, तुमची व या सर्वांची मी क्षमा मागतों. " भय्यासाहेब ह्मणाले. " मी अपराधी आहें; पण माझे अपराध पोटांत घाला. मीं ब्रह्मजिज्ञासेच्या प्रबल प्रेरणेनें ही गोष्ट केली, ही गोष्ट लक्ष्यांत घ्या, आणि मग मला दोष द्या. "

असें ह्मणून भय्यासाहेबांनीं भाऊसाहेबांचे पाय घट्ट धरले, व अश्रूंनीं ते भिजवून टाकले. भय्यासाहेबांच्या अविचाराबद्दल भाऊसाहेबांच्या मनांत जो थोडाबहुत राग होता, तो आतां आनंदाच्या पुरांत कोठच्या कोठें वाहून गेला ! त्यांनीं भय्यासाहेबांनां उठवून जवळ बसावयाला सांगितलें, व ' प्रत्येक मनुष्याच्या हातून चुका होतातच, ' अशा अर्थाचीं वाक्यें उच्चारून त्यांचें समाधान केलें.

## प्रत्यक्ष पतीची ओळख पटत नाहीं !

क्षुब्ध झालेल्या मनोवृत्ति जरा शांत झाल्यावर आनंदराव भय्यासाहेबांनां म्हणाले " बरें, झालें तें झालें. आतां तरी संसार चांगला करायचा आहे ना ? का, अजूनहि तुमची ब्रह्मजिज्ञासा आहेच ? "

" आनंदराव, तुम्हीं असें म्हणावें ना ? ब्रह्मजिज्ञासा बाळगणें म्हणजे पाप का आहे ? एकाद्या मनुष्यानें निःश्रेयस सुखाकडे लक्ष्य देऊन संसारत्याग केल्यास तो पापी होतो काय ? स्त्रीसहवाससुखापेक्षां ज्ञानिजनांची संगति अधिक प्रिय वाटली, तर तो गुन्हा का आहे ? "

" म्हणजे ? अजून तुम्ही हा मार्ग सोडायला तयार नाहीं म्हणायचे ! " आनंदराव म्हणाले.

" हो, थोडेंसें खरेंच आहे हें. आनंदराव, मी या मार्गाचा अंत पाहिल्याशिवाय परत फिरायचा नाहीं."

भय्यासाहेबांचा नाद अद्यापि आहे तसाच आहे, व ते संसार करावयाला आतांहि तयार नाहींत, हा विचार भाऊसाहेबांनां फारच कष्टद व असह्य झाला. त्यांचें डोकें फिरूं लागलें, व घेरी येते, असें त्यांनां वाटूं लागलें.

" भय्यासाहेब, भय्यासाहेब !" भाऊसाहेब करुणस्वरानें म्हणाले " तुम्हाला आपल्या मार्गाचा अंत सांपडण्यापूर्वींच माझा आणि रागिणीचा अंत खास पहायला सांपडेल ! भय्यासाहेब, मी तर म्हातारा व कुचकामाचा झालों आहें; मी जगलों काय नि मेलों काय सारखेंच. पण रागिणीचा कांहीं तरी विचार करा. आत्म्याचा शोध करतांकरतां तिच्या आत्म्याचा नाश कां करतां ? याकरितांच का मीं तिला तुमच्या स्वाधीन केलें ? "

" भाऊसाहेब, मला आतां कांहींएक बोलवत नाहीं. काय बोलावें, हेंच मला सुचत नाहीं. कसें वागावें, याचा तुम्हीच मला आतां उपदेश करा. आत्मज्ञान करून घेणें यासारखें पवित्र व अत्युच्च कर्तव्य नाहीं, असें मला एकदां वाटतें; व पुनः वाटतें, कीं, संसाराची आणि पत्नीची जबाबदारी संभाळणें हें माझें आद्यकर्तव्य आहे. कोणतें कर्तव्य मान्य, महत्तर व श्रेयस्कर, हें तुम्हीच सांगा."

भाऊसाहेब यावर कांहीं बोलले नाहींत. ते भांबावून गेले, व भ्रमिष्टासारखे इकडेतिकडे पाहूं लागले.

मठांतील मधल्या खोलींत हा प्रकार चालला असतां शेजारच्या खोलींत काय चाललें होतें, हें क्षणभर पहाण्यासारखें आहे. रागिणी त्या वेळीं जागी झाली असून ती उत्तरेला हालवून जागी करीत होती.

" ताई, जरा ऊठ. मला भीति वाटते."

" कसली ग भीति ?" उत्तरा अर्धवट झोंपेंतच म्हणाली.

"ताई, मला कांहींच्याबांहीं स्वप्न पडलें आतां; आणि मघांपासून मला तिकडच्यासारखा आवाज ऐकूं येत आहे. अगदीं हुबेहुब तस्सा आवाज !"

हें ऐकून झोंपेनें आकुल झालेली उत्तरा जराशी त्रासिकपणें म्हणाली "अग, असेल स्वप्न कांहीं तरी ! स्वप्नाला काय भितेस ?"

" ताई, स्वप्न नाहीं ग ! खरंच, तसा आवाज नि तसा स्वर ! मूर्ति जणूं काय माझ्या डोळ्यांपुढं उभी आहे !"

"भलतंच कांहींतरी बोलूं नये ! स्वप्नाला भ्यायला तूं आतां लहान का आहेस रागिणी ?"

रागिणीलाहि हें सर्व स्वप्न आहे, असेंच वाटलें, व ती तशीच पडून राहिली, आणि हे विचार मनांतून घालविण्याचा प्रयत्न करूं लागली.

इकडे भय्यासाहेबांनीं केलेल्या कर्तव्यविषयक प्रश्नानें भाऊसाहेबांची झालेली शोचनीय स्थिति पाहून नानासाहेबांनां व आनंदरावांनां फार वाईट वाटलें. परंतु ते तरी अशा प्रसंगीं काय बोलणार ?

नानासाहेब 'कसें बोलावें म्हणजे आपल्या मित्राच्या होरपळलेल्या मनाला समाधान वाटेल,' याचा विचार करीत असतां प्रियब्रह्मस्वामी शांत, गंभीर, प्रेमळ व अधिकारयुक्त वाणीनें भय्यासाहेबांनां म्हणाले " बाळ, तुला आत्मज्ञान पाहिजे ना ? "

" होय. " भय्यासाहेबांनीं उत्तर दिलें.

"मग तूं संसार कर. योग्य रीतीनें गृहस्थाश्रम पाळून संसार केल्यास आत्मज्ञान करून घेण्याची पात्रता येते. ब्रह्मज्ञानाला साधनीभूत असलेले शमदमादि गुण अंगीं बाणल्याशिवाय आत्मज्ञान करून घेण्याला मनुष्य पात्र होत नाहीं, हें तत्त्व तुला ठाऊकच आहे. संसार केल्याशिवाय व त्यांतील अनेक सुखदुःखांचा व मोह-पाशांचा अनुभव घेतल्याशिवाय शम, दम इत्यादि गुण खरे व कायमचे अंगीं बाणणार नाहींत. संसारांतले जे अनेक मोह व विकारहेतु आहेत, त्यांच्या संनिध

राहून त्यांचें जो निवारण करील, व मनोनियमन करील, त्याचेंच मन ब्रह्म-जिज्ञासेला अधिकारी होतें. बाकीच्यांची संसारतापजन्य ब्रह्मजिज्ञासा तापांतील पिपासेसारखी केवळ विकृतिसूचक व अल्पकालीन असते. तेव्हां तुला जर ब्रह्मज्ञानग्रहणाला अधिकारी व्हावयाचें असेल, तर मोहमय व विकारहेतुपरिपूर्ण संसारांत राहून देखील आपलें मन अविकार्य राहिलें आहे असें मला कांहीं वर्षें दाखीव, ह्मणजे मी तुला आपला सच्छिष्य समजून मला जें कांहीं ज्ञान आहे, तें तुला अर्पण करीन."

ज्या गुरूंवर भय्यासाहेबांची अखेरची मदार होती, त्यांनींच असा उपदेश केलेला ऐकून ते जरासे उदास व हताश झाले, व ह्मणाले "स्वामिन्, आपणच जर मला सोडून दिलेंत, तर मला दुसरा कोणाचाच आधार नाहीं! स्वामिन्, ब्रह्मज्ञानाचा मी फार भुकेला आहें."

"नुसती भूक लागून उपयोग काय ? ब्रह्मज्ञान ह्मणजे बोरासारखी किंवा अंब्यासारखी हातानें उचलून देतां येईल अशी वस्तु नाहीं. हें ज्ञान गुरूच्या साहाय्यानें-पण ज्याचें त्यानेंच मिळविलें पाहिजे. ब्रह्मज्ञान हें परप्रत्ययानें प्राप्त होण्यासारखें नाहीं; त्याला स्वानुभवच पाहिजे."

"मलाहि हें स्वानुभवाचें ब्रह्मज्ञानच पाहिजे आहे." भय्यासाहेब मध्येंच ह्मणाले.

"तें खरें; पण ब्रह्मज्ञान ह्मणजे काय, याचा तूं विचार केला आहेस का ? ब्रह्मज्ञान ह्मणजे अखिल विश्वाचें-विराटस्वरूपी परमात्म्याचें-ज्ञान. या विराट्-स्वरूपाचें पूर्ण ज्ञान करून घ्यावयाचें ह्मणजे त्याच्या सर्वांगाचें संपूर्ण ज्ञान झालें पाहिजे. मानवी संसार हें विराट्स्वरूपाचें एक अंग आहे. तेव्हां या अंगाचें समर्पक ज्ञान झाल्याशिवाय ब्रह्मज्ञान कसें प्राप्त होईल ? आतां संसाराचें समर्पक ज्ञान योगाभ्यासानें होईल; नाहीं असें नाहीं.पण याला प्रत्यक्ष अनुभव असलेलाच बरा. संसाराचें खरें मर्म व खरें वर्महि प्रत्यक्ष स्वानुभवाशिवाय कळावयाचें नाहीं, आणि विराटस्वरूपाच्या या महत्त्वाच्या अंगाचें ज्ञान जर चांगलें झालें नाहीं, तर सर्व परमात्मस्वरूपाचें मर्म कसें कळणार ? संसार करून स्वानुभवानें त्याचे गुणदोष, त्यांतील सुखदुःखे,त्याचें महत्त्व, त्याच्या उपकारकत्वाची मर्यादा इत्यादि गोष्टी कळल्यावर त्याविषयीं मग जें वैराग्य प्राप्त होईल, तें खरें वैराग्य! योगाभ्यासाच्या लालसेनें प्राप्त झालेलें वैराग्य विशेष कामाचें नाहीं."

"पण माझें वैराग्य अगदीं खरें व कसाला लागलेलें आहे. मला योगमार्गाची खरोखरच मनापासून फार आवड आहे, हें माझ्या चरित्रावरून दिसत आहे."

"आवड आहे, ह्मणून तो मार्ग योग्य ठरत नाहीं. आपणांला जें जें प्रिय आहे, तें तें करूं लागल्यावर धर्म कोठें राहिला? 'प्रेय' आणि 'श्रेय' हीं दोन भिन्नभिन्न आहेत, हें तत्त्व तूं उपनिषदांत वाचलें आहेस ना?"

"तें खरें; पण मला ज्याची आवड आहे, ती वस्तु श्रेयस्करच आहे. आत्मप्राप्तीपेक्षां अधिक श्रेयस्कर काय असणार? याहून अधिक निःश्रेयस सुख कशांत आहे? मला संसारांतील क्षुद्र सुखें प्रिय नाहींत, तर उच्चतम समाधान पाहिजे आहे. ही जिज्ञासा, ही तळमळ, जर आपण वाईट ह्मणालांत, तर मग आत्मज्ञान हें ध्येयच वाईट समजलें पाहिजे."

"हें ध्येय चांगलें आहे; पण येथें अधिकाराचा व कर्तव्याचा प्रश्न येतो. हल्लींच्या परिस्थितींत तूं ध्येयाचें अनुसरण करण्यास अनेक दृष्टीनें अधिकारी नाहींस. एक तर तुझें वैराग्य तात्पुरतें असण्याचा संभव आहे, व तुझें मन तुझ्या ताब्यांत नाहीं. दुसरें असें, कीं, तुझें सध्यांचें कर्तव्यकर्म निराळें आहे. तूं संसारत्याग करणें हें अकर्म आहे, हा अधर्म आहे."

"अधर्म कसा, हेंच मला समजत नाहीं. आत्मप्राप्ति करून घेणें हा जर 'धर्म' नाहीं, व हें जर माझें कर्तव्य नाहीं, तर धर्म ह्मणजे काय व कर्तव्य ह्मणजे काय?"

"प्रश्न बरोबर विचारलास." स्वामी शांतपणें व धीरगंभीर स्वरानें ह्मणाले. "पण असले धर्मविषयक जे प्रश्न आहेत, त्यांची चर्चा करूं लागल्यावर त्यांनां अनेक शाखा फुटून चर्चा लांबते, व निकालच लावणें कठिण पडतें. तेव्हां आपण सवडीप्रमाणें या प्रश्नाचा विचार करूं. तुझी धर्मजिज्ञासा तीव्र आहे, हें मी जाणून आहें; परंतु या प्रश्नाचें सांगोपांग विवेचन आतां नको आहे. धर्माचें व कर्तव्याचें मुख्य तत्त्व तुला आतां सांगतों, व त्याची सविस्तर चर्चा पुढेंमागें आपण करूंच. बाळा, धर्माचें अंतरंग प्रेम व बहिरंग परोपकार. हृदयांत प्रेमनिर्झर असल्याशिवाय धर्मवृक्ष वाढत नाहीं. धर्मवृक्षाचें जीवन शुद्ध प्रेम, त्याचें फळ पवित्र वीर्यकर्म, व त्याचा अंगभूत सुवास ह्मणजे निःश्रेयस व शांत सुख. परमेश्वरपूजा म्हणजे मूर्तिपूजा, नव्हे, योगासन नव्हे, किंवा तीर्थाटन नव्हे; तर, परोपकारकर्म–पवित्रकर्म–प्रेमकर्म–वीर्यकर्म. धर्माचें बीज प्रेमांत आहे. प्रेम म्हणजे सर्व भूतांविषयीं आत्मभाव. हीच गोष्ट दुसऱ्या तऱ्हेनें

सांगावयाची असल्यास प्रेम म्हणजे स्वाभिमानविस्मृति–स्वार्थत्याग–आत्मयज्ञ असें, म्हणावें. तुला जर आत्मप्राप्ति पाहिजे आहे, तर आत्माभिमान सोड. आत्मयज्ञाशिवाय आत्मप्राप्ति नाहीं. आत्मप्राप्ति ज्ञानानें, विद्वत्तेनें किंवा तपश्चर्येनें होत नसते; तर ती आत्मयज्ञ करण्यानें प्राप्त होते. प्रेमानें प्रेरित होऊन स्वार्थ-त्यागपूर्वक जगांतील दुःख, पाप, अज्ञान वगैरे कमी करणें याचें नांव परोपकार. पवित्र कर्म किंवा वीर्यकर्म, वस्तुतः एकच असून यांचेहि अनेक प्रकार आहेत. परोपकार द्रव्यदानांतच आहे असें नाहीं; वीर्य रणांगणांतच दृष्टोत्पत्तीला येतें असें नाहीं; व पावित्र्य देवपूजेनेंच प्राप्त होतें असेंहि नाहीं. जगांत जें गाढ अज्ञान आहे, जीं हृदयद्रावक दुःखें आहेत, जीं प्राणघातक संकटें आहेत, जीं घोर पापें आहेत, नयनशल्यभूत जी कुरूपता आहे, त्यांपैकीं एकादी तरी अनिष्ट गोष्ट स्वतःला त्रास सोसून जो जगांतून कमी करील, तो आपल्या परीनें व आपल्या मानानें परोपकारी, पवित्राचरणी वीरच आहे. आपल्या इकडील तानाजी मालुसरे याच्यासारखा गृहदारादिकांच्या मोहाला बळी न पडणारा व धारातीर्थी प्राण सोडणारा देशभक्त योद्धा जसा वीर, तसाच अमेरिकेंतील एडिसनसारखा स्त्रीविलासाची वगैरे पर्वा न करणारा व रात्रंदिवस विचार करीत राहून अनेक शास्त्रीय शोध लावणारा कल्पक मनुष्यहि वीरच होय. जो जो मनुष्य स्वाभिमान सोडून व स्वार्थत्याग करून जगांत आहे त्यापेक्षां अधिक सुख, अधिक आनंद, अधिक सौंदर्य, अधिक रमणीयता, अधिक ज्ञान, अधिक पावित्र्य, अधिक तेज, अधिक उदारबुद्धि व अधिक उदात्तता आणील, तो तो आपल्या परीनें वीरच होय. देशांतील अज्ञान दूर करणें, उद्योगधंदे वाढविणें, व्यापार विस्तृत करणें, कलाकौशल्य अधिक रमणीय व आदरणीय करणें, अनेक शोध लावणें व कल्पकता वाढविणें, मनोवृत्तींनां सत्पथ प्रिय वाटूं लागेल असें करणें, सदभिरुचीचें पोषण करणें, देशाभिमान वाढविणें, स्वार्थत्याग शिकविणें, प्रेम पेरणें, हीं सर्व पवित्र कर्मे व वीर्यकर्मेंच आहेत.

"धर्माभिमान किंवा देशाभिमान एकाच स्वरूपांत दिसतो, असें नाहीं. आत्म प्राप्ति एकाच मार्गानें होते, असें समजणें चुकीचें आहे. मार्ग भिन्न असले, तरी सर्व मार्गांच्या मुळाशीं मात्र एकच कल्पना आहे; ती ही, कीं, मनाचें नियमन करा, क्षुद्र अभिमान सोडा, सर्व भूतमात्रांनां आत्मतुल्य समजा, आत्मा प्रेममय करा, व द्वैतभाव सोडून द्या, म्हणजे तुम्हाला खरें आत्मसुख–खरा

ब्रह्मानंद प्राप्त होईल. मातेचें जसें पुत्रावर प्रेम असतें, किंवा पत्नीचें पतीवर प्रेम असतें, तसें आपलें सर्व भूतमात्रांवर–सर्व वसुधेवर–असेल, तेव्हांच जग व आपण भिन्न आहोंत ही भावना–हा द्वैतभाव–नष्ट होईल, व आपण खऱ्या अद्वैतसुखाला पात्र होऊं. हा ब्रह्मानंद ज्याला मिळाला, तो कोणाचा द्वेष करीत नाहीं, त्याला कसली भीति नसते, व त्याला अहंकारजन्य दुःखहि होत नाहीं. या स्थितीला पोहोंचण्याकरितां आपल्या प्रेमाचें क्षेत्र क्रमाक्रमानें वाढवीत जावें; दुसऱ्याच्या दोषांकडे उदार दृष्टीनें आणि प्रेमबुद्धीनें पहावें, व स्वतःविषयींचा क्षुद्र अहंकार सोडीत जावें. लोकांनीं अपकार केला, तरी त्यांच्यावर उपकारच करावा, व त्यांनां क्षमा करून त्यांचा द्वेष करण्याचें सोडून द्यावें. लोकांचा आपण द्वेष कां करतों, व त्यांच्यावर कां रागावतों? याचें कारण आपला 'अहंकार,' दुसरें कांहीं नाहीं. जगांत परोपकार करणें किंवा कर्तव्यकर्म करीत रहाणें हेंच आपलें अवतारकृत्य, असें न समजतां अहंकारानें आपण 'हें माझें गृह,' 'ही माझी भार्या' अशा प्रकारच्या ममत्वानें अंध होतों व असें समजतों, कीं, आपणांला जशीं कर्तव्यकर्मे आहेत, तसे हक्कहि आहेत, व हे हक्क इतरांनीं मान्य व आदरणीय समजावेत. जो आपले हक्क मानीत नाहीं, व जो आपणांला आदर देत नाहीं, त्याला आपण अहंकारानें द्वेष्य समजतों. पण खरी स्थिति अशी आहे, कीं, मनुष्याला केवळ कर्तव्यकर्मे आहेत, हक्क नाहींत! दुसऱ्यानें कसें वागावें, हा त्या दुसऱ्याचा व जगच्चालकाचा प्रश्न आहे, आपला नाहीं. आपण आपलें कर्तव्यकर्म केलें, ह्मणजे आपलें कार्य संपलें. दुसरा वाईट रीतीनें वागला, ह्मणून आपण आपली शांति कां दवडावी, व आपल्या जिवाचा संताप कां करून घ्यावा? आपल्या कर्तव्यकर्मांचा भार काय कमी आहे, तर आपण लोकांच्या कर्तव्यांचा भार आपल्यावरच घ्यावा?"

"पण आपलें कर्तव्यकर्म काय आहे, हें कसें ओळखायचें?" भय्यासाहेबांनीं विचारलें.

"हा प्रश्न बिकट तर खराच; पण 'परोपकार' किंवा 'वीर्य' या शब्दाचें विवरण करतांना याचें उत्तर दिग्दर्शित झालेंच आहे. आपलें जीवितकर्तव्य ह्मणजे आपला आत्मा प्रेममय करून स्वार्थत्यागपूर्वक परोपकार करणें, हें ठरल्यावर आपणांला कोणत्या प्रकारानें इतरांनां सर्वांत अधिक सुख किंवा साहाय्य देतां येईल, व कोणत्या प्रकारानें जगतांतील ज्ञान, प्रेम, रमणीयता,

सदभिरुचि इत्यादि गोष्टी आपणांला वाढवितां येतील, याचा ज्याचा त्यानें आपल्या मनाशीं विचार करावा, आणि मग आपलें शरीरबल, बुद्धिसामर्थ्य, परिस्थिति, स्वाभाविक प्रवृत्ति, आवड इत्यादि गोष्टींचा विचार करून परिस्थितीच्या आनुकूल्याप्रमाणें, आपल्या मगदुराप्रमाणें व आवडीप्रमाणें आपलें कर्तव्यकर्म ठरवावें, आणि त्यापासून रतिमात्रहि ढळूं नये !"

प्रियब्रह्मस्वामींचा वरील उपदेश भय्यासाहेबच नव्हे, तर नानासाहेब वगैरे मंडळीहि अगदीं लक्ष्य देऊन आदरपूर्वक ऐकत होती. नानासाहेब सुधारक असूनहि त्यांनां या स्वामींबद्दल आतां पूर्वींपेक्षां अधिक आदर वाटूं लागला, व अधिकारी पुरुषाच्या या उपदेशामुळें भय्यासाहेब ताळ्यावर येतील, अशी त्यांनां आशा वाटूं लागली. भाऊसाहेबांनां मात्र अशा प्रकारची आशा वाटली नाहीं. स्वामींचें वक्तृत्वपूर्ण भाषण चाललें असतां ते आपलें औदासीन्य कांहीं वेळ विसरले, ही गोष्ट खरी; पण भाषण संपल्यावर ते अधिकच उदास, निराश व मलूल झाले.

त्यांची ती अवस्था स्वामींच्या लक्ष्यांत आलीच; व त्यांच्या दुःखाचें खरें कारण जरी त्यांनां ठाऊक होतें, तरी भाऊसाहेबांचें मन बाह्य उपायांनीं शक्य तेवढें रंजवण्याकरितां ते ह्मणाले " भाऊसाहेब, तुह्मी दमलेले दिसतां. गूळपाणी कांहीं पाहिजे का ? "

हे शब्द त्यांनीं इतक्या अंतःकरणपूर्वक व प्रेमळतेनें उच्चारले, कीं, भाऊसाहेबांनीं कांहींएक अनमान न करतां थंडगार पाणी पिण्याची आपली इच्छा दर्शविली. लगेच स्वामींनीं एका शिष्याला हांक मारून त्याच्याकडून गूळ व थंडगार पाणी आणविलें. पाणी प्याल्यावर भाऊसाहेबांनां जरासें बरें वाटलें, व त्यांची वृत्ति जराशी उल्लसित होऊन स्वामींनां ते स्मितपूर्वक ह्मणाले " हें गुहेंतलें गार पाणी गोड खरें; पण याहूनहि स्वामींचें बोधामृत मला अधिक गोड वाटतें. आपण इतका वेळ जें बोललां, त्यावरून एकदोन शंका आल्या आहेत, त्या आपणाला आतां विचारतों. आम्ही इंग्रजी शिकलेले लोक नेहमीं कांहीं ना कांहीं तरी शंका काढायचे, हें आपणाला ठाऊक आहेच."

" प्रश्न विचारायला हरकत नाहीं." स्वामी शांतपणें व प्रेमळ स्वरानें म्हणाले. "पण आज तात्त्विक चर्चेचा प्रसंग नाहीं. तुमचे हे जामात आपलें कर्तव्यकर्म सोडून योगाच्या नादीं--"

" 'कर्तव्यकर्म सोडून' नाहीं." भय्यासाहेब मध्येंच ह्मणाले. "" मला तें कर्तव्यकर्मच वाटतें."

" रागिणीला सोडून या योगाभ्यासाच्या नादीं लागणें आपलें कर्तव्यकर्म आहे, असें तुह्माला अद्यापि वाटतें काय ? रागिणीला मोहांत पाडणें, श्वशुराला दुःखांत लोटणें आणि मित्रमंडळींनां या दोघांचें दुःख पहायला लावणें, या गोष्टींनीं स्वतःची, त्यांची किंवा देशाची कोणती सेवा तूं केलीस ? कोणाला अधिक आनंद दिलास ? कोणतें वीर्यकर्म केलेंस ? कोणाची नीतिमत्ता वाढविलीस ? प्रेमबुद्धीचा कितीसा परिपोष केलास ? कोणाचें अज्ञान दूर केलेंस ?"

" स्वामिन् ! आपण ह्मणतां तें सर्व मला ठाऊक आहे. पण मला योगमार्गाची फार आवड आहे. आपण दीक्षा देऊन--"

" ही आवड चुकीची आहे. तूं आपलें कर्तव्यकर्म सोडून देत असल्यामुळें तुला मी दीक्षा देऊं शकणार नाहीं. माझें ऐकायचें असलें, तर तूं पत्नीसमवेत गृहस्थाश्रमांत रहा, आणि मग योग्य कालीं तुह्मीं दोघेंजणहि वानप्रस्थाश्रम स्वीकारा."

हें ऐकून भय्यासाहेब आनंदरावांकडे वळून त्यांनां ह्मणाले " आनंदराव, तुह्मी सर्वच लोक माझ्याविरुद्ध आहांत, तेव्हां माझ्याच विचारांत चूक आहे, हें कबूल केलें पाहिजे. वाटेंत मला एक थिऑसॉफिस्ट साधु भेटले होते, तेहि या मार्गाच्या विरुद्ध होते. ते ह्मणाले, कीं, ' संसाराला भिऊन व कर्तव्यकर्म बाजूला ठेवून संसार सोडून देणें हें थिऑसॉफीच्या तत्त्वाविरुद्ध आहे. आपले प्रियब्रह्मस्वामी हेहि माझ्या विरुद्धच. तेव्हां मी आपली चूक पदरांत घेतों. चूक झाली ती झाली, आतां तुह्मीं सर्वांनीं मला क्षमा करावी, एवढीच माझी विनंति आहे."

यानंतर त्या पुरुषमंडळींत जें कांहीं भाषण झालें, त्याचें वर्णन करण्यापूर्वी शेजारच्या खोलींत काय प्रकार झाला होता, हें पहाणें जरूर आहे.

रागिणीला भय्यासाहेबांच्यासारखा आवाज ऐकूं आल्यामुळें तिला कसेंसेंच वाटूं लागलें, व तिनें उत्तरेला जागी करण्याचा प्रयत्न केला, हें मागें आलेंच आहे. " स्वप्न आहे सारं !" असें म्हणून उत्तरेनें तिला स्वस्थ निजावयाला सांगितलें, हेंहि वाचकांनां स्मरत असेलच. उत्तरा झोंप घेण्याला पुष्कळ सांगेल, पण झोंप आली पाहिजेना ? भय्यासाहेबांचे शब्द पुनः रागिणीच्या कानावर

पडले, व तिला वेड्यासारखें झालें. 'मी खरोखरच स्वप्नांत आहें कीं काय?' अशी तिला पुनः शंका आली, व जागृतावस्थेची खात्री करून घेण्याकरितां तिनें अंगाला चिमटे घेऊन पाहिले.

" होय, मी जागीच आहें." ती मनांत ह्मणाली. " आणि हे शब्द तर तिकडच्यासारखेच आहेत ! ही भूतचेष्टा तर नाहीं ना? देवा, तूं माझी सदा कां विडंबना करीत असतोस ?"

अशा रीतीचे विचार मनांत येऊन रागिणी घाबरून गेली, व " ताई, ऊठ, मला भीति वाटते," असें दोनतीनदां ह्मणून व अंग हलवून तिनें उत्तरेला जागं केलें, व भीतीचें कारण सांगितलें.

" कांहीं नाहीं ग, स्वप्नांतला भ्रम आहे, त्याला काय भितेस?" उत्तरा पुनः पूर्वीप्रमाणें त्रासिकपणें ह्मणाली. " स्वप्न आहे सगळं ! नीज स्वस्थपणं. भय्यासाहेबांचा कुठला आवाज नि काय ?"

" नीट ऐक तर खरी ! " रागिणी ह्मणाली. " मला तर स्पष्ट आवाज ऐकूं येतो आहे. मला स्वप्न कोणतं नि नाहीं कोणतं, एवढं का समजत नाहीं? ताई, ऊठ. आईसाहेब, उठा-उठा. कांहीं तरी भूतचेष्टा आहे, नाहीं तर मला वेड लागलं आहे."

असें ह्मणून ती बसली राहिली, व उत्तरा आणि ती बाहेर कोण आहे तें पाहूं लागल्या. पाहूं लागतांक्षणींच ऋषिशिष्यवेषधारी भय्यासाहेब तिच्या दृष्टीला पडले, व ती यामुळें अतिशयच भांबावून व घाबरून गेली, आणि " आई, ताई, आईसाहेब, भूत-भूत ! गंगोत्रीला पाहिलेलं पूर्वीचंच भूत हें !" असें असंबद्ध कांहीं तरी ओरडूं लागली.

रागिणीची शरीरयष्टि कांपूं लागली, व आईसाहेबांनां तिनें घट्ट मिठी मारली; परंतु अखेर ती बेशुद्ध पडलीच.

प्रियब्रह्मस्वामी, भाऊसाहेब वगैरे मंडळी लगेच धांवली, व त्यांनीं डोकीवर पाणी वगैरे शिंपडून तिला लवकरच सावध केलें. अर्धवट सावध झाल्यावर भाऊसाहेब तिला ह्मणाले " रागिणी, घाबरतेस काय अशी? हे खरोखरच भय्यासाहेब आहेत. ते निवर्तल्याची बातमी अगदीं खोटी !"

रागिणी कांहींच बोलली नाहीं.

" अग रागिणी, खरेंच हे भय्यासाहेब ! " नानासाहेब ह्मणाले. " त्यांचें तें आत्महत्येचें पत्र वगैरे सगळें खोटें !"

" मी तुझ्यापुढें प्रत्यक्ष उभा असून मला तूं ओळखत नाहींस ?" भय्यासाहेब गर्हिवर येऊन आपल्या प्रियपत्नीला ह्मणाले.

" कोण तुह्मी ?" रागिणी ह्मणाली. " पातिव्रत्यभंग करण्याकरितां इंद्राप्रमाणं खोटा वेष घेऊन तुह्मी आलां आहां ! मीं तुह्मांला आतां पुरतेपणीं ओळखलं. "

या वेळीं रागिणी शुद्धींतच नव्हती, असें ह्मटलें पाहिजे. जर शुद्धींत असती, तर अशी भाषा तिच्या तोंडून निघालीच नसती.

आनंदरावांनीं पुनः पाणी शिंपडल्यावर रागिणी चांगली सावध झाल्यासारखी दिसली.

" रागिणी !" भय्यासाहेब तिला आतां ह्मणाले "सावध हो. अशी घाबरून जाऊं नकोस. मी इंद्र नाहीं, भूत नाहीं, संमंध नाहीं, किंवा तोतया नाहीं. मीं आपल्या सहीचें पत्र लिहिलें तें खोटें. मीं गंगेंत मुळींच जीव दिला नाहीं. गंगोत्रीला अंब्याच्या झाडावर जो संन्यासी तुला नि उत्तराताईला दिसला, तो मीच. तुझा भय्यासाहेब–तुझा घोर अपराध केलेला तुझा प्रिय भय्यासाहेब तो मीच ! "

तरीहि रागिणी कांहींच बोलेना ! भांबावल्यासारखे डोळे करून ती इकडे-तिकडे पाहूं लागली. पण तेथील सर्व बायकापुरुषांनीं आपापल्या परीनें वस्तु-स्थितीचा तिला बोध करून देण्याचा प्रयत्न केल्यावर तिच्या डोक्यांत कांहीं वेळानें प्रकाश पडला. परंतु तिची खात्री होईना. हें सर्व स्वप्न आहे, हा कांहीं तरी भ्रम आहे, ही कांहीं तरी माया आहे, अशी तिला उगाच भीति वाटत होती, व ती भीति तिच्या मनांतून कांहीं केल्या जाईना. ' या गोष्टी खऱ्या असण्या-इतकं माझं भाग्य चांगलं कुठलं असायला ?' अशी त्या बिचारीच्या मनांत शंका येई.

बराच वेळ गेल्यावर भय्यासाहेब अखेरचा उपाय ह्मणून तिला ह्मणाले " रागिणी, तुझी अजून खात्री होत नाहीं ना ? मी तुझ्यापुढें प्रत्यक्ष उभा असतां, तूं जर मला मानीत नाहींस, तर तुझी आतां खात्री कशी करायची ? आपल्या गुह्य गोष्टी तुला सांगितल्या, ह्मणजे मग तर तुला माझी ओळख पटेल ना ? गोष्टी इथें उघड बोलूं नयेत, पण मला दुसरा उपाय दिसत नाहीं.

रागिणी, आपलें लग्न झाल्यावर एक दिवस रात्रीं दहा वाजण्याच्या सुमाराला मला पाणी पिण्याची इच्छा झाली होती, आणि त्याच वेळीं तूं तांब्या घेऊन खोलींत आलेली पाहून मीं म्हटलें 'कशी नेमकी आलीस ? मला आतांच पाणी पिण्याची इच्छा झाली होती !' मीं असें म्हटल्यावर माझ्या थिऑसॉफीच्या नादाची विनोदबुद्धीनें चेष्टा करण्याच्या हेतूनें तूं काय म्हणाली होतीस, हें तुला आठवतें आहे का ? 'थिऑसॉफीमध्यें विचारसंक्रान्तीचें तत्त्व आहे ना, त्या तत्त्वा-प्रमाणंच मला आपल्या मनांतील गोष्ट कळली,' असें म्हणून तूं माझ्या थिऑसॉफीची थट्टा उडवलीस, हें तुला आठवत नाहीं का ? आणि माझी थिऑसॉफीवर बेसुमार भक्ति असल्यामुळें तुझी मस्करी मला कशी खपली नाहीं, आणि मी मग तुला रागानें कसे भलतेभलते शब्द बोललों, हें सर्व तूं विसरलीस का ? नंतर तूं जेव्हां मुळुमुळू रडूं लागलीस, तेव्हां मला पश्चात्ताप होऊन तुझें सांत्वन मी कसें करूं लागलों, याची तुला आठवण आहे का ? आदल्याच दिवशीं आपण पाहिलेल्या नाटकांतील नायक आपल्या रुसलेल्या पत्नीची जी मनधरणी करीत होता, तिची विनोदानें नक्कल करून मी तुझें कसें सांत्वन करूं पाहत होतों, हें तूं विसरलीस नसशील. त्या वेळीं मीं संस्कृत नाटकांतल्या नायकांप्रमाणें तुझ्या सौंदर्याचें काव्यात्मक कल्पनांनीं बरेंच वर्णन केलें, तरी तुझा रुसवा गेला नाहीं. तूं कोपानें डोळे लाल करून व मौन धरून आपल्या स्वरूपाचें वर्णन स्वस्थपणें ऐकत होतीस. पण केशपाशनयनादिकांचें वर्णन करून तुझ्या कपोलापर्यंत जेव्हां मी येऊन पोहोंचलों, व तुझ्या कपोलांनां खरोखरच येऊन भिडलों, आणि 'ही गुलाबी लाली तुला कां व कशी प्राप्त झाली ?' असें जेव्हां तुला काव्यबुद्धीनें विचारलें, तेव्हां तूं काय उत्तर दिलेंस, याची तुला आठवण आहे का ? 'आपल्या रक्त ओष्ठांचा वारंवार स्पर्श होत असल्यामुळेंच ते लाल झाले आहेत,' असें तूं उत्तर दिलेंस, आणि रुसवा सोडून दिल्याचें खुबीनें दर्शविलेंस, हें सर्व तूं विसरलीस काय ? रागिणी, या गोष्टी मी इथें बोलूं नयेत. पण तुला माझी ओळख पटत नाहीं, तेव्हां मी तरी काय करूं ?"

"म्हणून या असल्या गोष्टी का इथं कोणी बोलतं ?" रागिणी कृतक कोपानें म्हणाली, व इतक्या मधुर रीतीनें लाजली, कीं, तिच्या मनांतून आतां सर्व किंतु निघून गेला, ही गोष्ट प्रत्यक्ष शब्दांशिवाय सर्वांनां कळून चुकली, व अर्धाएक मिनिट कोणी कांहींच बोललें नाहीं.

नंतर आईसाहेब ह्मणाल्या "भय्यासाहेब, ब्रह्मजिज्ञासा तीव्र झाली, ह्मणून मेल्याचं सोंग तुह्माला कसं घेववलं? रागिणीला त्यानं किती दुःख होईल याचा कांहीं तरी विचार करायचा होता!"

"माझ्यावर खरं प्रेम असेल, तर ना माझ्या दुःखाची पर्वा?" रागिणी पुनः कृतककोपात्मक उपरोधिक स्वरानें—पण जराशी लाजून व मधुरस्मित करून ह्मणाली.

"थिऑसॉफीचें काय, किंवा दुसरें कसलें काय, फाजील वेड लागलें, कीं, अशी स्थिति व्हायचीच!" आनंदराव ह्मणाले.

ही निर्भर्त्सना ऐकून भय्यासाहेब ह्मणाले "आईसाहेब, रागिणीसारखी मूर्तिमंत पवित्र गंगा जवळ असतांना ती टाकून देऊन मी मृगतृष्णिकेच्या पाठीला लागलों, याबद्दल मला क्षमा करा! आनंदराव, दैववशात् मोहांध झाल्यामुळें मोठमोठ्या मनुष्यांच्या हातून सुद्धां कधींकधीं माझ्यासारखे प्रमाद घडतात हें ध्यानांत घ्या, आणि माझी कुचेष्टा करूं नका. शापमोहान्ध झालेल्या दुष्यन्तानें शकुन्तलेचा असाच त्याग केला नाहीं का? आणि भरसभेंत तिची बेअब्रू केली नाहीं का? संमोह प्राप्त झाला असतां फुलांची माळ सुद्धां सर्पाप्रमाणें वाटते, असें कालिदासानें ह्मटलें आहे, हें तुह्माला आठवतें ना? दुष्यन्ताला दुर्वासऋषीच्या शापप्रभावामुळें शकुन्तलेची जशी काहीं काळ विस्मृति झाली, तशी मलाहि कोणाच्या तरी शापामुळें—"

"तुमच्या थिऑसॉफीचाच तुह्माला शाप होता!" उत्तरा भय्यासाहेबांचें वाक्य पुरें होण्यापूर्वीच ह्मणाली. "मी पहिल्यापासून तुह्माला सांगत होतें, कीं, या थिऑसॉफीच्या नादानं तुमचं मोठं नुकसान होईल? पण त्या वेळेला तुह्मीं माझं नाहीं ऐकलंत!"

यावर भय्यासाहेब कांहींच बोलले नाहींत. त्यांचे मित्र आनंदराव यांनीं त्यांचा आतां कड घेतला. ते ह्मणाले "थिऑसॉफीला उगाच कां दोष देतां? संसार सोडण्याला थिऑसॉफी मुळींच सांगत नाहीं. भय्यासाहेबांनीं थिऑसॉफीचा भलताच अर्थ केला, तर तो दोष त्यांचा आहे!"

"कोणाचा कां असेना दोष! शेवट तर गोड झालाना!'" शास्त्रीबुवा ह्मणाले. "जगाचें नाटक असेंच नेहमीं आनंदपर्यवसायी असतें."

## प्रत्यक्ष पतीची ओळख पटत नाहीं !

"तें कोणाला ठाऊक ह्मणा!" आनंदराव स्मितपूर्वक ह्मणाले. "या अंकापर्यंत तरी आपलें हें नाटक आनंदपर्यवसायी आहे, एवढी गोष्ट खरी. पुढचे अंक कसे असतील, याचें उत्तर कोण देऊं शकेल !"

"याचें उत्तर देण्याची जरूर तरी काय आहे पण ?" प्रियब्रह्मस्वामी आपल्या प्रेमळ, आनंदी, गंभीर वाणीनें ह्मणाले. "जीवित आनंदांत जाणार का दुःखांत, हा प्रश्न अगदींच गौण नाहीं का ? कर्तव्यकर्म आपण करतों कीं नाहीं, आपलें ज्ञान व सौजन्य वृद्धिंगत होत चाललें आहे किंवा नाहीं, हाच मुख्य प्रश्न आहे. पण आतां ही तरुण मंडळी माझ्या तत्त्वज्ञानाला कंटाळली असेल. तेव्हां हा विषयच सोडला पाहिजे. काय नानासाहेब ? या उत्तरेचा आणि आनंदरावांचा विवाह केव्हां उरकून घ्यायचा ?"

" आपण सांगाल त्या मुहूर्तावर !"

## प्रकरण पंचविसावें.

## रसास्वाद.

भय्यासाहेब व रागिणी या पतिपत्नींची अनेक वर्षांनंतर व अनेक संकटांनंतर गांठ पडल्यामुळें सर्व मंडळीला झालेल्या आनंदापुढें आनंदराव व उत्तरा यांच्या वाङ्निश्चित विवाहाचा प्रश्नच मंडळींच्या स्मृतींतून त्या वेळीं गेला होता; परंतु प्रियब्रह्मस्वामींनीं या गोष्टीची त्यांनां आठवण देऊन विवाह आजच्या-आज सुमुहूर्तानें आनंदमठांतच उरकून घ्यावा, असें सुचविलें.

हा विचार सर्वांनां मान्य झाला. हिमालयांतील एका शिखरावर झालेल्या या विवाहांत आपल्या इकडील शहरांतल्या लग्नांप्रमाणें शेवती, वाङ्निश्चय, उष्टीहळद, व्याहीभोजनें, रासनहाणीं, तासेवाजंत्री, बँड, वरात इत्यादि गोष्टी नसल्या, तरी प्रियब्रह्मस्वामी यांच्यासारख्या उपाध्यायांनीं आश्रमाग्नीसमोर चालविलेल्या या सौजन्यमंडित, प्रेमबद्ध व तुल्यगुण वधूवरांच्या विवाहाचें पावित्र्य व त्याची योग्यता भाडोत्री उपाध्यायांनीं चालविलेल्या आणि बँड-बाजांनीं गाजविलेल्या बाहुल्याबाहुल्यांच्या लग्नांनां येईल काय ? असो.

सर्वथा अनुरूप असलेल्या व आपल्या कन्येलाहि प्रिय असलेल्या पतीशीं विवाह झालेला पाहून तिच्या मातापित्यांनां—विशेषतः मातेला—जो आनंद झाला, त्याचें वर्णन कसें करावें, हेंच समजत नाहीं ! कसेंहि वर्णन केलें, तरी तें झालेल्या आनंदाच्या मानानें अपर्याप्तच होणार; तेव्हां हा नाद सोडून दिलेलाच बरा !

प्रियब्रह्मस्वामींनीं विवाहोत्सवाकरितां आपल्या विविक्त आश्रमांत जेवढी शक्य होती, तेवढी अधिकोत्तर पाकनिष्पत्ति करवली, व भोजनानंतर मंडळींनां शिष्यांनीं वेंचून आणलेल्या सुवासिक पुष्पांचा हार देऊन आपल्या इकडे न मिळणारीं अशीं हिमगिरीवरील अमृततुल्य व मधुर वन्यफलें खावयाला दिलीं. त्यानंतर दोघां गायनपटु शिष्यांचीं कांहीं भक्तिरसप्रधान पद्यें त्यांनीं मंडळींनां ऐकविलीं. गायनश्रवणानंतर त्या मंडळीचें अनेक विषयांवर बरेंच संभाषण झालें. कांहीं शास्त्रचर्चा झाली, व प्रेमाचा बराच वादविवाद वगैरे झाला. तो समय, तें स्थान, त्या वेळची सर्व मंडळीची वृत्ति, इत्यादि सर्वच गोष्टी प्रेम—संभाषणाला, विविध चर्चेला, विनोदाला, वगैरे अनुकूलच होत्या.

योजिलेलें निरपेक्ष सत्कार्य सिद्धीला गेलेलें पाहून समाधान पावलेले प्रिय-ब्रह्मस्वामी, कन्याविवाहानें आनंदित झालेले नानासाहेब, रागिणीवरील दुःख-पटल निघून गेल्यामुळें औदासीन्य नष्ट झालेले व उत्साह पावलेले भाऊसाहेब, प्रिय मित्रांनां व मित्रांच्या अपत्यांनां आनंदित पाहून उल्लसित झालेले शास्त्रीबुवा, प्रियपत्नीत्यागाचें हृदयशल्य निघाल्यामुळें प्रसन्नचित्त झालेले भय्यासाहेब, प्रियपतीचा इतक्या दिवसांनंतर व संकटांनंतर समागम झाल्यामुळें आणि प्रियसखीच्या सकलानंददायक विवाहामुळें निरतिशय सुख पावलेली रागिणी, कारिसेन देशाच्या भाषेविषयीं, धर्माविषयीं, चालीरीतीं-विषयीं वगैरे आपला ग्रंथ लिहून तयार झाल्यावर आपली व अप्रत्यक्षपणें स्वदेशाची सत्कीर्ति वाढणार, या विचारानें आत्मसंतुष्ट झालेले आणि बाल्या-पासून प्रिय असलेल्या उत्तरेशीं विवाह झाल्यामुळें हर्षोत्फुल्ल झालेले आनंदराव, स्वतःला अत्यन्त आदरणीय व प्रिय असलेल्या आनंदरावांचें अर्धांगीपद प्राप्त झाल्यामुळें साहजिकपणेंच आनंदरसमय झालेली उत्तरा, या सर्व आनंदितचित्त, प्रेमबद्ध व सुविनीत मंडळीमध्यें जें अमृतरसस्रावासारखें मधुर संभाषण झालें, त्यांची विविधविषयांवर जी सुसंस्कृत व रसपूर्ण चर्चा झाली, त्यांच्यामध्यें मधुनमधून घनगर्जनेप्रमाणें कडाक्याचा जो प्रेमाचा वादविवाद झाला, त्या प्रसंगीं जो द्वेष-विषरहित, सुविनीत, विमल, कोमल विनोद बालसूर्यप्रमाणें उदित झाला, ज्या हास्यरसात्मक कोट्या सहजस्फूर्तीनें विद्युल्लतांप्रमाणें चमकल्या, त्या सर्व गोष्टींचें विस्तृत वर्णन, न करतां त्यांचा केवळ नामनिर्देश करूनच मला आपलें समाधान करून घेणें भाग आहे. या संभाषणांत, विवादांत वगैरे जुन्या काळच्या साध्याभोळ्या आईसाहेबांचें विशेष अंग नव्हतें. असले वाद-विवाद त्यांनां बहुधा चमत्कारिक व निरर्थक वाटत—पांखरांच्या किलबिलाटा-प्रमाणें त्रासदायकच वाटत, असें म्हटलें तरी चालेल. तथापि किलबिल करणाऱ्या व मनसोक्त भ्रमण करणाऱ्या पांखरांनां आश्रय देणाऱ्या नदी-कांठच्या वृद्ध वृक्षाप्रमाणें आईसाहेब या संभाषणरूपी अमृतस्रावाचा व विनोद-रूपी बालकिरणांचा तटस्थपणेंच—पण मूक संतोषानें डुलतडुलत आस्वाद घेत होत्या. मधुनमधून होणाऱ्या विवादाच्या घनगर्जनेमुळें त्यांनां किंचित् कंप झाल्यासारखें होई, हें खरें; परंतु एकंदरींत पहातां कन्येच्या विवाहामुळें खुषींत असलेल्या आईसाहेबांनां त्या दिवशीं तो कडाक्याचा वादविवाद व

उत्तरेचीं तीं उद्धट भासणारीं उत्तरें, हीं सुद्धां बरींच सुखकर झालीं. टिल्लू आणि किंनरी हीं त्या वेळीं तेथें जवळच–पण एका बाजूला बसून स्त्रियां-करितां गजरे व पुरुषांकरितां हारतुरे करीत होतीं, व आपल्या परीनें मूकप्राय आनंदोपभोग घेत होतीं.

गप्पागोष्टी सांगतांसांगतां सुमारें पांच वाजले. तेव्हां प्रियब्रह्मस्वामी ह्मणाले " सूर्यास्त होण्याची वेळ आली, तेव्हां आतां मी कांहीं वेळ एकांतांत जाऊन नित्यक्रमाप्रमाणें आत्मचिंतन करीत बसतों. तुह्मांलासुद्धां कंटाळा आला असेलच. या वेळीं आपण सर्वजण फिरायला बाहेर पडलां, तर दुसरी-कडे पहायला न मिळण्यासारखी अप्रतिम वनश्री तुम्हांला येथें पहायला सांपडेल."

" पण आम्हांला वाट कोठें ठाऊक आहे ? " आनंदराव ह्मणाले.

" भय्यासाहेब दाखवतील वाट. त्यांनां आतां इथल्या वाटा थोड्याबहुत ठाऊक झाल्या आहेत."

"मी नाहीं येत बुवा फिरायला." शास्त्रीबुवा ह्मणाले. " माझे लागले आहेत पाय दुखायला कालच्या चालण्यानें ! "

" मी पण नाहीं येत." नानासाहेब म्हणाले.

आईसाहेबांनां आधींच फिरण्याची हौस नव्हती, आणि त्यांतून त्या दमल्याभागलेल्या, तेव्हां त्याहि फिरावयाला जाण्याच्या विरुद्ध होत्या. भाऊ-साहेबांनांहि त्या वेळीं विश्रान्ति पाहिजे होती. तेव्हां फिरावयाला तयार असलेलीं अशीं माणसें ह्मणजे भय्यासाहेब, आनंदराव, उत्तरा आणि रागिणी हींच होत. या दोन तरुण जोडप्यांनांच बाहेर सहल करावयाला जाण्याची उत्सुकता होती. पण वडील मनुष्य कोणी बरोबर येत नसल्यामुळें त्यांनींहि फिरावयाला जाण्याचें विनयानें बाह्यतः तरी नाकारलें. प्रिजयनसंगतींत वनश्री पहावयाला या चौघांपैकीं प्रत्येकजण उत्सुक आहे, हें अर्थात् विशेष लपण्या-सारखें नव्हतें. प्रियब्रह्मस्वामींच्या प्रेमसूक्ष्मदृष्टीला तर ही गोष्ट अगदीं उघड-उघड स्पष्ट दिसत होती. त्यांनीं या चौघांनां वनशोभा पहावयाला जाण्याचा आग्रह केला, व सुविनीततेमुळें प्रिय असलेली गोष्टहि करावयाला लाजत असलेल्या त्या चौघांनां तत्प्रिय गोष्ट जणूं काय आग्रहास्तव करावयाला

लावून ते आपल्या गुहेंत शांतपणें मनन करण्याकरितां आणि नंतर समाधि लावण्याकरतां गेले.

हीं दोन तरुण जोडपीं एकमेकांच्या बरोबर फिरावयाला ह्मणून बाहेर पडलीं. परंतु भय्यासाहेब पुष्कळ दिवसांनंतर भेटलेल्या रागिणीशीं एकान्तांत बोलावयाला फार उत्सुक होते, व आनंदरावहि आपल्या नवोढा प्रौढ पत्नीशीं विश्रंभालाप करावयाला तेवढेच उत्सुक होते. या दोन युगलांनां एकमेकांची स्निग्ध संगति एरव्हीं अत्यंत प्रिय होती; परंतु ती या वेळीं त्यांनां अप्रिय झाली. परंतु बरोबरच निघून भिन्न मार्गांनीं जाणें वाईट दिसलें असतें, ह्मणून तीं बराच वेळ गप्पागोष्टी सांगत चाललीं.

चालतांचालतां अखेर एके ठिकाणीं दोन रस्ते दृष्टीला पडले, तेव्हां आनंदरावांनीं भय्यासाहेबांनां विचारलें "इकडून जायचें का तिकडून ?"

"कुणीकडूनहि चला." भय्यासाहेब ह्मणाले.

"मग या डाव्या हाताच्या बाजूनें चला जाऊं." उत्तरा ह्मणाली. "तें टोंक दिसतं आहे तें, तिथं जाऊन तिकडच्या बाजूची शोभा पहात बसूं चला."

"शोभाच जर पहायची असेल, तर या उजव्या बाजूनें चला." भय्यासाहेब ह्मणाले. "मीं दोन्ही रस्ते पाहिलेले आहेत. उजव्या रस्त्यानेंच सृष्टि-सौंदर्य चांगलें दृष्टीला पडेल."

"मग इकडूनच चला जाऊं." रागिणी ह्मणाली.

कोणीकडून जावयाचें, या वादाला आतां सुरुवात झाली. अखेर उत्तरेचा विशेष आग्रह पाहून रागिणी व भय्यासाहेब डावीकडच्याच रस्त्यानें जाण्याला तयार झालीं; परंतु आनंदराव म्हणाले "हिचा तरी एवढा कां म्हणून आग्रह ? उजवीकडूनच चला जाऊं."

"असें भांडण्यापेक्षां मी दुसरीच एक तडजोड सुचवतों." भय्यासाहेब हंसतहंसत म्हणाले. "तडजोड अशी, कीं, तुह्मी दोघेंजणें तिकडून जा, आणि आह्मी इकडून जातों !"

झालें. ही तडजोड अर्थातच सर्वांनां पसंत पडली, व त्या जोडप्यांचे मार्ग फुटले.

भय्यासाहेबांनां रागिणीशीं एकान्तांत बोलावयाला फुरसत सांपडल्यावर त्यांनीं बोधस्वरूपस्वामींच्या लुच्चेगिरीची रागिणीला पुनः हकीकत सांगितली, व

' मेलों आहें,' अशी बतावणी करण्याचा मोह आपणांला कसा झाला, व तसें करण्यांत आपले कोणते हेतु होते, हें सर्व तिला पुनः प्रत्यक्षपणें समजावून सांगितलें.

आपल्या कठोर कृत्याचें शक्य तेवढें समर्थन करून झाल्यावर ते पश्चात्ताप-पूर्ण स्वरानें ह्मणाले " किती जरी माझ्या वर्तनाचें मीं समर्थन केलें, तरी मीं तुझा घोर अपराध केला आहे. रागिणी, मीं तुला व्यर्थ छळलें, मला क्षमा कर." असें ह्मणून भय्यासाहेबांनीं दुःखाचा मोठा सुस्कारा टाकला, व त्यांच्या डोळयांत अश्रुबिंदु आले.

हें पाहून रागिणी त्यांनां कोमल, प्रेमळ, किंचित् दुःखाकुल परंतु सांत्वन-पर स्वरानें ह्मणाली " माझ्या नशिबीं दुःख होतं, त्याला कोण काय करणार ? आपणाला दोष लावून घेऊं नये. मीं तरी कमी का दुःख दिलं आहे ?"

रागिणीनें अशा रीतीनें त्यांचें सांत्वन करण्याचा प्रयत्न केला; परंतु तिला त्याच्यांत विशेष यश आलें नाहीं.

" तूं कसलें मला दुःख दिलें आहेस ?" भय्यासाहेब ह्मणाले. "तूं मला कधींच दुःख दिलें नाहींस."

" मला सोडून जातांना दुःख मुळींच झालं नाहीं ह्मणायचं मग ?" रागिणी किंचित् स्मित करून विनोदबुद्धीनें ह्मणाली. " माझी आठवण होऊन कधींच दुःख झालं नाहीं ना ?"

" असें दुःख झालें, ह्मणून तें तूं का दिलें आहेस ?"

" मीं नाहीं तर कुणीं ? मी जर नसतें, तर दुःख झालं असतं का ?"

" रागिणी, असा शब्दच्छल करण्यांत अर्थ नाहीं. मीं जाणूनउमजून तुझा त्याग केला, व तुला दुःख दिलें, तसें का तूं कांहीं केलें आहेस ?" असें म्हणून भय्यासाहेबांनीं एक दीर्घ सुस्कारा टाकला, व नंतर ते थोडा वेळ कांहींच बोलले नाहींत.

" झाली गोष्ट ती झाली. त्याचा किती वेळ विचार करीत बसायचं ?" कांहीं वेळानें रागिणी ह्मणाली.

" रागिणी, जसजसा मी झाल्या गोष्टीचा विचार करतों, तसतसें मला माझें पाप अधिक स्पष्टपणें दिसून येत आहे. मीं फारच कठोर व क्रूर कर्म

केलें. त्यांतल्यात्यांत समाधान एवढेंच, कीं, मीं ही गोष्ट रागानें किंवा वाईट बुद्धीनें कांहीं केली नाहीं. मीं तुला सोडून दिलें, तें रागानें नव्हे."

"तर प्रेमानें होय ?" रागिणी विनोदस्फूर्तीनें मध्येंच सहज ह्मणून गेली.

परंतु तिचा हा विनोद अस्थानीं होता. भय्यासाहेबांचें मन या अहेतुक वाक्प्रहारानें अधिक उद्विग्न झालें, व ते पुनः उदास मौन धारण करून चालूं लागले. परंतु रागिणीनें त्यांचें मन आपल्या मधुर भाषणानें पुनः जरासें आनंदित केलें, व तीं दोघेजणें पुनः इकडच्यातिकडच्या गप्पागोष्टी सुखानें सांगूं लागलीं.

बोलतांबोलतां भय्यासाहेबांनीं मुख्य प्रश्न सहजगत्या पुनः काढला. ते म्हणाले " रागिणी, तुला सोडून जाण्याच्या आधीं कांहीं दिवस मीं तुला 'विलासप्रिय' 'विलासिनी' अशीं शेलकीं विशेषणें दिलीं, व आपलें चारित्र्य संभाळण्याचा उपदेश केला, याचें मला आतां फार वाईट वाटतें. तुला हीं विशेषणें फार झोंबलीं असतील, नाहीं ?"

" मला पहिल्यानं फार वाईट वाटलं, पण निघून जायचं झाल्यानंतर मीं आपल्या मनाशीं विचार केला, कीं, माझं मन सुधारावं व मनांत पापविचार येऊं नयेत, या हेतूनंच मला ही आधीं इशारत देऊन ठेविली असावी. हा विचार आल्यावर मला मोठं समाधान वाटलं, आणि मग मीं हे शब्द अगदीं प्रेमानं उराशीं बाळगून ठेविले. वाईट विचारांना मनांत थाराच द्यायचा नाहीं, असा मीं निश्चय केला, आणि त्याच्यांत मला बरंच यशहि आलं. त्या कठोर शब्दांनींच माझं कल्याण केलं आहे."

रागिणी हें बोलत असतां भय्यासाहेबांची दृष्टि रागिणीच्या निर्व्याज मधुर मुखाकडे लागून राहिली होती व त्यांची ती राजसप्रेमपूर्ण दृष्टि रागिणीच्या दृष्टीला पडल्याबरोबर तिलाहि साहजिक लज्जा प्राप्त होऊन तिनें आपलें तोंड मधुर विनयानें दुसरीकडेच केलें.

चालतांचालतां तीं दोघेंजणें पर्वताच्या एका तुटलेल्या कड्याजवळ-एका भयंकर दरीजवळ-गेलीं. भय्यासाहेब अगदीं कडेला जाऊन खालील अत्यंत खोल व अद्भुतरम्य भयानक दरींत डोकावून पाहूं लागले. परंतु रागिणी जरा मागेंच एका अशोकाच्या झाडाजवळ उभी राहून तेथून दिसेल तेवढा दरीचा भाग व समोरच्या पर्वतपृष्ठावरची आणि शिखरांवरची शोभा पहात होती. त्या

वेळीं सूर्य त्यांच्या समोरच्या पर्वतशिखरांपलीकडे जात असून संध्यादेवीचीं पुनः गांठ पडल्यामुळेंच कीं काय, तो आतां आरक्त झाला होता. खिडींत अगदीं खालीं पाहिलें, तर तेथील केवळ गाढ अंधकार दाखविण्याइतकाच तेथें उजेड होता. त्याच्या वरील दोन्ही बाजूंच्या पृष्ठांवर काळी–हिरवी दाट झाडी दिसत होती. पश्चिमेकडील पृष्ठावरील झाडी याहून काळी होती, पण ती· मधून दोनतीन मोठे शुभ्र झरे–उंचावरून खालीं पडणारे मोठे ओहोळच– वहात असल्यामुळें त्या अर्धवट अंधकारावृत पृष्ठाची शोभा विशेष होती. त्याच्याहून जरा उंच असलेल्या भागाकडे पाहिलें, तर तेथील झाडी बहुतेक हिरवीगार होती. तींतील भिन्न वर्णांच्या पानांचा व फुलांचा भिन्न रंग जरी थोडासा दृग्गोचर होत होता, तरी पानांचा आकार स्पष्टपणें दिसत नसल्यामुळें तेथील झाडें नेमकीं ओळखणें शक्य नव्हतें. या भागांतूनहि अनेक लहानमोठे झरे वहात होते, व एका कोंपऱ्यांतून निनाद करीतकरीत पतन पावणारा तुषारयुक्त लहानसा धबधबा तर फारच प्रेक्षणीय होता.

पर्वतशिखराजवळच्या झाडीची शोभा याहून अधिक स्पष्ट व आल्हाददायक होती. ती 'भव्य' ह्मणण्यापेक्षां ' विचित्ररमणीय ' होती, असें म्हणणें अधिक शोभेल. ती गूढार्थपरिपूर्ण आणि गंभीर नव्हती, तरी मनोहर व उत्साहजनक होती; तिच्यामध्यें उज्ज्वलता किंवा विभूतिमत्व यांपेक्षां उन्मादकत्व व हास्यरसोत्पादकत्व अधिक होतें. तेथील अंब्याचीं,सागवानाचीं, वडाचीं, चिंचेचीं, केळीचीं, चाफ्याचीं वगैरे झाडें बऱ्याच स्पष्टपणें ओळखतां येण्यासारखीं होतीं. उदाहरणार्थ, तेथील सागवानांच्या कृष्णपांडुर, शुष्क, भटजींच्या अंग पुसण्याच्या पंच्यासारखीं भोकें असलेल्या, अशा पानांतून जीं सूर्यकिरणें पडलीं होतीं, त्यामुळें त्या शुष्क पानांनांहि एक प्रकारचें सौंदर्य व तेज आलें होतें. सावरीच्या उंच व पर्णहीन झाडांवरील ज्या लाल फुलांवर अस्तंगामी सूर्याचीं तिरपीं किरणें पडलीं होतीं, तीं साहेबांच्या मुलांच्या गालांप्रमाणें लाल दिसत होतीं, व बाकीचीं शोकाकुल मधुर युवतीच्या कपोलांप्रमाणें काळसरलाल दिसत होतीं. तेथील कांहीं चंपकवृक्षांवरील पांढरीं फुलें झाडावर सुरपारंब्या खेळण्याकरितां बसलेल्या मुलांप्रमाणें आनंदानें डुलत व हंसत होतीं. तेथील आम्रवृक्ष कांहीं पिंवळसर पांढऱ्या व कांहीं तांबडसर मोहरानें फुललेले होते, व ते आपला सुवास सर्व दिशांनीं पसरवीत होते. करवंदीच्या हिरव्याकाळ्या जाळीं-

वर चांदण्यासारखीं अनेक लहानलहान फुलें दिसत होतीं, व हीं फुलेंहि आपला अल्पसा सुवास जगाच्या आनंदाकरितां वायूबरोबर पाठवून देत होतीं. तेथील कांहीं झाडें व कांहीं. वेली, हीं फारच रम्य होतीं; पण त्यांचीं नांवें वनस्पतिशास्त्रज्ञालाच माहीत! एका प्रचंड वृक्षावरून लोंबत असलेली एक वेल वायुलहरीनें त्या वेळीं हेलकावे खात होती, व तीवर असलेलीं आरक्त पुष्पें एकाद्या मोठ्या माणसाच्या भोंवतीं संध्याप्रकाशांत बागडणाऱ्या लहान बालकांप्रमाणें इकडूनतिकडे नाचत होतीं. 'लहान बालकांप्रमाणें' ह्मणण्यापेक्षां तेथीलच शेजारच्या एका उंच व विशाल वृक्षावरील फांदीच्या टोंकांवर लोंबकळणाऱ्या 'वानरांप्रमाणें' ह्मटलें तरीसुद्धां चालेल! दुसरेहि तेथें लहानमोठे अनेक वृक्ष, अनेकरंगी असंख्य वेली व सुवासिक अनंत फुलें होतीं, त्यांचीं नांवें किंवा त्या झाडांवरून इकडूनतिकडे उडणाऱ्या विलक्षण पांखरांचीं नांवें रागिणीला किंवा भय्यासाहेबांनां ठाऊक नव्हतीं, व ही गोष्ट सांगणारालाहि तीं माहीत नाहींत. परंतु नांवें ठाऊक नसलीं, ह्मणून त्या फुलांचें व पांखरांचें मनोहरत्व कमी होईल काय? किंवा त्या फुलांचा सुवास कमी आनंद देईल काय?

भय्यासाहेब कांठाशीं उभे राहून मधुनमधून दरींत पहात, व नंतर शिखराजवळील देखाव्याकडे दृष्टि फेंकीत आणि कधींकधीं वर आकाशाकडे पहात बराच वेळ तटस्थपणें उभे राहिले. तो देखावा पाहून त्यांच्या मनांत काय विचार आले कोणाला ठाऊक! पण ते गंभीर किंबहुना उदास होऊन विचारांत अगदीं मग्न होऊन गेले होते. रागिणीला त्यांची ही वृत्ति पूर्वीपासूनच ठाऊक असल्यामुळें "चालले असतील कांहीं तरी तात्त्विक विचार!" असें मनांत ह्मणून तीहि समोरच्या रम्य देखाव्याकडे पहात अशोकवृक्षाखालच्या एका शिलेवर बसली.

कांहीं वेळानें तिची दृष्टि उजव्या बाजूच्या दोन लहान पर्वतशृंगांकडे गेली. हीं त्या मुख्य पर्वताच्या साधारण मध्यभागीं असून वाटोळीं होतीं, आणि त्यांवरून दोन झरे वहात होते. त्या झऱ्यांचें दुधासारखें शुभ्र पाणी खालीं ओघळतओघळत अखेर एका स्वच्छ कुंडांतून जात होतें. त्या कुंडावर गुरेंढोरें, हरिणबालकें, शुकसारिका वगैरे पशुपक्षी पाणी पीत होते, किंवा पाणी पिऊन हरिततृणावर किंवा हरिततरूवर स्वस्थ बसले होते.

# रागिणी.

रागिणी या देखाव्याकडे कौतुकानें पहात असतां भय्यासाहेब आपल्याच विचारांत गर्क होऊन कोणतासा संस्कृत श्लोक पुटपुटत होते. पुटपुटतांपुटपुटतां ते एकदोन मिनिटांनीं एकदम रागिणीकडे वळले, व गांभीर्यानें ह्मणाले "रागिणी, हें जग या पर्वताच्या देखाव्यासारखेंच नाहीं का ? ही खालची अंधकारमय घोर दरी, हा मधला विचित्र रम्य पर्वत, व हें वरचें अनंतगूढ उदास आकाश यांकडे पाहून मला भगवद्गीतेंतील '**अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत । अव्यक्तनिधनान्येव**—' या श्लोकाची आठवण झाली. या जगाचें मूळ या दरीसारखें गूढ व ह्मणूनच भयंकर आणि भ्रान्तिकारक आहे; आपला संसार हा या मधल्या पर्वतासारखा सुव्यक्त व रमणीय आहे; आणि या संसाराचा व जगताचा अंत कसा होणार, आपण कोठें जाणार, व आपल्या प्रेमाचें, वीर्याचें व उच्च आकांक्षेचें काय होणार, हें सर्व या अनंत –विशाल व अनंतोच्च आकाशाप्रमाणेंच अतर्क्य, अज्ञेय व औदासीन्यजनक आहे."

भय्यासाहेबांचें हें तात्त्विक विवेचन रागिणीनें संथपणें ऐकून घेतलें, व नंतर स्मितपूर्वक ह्मटलें "मी कांहीं कवि नाहीं, किंवा तत्त्वज्ञानीहि नाहीं. मला कांहीं समजत नाहीं !"

रागिणीचें हें उत्तर तात्त्विक किंवा काल्पनिक विवेचनाला विशेष उत्तेजनपर असें नव्हतें; पण भय्यासाहेबांनां त्या वेळीं तात्त्विक स्फूर्ति झालेली ! त्यांनां तिचें उत्तर उत्तेजनात्मकच वाटलें, व ते तिला पुनः ह्मणाले "ही दारुण व घोर दरी पाहून माझें मन तर भांबावून व घाबरून जातें. परंतु या पर्वतावरील प्रचण्ड वृक्ष, त्यांच्यावरील अनेकरंगी पानें, लहानमोठीं सुवासिक फुलें, या झाडांवर इकडूनतिकडे उड्या मारणारीं माकडें किंवा त्या वृक्षांवरच बसून मधुर कूजन करणारे अथवा कर्कश किंकाळी फोडणारे पक्षी, या डोंगराच्या कड्यांवरून निर्धास्तपणें चरत असलेलीं हरिणें किंवा खालीं गवतावर बसून आत्मतुष्टिपूर्वक रवंथ करणारीं गुरें, हीं पाहून माझ्या मनांतील भीति जाते,-व या वृक्षांप्रमाणेंच माझेंहि मन हर्षोत्फुल्ल होऊन जातें. या मधल्या मनोहर देखाव्याकडे पाहिलें, ह्मणजे मला येथील निर्भय निष्कपट मृगांप्रमाणें किंवा पांखरांप्रमाणें आनंदानें येथेंच विहार करीत रहावें, असें वाटतें. पण

इतक्यांत माझें लक्ष्य आकस्मिकरीत्या विशाल, दारुण व घोरोत्तुंग आकाशाकडे जातें, व मी पुनः उद्विग्न होतों!"

"हा सर्व आपल्या मनाचा खेळ आहे!" रागिणी ह्मणाली.

"कांहींहि ह्मण; पण ही खालची दरी, हा मधला पुष्पमय रमणीय प्रदेश, व हें अनंतगूढ आकाश, यांमध्यें जगाचा मला आदर्श दिसतो."

"मला वाटतं, कीं, हें जग या पर्वताप्रमाणं स्थिर नाहीं, किंवा दरीप्रमाणं भयंकरहि नाहीं." रागिणी ह्मणाली. "जग या अशोकवृक्षाप्रमाणं आहे, असं मला वाटतं. याचीं मुळं जरी गूढ आहेत, तरी हा वृक्ष दिवसंदिवस वाढत आहे, व फलपुष्पमय होत आहे. तसंच जगहि स्थिर किंवा जड नसून तें या जीवंत वृक्षाप्रमाणं दिवसंदिवस विकास पावत व फलपुष्पमय होत आहे."

"तुझ्यासारख्या सुंदरी ह्मणजेच या जगाचीं सुवासिक नाजुक पुष्पें आहेत, असें मला वाटतें!" भय्यासाहेब स्मित करून विनोदानें ह्मणाले.

रागिणी या अकल्पित विनोदामुळें बरीच लज्जान्वित झाली—इतकी, कीं, यावर त्या वेळीं तिला जें एक उत्तर सुचलें होतें, तेंहि ती लगेच लज्जाजनित भ्रमामुळें विसरून गेली!

इतक्यांत भय्यासाहेब ह्मणाले "रागिणी, त्या दोन वाटोळ्या टेंकड्यांकडे पहा. त्यांवरून वहाणारे ते दोन झरे किती मजेदार दिसत आहेत! या झऱ्यांकडे पाहून मला अशी कल्पना सुचते, कीं, सृष्टिदेवता जरी पाषाणहृदया भासली, तरी तिचें हृदय खरोखर प्रेमजलार्द्र आहे!"

"मला वाटतं," रागिणी म्हणाली "कीं, हीं दोन लहान शिखरं म्हणजे इथल्या निसर्गदेवतेचा उरःप्रदेश आहे, व हे निर्झर म्हणजे त्या स्नेहार्द्र मातेच्या उरःप्रदेशांतून निघणारा दुग्धस्रावच होय! तिच्या तरुबालकांनां व हरिणशिशूंनां दूध मिळावें, ह्मणून त्या प्रेमळ मातेच्या हृदयांतून दुधाचा कसा पाझर फुटत आहे, तो पहावा एकदां!"

"आपल्या स्वभावावरून व अनुभवावरून मनुष्य दुसऱ्यांची परीक्षा करतो, असें ह्मणतात, तें कांहीं खोटें नाहीं." भय्यासाहेब रागिणीचा उपहास करण्याच्या उद्देशानें ह्मणाले. "बायकांच्या तोंडून अशीच उपमा निघायची!"

"आणि पुरुष पाषाणहृदय असतो, ह्मणूनच मला वाटतं, त्याला सृष्टि पाषाणहृदया वाटते!" रागिणी साभिप्राय विदग्ध स्मित करून ह्मणाली.

# रागिणी.

" ह्मणजे मी पाषाणहृदय आहें ह्मणायचा ? " भय्यासाहेबांनीं अरसिकतेनें प्रश्न केला.

" मला काय ठाऊक ? " रागिणी ह्मणाली. " मला जर सुवासिक नाजूक फूल ह्मणायचं, तर मग मला सोडून जाणाराचं हृदय पाषाणासारखंच नाहीं तर काय ?"

रागिणी हे शब्द विनोदबुद्धीनेंच ह्मणाली, व भय्यासाहेबांनांहि तिचा विनोदी टोमणा आवडला; परंतु या टोमण्यानें त्यांनां आपल्या अपराधाची पुनः आठवण झाली, व त्यांचें मन उदास होऊं लागलें. बाहेरून ते रागिणीशीं आनंदानें बोलत होते, व थट्टामस्करीहि करीत होते. परंतु सृष्टिसौंदर्य पाहून आलेल्या स्फूर्तीमुळें त्यांचें जें गतचरित्रभान पूर्वी अजीबात नष्ट झालें होतें, तें आतां पुनः जागृत होऊन क्षणापूर्वीची दिव्यानंदाची अवस्था आतां नष्ट झाली. त्यांच्या पश्चात्तापदग्ध कोमल मनाच्या क्षतावर रागिणीच्या उत्तराचें क्षार पडलें, व त्यांचें मन विव्हल होऊं लागलें. त्यांनीं ही गोष्ट लपवून ठेवण्याचा प्रयत्न केलाच; परंतु ती फार वेळ लपणें शक्य नव्हतें. रागिणीला भय्यासाहेबांच्या अंतःकरणांत काय चाललें होतें, हें एकदम कळलें नाहीं. ती आपली लग्नापूर्वीच्या अगदीं लहानपणच्या गोष्टींची आठवण करून भय्यासाहेबांशीं प्रेमानें बोलत होती, व भय्यासाहेबहि बाह्यात्कारीं कांहीं तरी बोलून आपलें लक्ष्य तिच्याकडे आहे, असें तिला दाखवीत होते.

बोलतांबोलतां त्या अशोकवृक्षावरील दोनतीन माकडें त्यांच्याकडे पाहून दंत चीची करून आपलें नाक खाजवूं लागलीं. या खरोखरीच्याच माकडचेष्टेनें त्या दोघांनां हंसूं आलें; परंतु भय्यासाहेबांचें हास्य क्षणिकच होतें. रागिणीला मात्र माकडांच्या बालिशतेमुळें ह्मणा, किंवा शुद्ध अंतःकरणामुळें ह्मणा, या माकडचेष्टेचें अनावर हंसूं आलें.

रागिणी वर माकडांकडे पहातपहात हंसत आहे, तोंच भय्यासाहेबांचा हृदय-क्षोभ अनावर झाला, आणि त्यांनीं अकल्पित रीतीनें रागिणीचे पाय घट्ट धरले, व "रागिणी, तुला मीं फारच छळलें, मला क्षमा कर," असें ह्मटलें. त्यांच्या उष्ण अश्रुबिंदुप्रवाहानें तिचे पाय भिजले.

या अकल्पित व नाटकी प्रकाराचा क्षणभर रागिणीला अर्थच कळला नाहीं, व हा मस्करीचा एकादा प्रकार असेल, असें तिला वाटलें.

पण मस्करी कोणती आणि कोणती नाहीं, हें समजण्याला फार उशीर का लागतो? रागिणी लगेच भय्यासाहेबांनां प्रेमानें ह्मणाली "हें काय हें? मीं पाय धरायचे, का माझे पाय धरायचे? मला नाहीं असलं आवडत!"

असें ह्मणून रागिणी आपले पाय सोडवून घेऊं लागली. पण भय्यासाहेब पाय सोडीनात. पायांवर पडणाऱ्या उष्ण अश्रुधारांनीं व अंतःकरणापासून आलेल्या अनावर हुंदक्यांनींच रागिणीच्या प्रश्नाला त्यांनीं उत्तर दिलें.

पतीनें पाय धरलेले पाहून त्या सुशील, कुलीन हिंदु पतिव्रतेला कसें बरें वाटेल? ती लगेच शिलेवरून उठून ओणवी उभी राहिली, व "असं नये करूं गडे!" असें ह्मणून प्रेमपूर्वक त्यांचे हात आपल्या पायांवरून काढूं लागली.

परंतु भय्यासाहेबांनीं "मला क्षमा केल्याशिवाय मी उठायचा नाहीं!" असें ह्मणून तिचे पाय अधिकच घट्ट धरले, व तिचे हात तिच्या पायांवर व आपल्या डोक्याखालीं दाबून ठेवले.

"हें काय हें? मी कसली क्षमा करणार?" इत्यादि गोष्टी बोलून रागिणी आपल्या पतीचें सांत्वन करूं लागली, व हात सोडवून घेऊं लागली. हात निघत नाहींत, असें पाहून ती प्रेमळ स्त्री तेथें हिरव्या गवतावरच खालीं बसली, व चातुर्यानें भय्यासाहेबांचें डोकें तिनें आपल्या मांडीवर घेतलें. हरतऱ्हेनें ती त्यांचें सांत्वन करूं लागली, व माता जशी आपल्या बालकाच्या तोंडावरून व पाठीवरून हात फिरवते, तशी ती त्यांनां गोंजारूं लागली. पतिपत्नीप्रेमाला मातृप्रेमाची उपमा दिली हें अलंकारशास्त्रदृष्टया रसहानिकारक असेल; पण रागिणीचें त्या वेळचें शुद्ध, सात्त्विक, कोमल प्रेम दुसऱ्या कोणत्याहि एका शब्दानें व्यक्त करणें शक्य नाहीं. हें प्रेम फार वेळ असेंच शुद्ध व सात्त्विक राहिलें नाहीं, पुढें लवकरच तें किंचित् विकृत झालें, ही गोष्ट अर्थात् वेगळी आहे. असो.

रागिणीच्या त्या शुद्ध सांत्वनात्मक प्रेमळ गोंजारण्यानें भय्यासाहेबांचें सांत्वन न होतां त्यांनां अधिकच रडूं येऊं लागलें. रागिणीला आतां त्यांचें सांत्वन कसें करावें, हें सुचेना. परंतु धीर न सोडतां ती "नशिबीं असतं तें भोगावं लागतं; ईश्वरेच्छेपुढं कुणाचं कांहीं चालत नाहीं," असें कधीं ह्मणून तर कधीं "झालं तें झालं, शेवट तर गोड झाला ना?" अशा अर्थाचीं मधुर वाक्यें

बोलून त्यांचें सांत्वन करण्याचा प्रयत्न करीत त्यांच्या मस्तकावर अश्रुसेचन करीत होती.

भय्यासाहेबांचें तप्त व क्षुब्ध झालेलें मस्तक तिच्या अश्रूंनीं अखेर जरा शांत झालें, व त्यांनां आपला दुःखावेग आवरतां आला. त्यांनीं आपले अश्रु पुसून तिच्या मांडीवरील आपलें अधोदृष्टि असलेलें वदन वळविलें, व ते वरच्या विशाल व सपुष्प अशोक शाखांकडे पाहूं लागले. कांहीं वेळानें तीं दोघेंजणें पुनः प्रेमाच्या गोष्टी शांत आनंदानें बोलूं लागलीं.

तीं दोघेजणें गोष्टी बोलत असतां तेथें एक आंखुडशिंगी, पुष्ट, पांढरी गाय आली. त्या गाईला पाहिल्याबरोबर भय्यासाहेबांनां व रागिणीलाहि आपल्या घरांतील 'पांढरी'ची आठवण झाली. या गाईच्या गोष्टीवरून भय्यासाहेबांनीं घरच्या सर्व गुरांची रागिणीजवळ चौकशी केली, व रागिणीनेंहि ती सर्व हकीकत सांगितली. घरांतील गुरांच्या गोष्टी संपल्यावर गांवांतील शेजाऱ्या-पाजाऱ्यांची तेथें हजेरी झाली.

अशा रीतीनें शिळोप्याच्या गोष्टी बोलत असतां रागिणीचें लक्ष्य समोरच्या झाडींतल्या एका झाडाकडे गेलें. हें झाड उंच असून त्याच्या टोंकालाच फांद्या होत्या, व या फांद्या फुलांनीं—का कशानें—इतक्या पांढऱ्या झाल्या होत्या, कीं, तें झाड ह्मणजे एक प्रचण्ड व उंच पांढरी छत्रीच होय, असें दिसत होतें.

"तें झाड कसलं बरं असावं?" रागिणीनें झाडाकडे बोट दाखवून विचारलें.

"चाफ्याचें असावें." भय्यासाहेब ह्मणाले. "खूपच फुलें आहेत त्याला!"

"चाफ्याचं झाड इतकं उंच नसतं, व त्याच्या फांद्या अशा छत्रीसारख्या वाटोळ्या नसतात." रागिणी ह्मणाली.

"चाफ्याचीं कांहीं झाडें इतकीं उंच असतात." भय्यासाहेब ह्मणाले. "निदान मीं तरी या प्रान्तांत अशीं झाडें पुष्कळ पाहिलीं आहेत."

"मला वाटतं, तें झाड प्राजक्तीचं असावं." रागिणी म्हणाली. "प्राजक्तीला भर आला, ह्मणजे तें असंच पांढऱ्या फुलांनीं फुलून जातं."

"कशाचें का असेना? येथून पहाण्यासारखें आहे, एवढी गोष्ट खरी!" भय्यासाहेब ह्मणाले.

त्यांनीं वाक्य पुरें केलें असेलनसेल, तोंच पर्वतावरील एक धोंडा कशानेंसा खालीं पडला, व मोठा आवाज होऊन संभाषणविषयीभूत वृक्षावरून एकदम बगळ्यांची एक प्रचंड सेनाच वर उडाली, आणि त्यांनीं अर्धवट सर्व दरीच व्यापली !

'बगळयांनां आपण फुलें समजलों,' असें पाहून तीं दोघेजणें एकमेकांच्या तोंडाकडे पाहून क्षणभर हंसलीं, व नंतर भय्यासाहेब पुनः किंचित् गांभिर्यानें व किंचित् स्मितपूर्वक ह्मणाले "जग हें असें आहे! तें वास्तविक असतें एक प्रकारचें, आणि आपण मायेनें समजतों कांहीं तरी निराळेंच ! आणि चमत्कार हा, कीं, आपण या आपल्या भ्रामक कल्पनांच्या प्रेमानें वाद करतों, व भांडतोंहि !"

सृष्टीच्या लहानमोठ्या देखाव्यांवरून नीतीचे नियम किंवा तात्त्विक बोध काढण्याची भय्यासाहेबांनां फाजील खोड होती, हें रागिणीला अनेक वर्षांच्या अनुभवामुळें ठाऊक असल्यामुळें भय्यासाहेबांच्या या तात्त्विक कल्पनेचें रागिणीला आश्चर्य वाटलें नाहीं. उलट त्यांच्या प्रवृत्तीचा उपहास करण्याच्या उद्देशानें ती त्यांनां उपरोधिक अर्थानें हंसतहंसत म्हणाली "मला वाटतं, जगांतील प्रत्येक वस्तूमध्यें जगाचा आदर्श आहे. त्यांत पहाणाऱ्या मनुष्यामध्यें जरा थोडी कल्पनाशक्ति व थोडंसं भाषाप्रभुत्व असलं, ह्मणजे पाहिजे त्या धोंड्यांत, कणांत किंवा शेणांतसुद्धां जगाचं प्रतिबिंब आहे, असं त्याला दाखवतां येईल !"

यावर भय्यासाहेबांनीं कांहीं वेळ कांहीं एक उत्तर दिलें नाहीं. आपली पत्नी ह्मणते त्याप्रमाणें सृष्टींतील देखाव्यांचा अर्थ कदाचित् कवींच्या पदरचा असेल काय, या गोष्टीचा ते तिच्या मुखाकडे सादर प्रेमदृष्टीनें पहात विचार करीत होते. कांहीं वेळानें तिचें तें चंद्रतुल्य धवल मुख, तिचे मोठे व पाणीदार डोळे, तिची प्रेमनिष्यन्दी विदग्धदृष्टि, यांकडे पाहून त्यांचे तात्त्विक विचार व त्यांचे हृदयक्षोभकारक पश्चात्ताप हे लयाला गेले, व तारुण्यांतील शरीरधर्मामुळें त्यांचें हृदय आतां एका कोमल मधुर भावानें आकुल झालें.

आपल्या पतीचें शोकाकुल व कृश-परंतु पावित्र्यतेज असलेलें प्रेमळ मनोहर मुख पाहून रागिणीच्या हृदयांतहि एक प्रकारचा युवतिजनसुलभ निराळाच भाव उत्पन्न झाला !

अशा रीतीनें प्रणयकोपांत, विश्रंभालापांत, विनोदकथांत वगैरे त्या जोडप्याचा तेथें बराच काळ गेला. बोलतांबोलतां सूर्यास्त झाला, ही गोष्ट त्यांच्या लवकर ध्यानांत आली नाहीं. कशी येणार ? प्रेमबद्ध युवयुवतींच्या विश्रंभसंभाषणांत अशा रीतीनें वेळ जाणें साहजिकच आहे. आनंदराव व उत्तरा यांची तेथीलच दुसऱ्या बाजूला तशीच नव्हती का अवस्था झाली ?

आश्रमाकडे परत येतांना भय्यासाहेबांनीं रागिणीचा हातांत हात धरला होता, व तीं दोघेंजणें गप्पागोष्टी बोलत चाललीं होतीं. चालतांचालतां भय्यासाहेब रागिणीला ह्मणाले "आपण एवढें दुःख सोसलें खरें, पण आपण आज पूर्वीचें सर्व दुःख विसरून जाऊन आनंदानें हातांत हात घालून फिरत आहों, यापेक्षां अधिक आनंदाची दुसरी गोष्ट असणें शक्य आहे काय ?"

भय्यासाहेब हा प्रश्न विचारीत असतां चोंचीनें आपल्या पिलाला वन्य फलांचा गीर भरवीत असलेल्या एका साळुंकीकडे रागिणीची दृष्टि लागली होती. त्या साळुंकीकडे व तिच्या पिलाकडे पहातपहातच रागिणी ह्मणाली "होय, अधिक आनंदाची एक गोष्ट आहे."

"कोणती ?" तिच्या पतीनें आश्चर्यपूर्वक उत्सुकतेनें विचारलें.

रागिणीनें भय्यासाहेबांकडे आपलें तोंड जरासें वळवलें, व स्मितपूर्वक म्हटलें "असं हातांत हात घालून चालण्यापेक्षां 'सारखा'च तोंडवळा असलेला चिमुकला मुलगा माझी करंगळी धरून चालतांना मी डोळ्यांनीं पाहीन, तेव्हां मला अधिक आनंद होईल!"

"बरें, याहून आनंदाची कोणती गोष्ट आहे ?" भय्यासाहेबांनीं संतुष्ट होऊन तिला पुनः विचारलें.

"याहून आनंदाची कोणतीच गोष्ट नसेल ! ब्रह्मानंद ह्मणजे काय आहे, हें मला ठाऊक नाहीं; पण मला तर पुत्रसुखापुढं ब्रह्मानंदाची विशेष मातब्बरी वाटणार नाहीं."

"पुत्रापेक्षां कन्येला हातांत घेऊन चालणें अधिक आनंददायक आहे." भय्यासाहेब उगाच आपले प्रेमविवादाकरितां ह्मणाले.

"नाहीं. पुत्रसुखाची सर कशालाच यायची नाहीं !"

"छे ! कन्येसारखी वस्तूच नाहीं !"

अशा तऱ्हेवर वाद करीत बराच वेळ चालल्यावर त्यांनीं उत्तरेचा व आनंदरावांचा आवाज ऐकला, व तीं दोघेजणें त्यांच्याजवळ लवकरच आलीं. आनंदराव व भय्यासाहेब यांनीं आपापल्या पत्नींचा हात सोडून दिला, व ते दोघे गप्पा मारीत पुढें चालूं लागले. उत्तरा व रागिणी त्यांच्या पाठोपाठ जरा सावकाश चालूं लागल्या.

" कसला वाद चालला होता, ताई ?" रागिणीनें उत्तरेला पहिलाच प्रश्न केला.

" कसला नाहीं. वाद करण्याशिवाय दुसरा उद्योगच नाहीं वाटतं ?"

" तुला आजकाल वादच नकोसा झालेला दिसतो आहे. पूर्वी तूं ह्मणजे वाद—"

" पूर्वीची गोष्ट निराळी आणि आतांची निराळी."

" निराळी आहे, हें दिसतंच आहे. पण खरंच ताई, कसला तुमचा वाद चालला होता ? पुरुषांचे व बायकांचे हक्क समसमान असावेत, का नसावेत, हा विषय तर नव्हता ना ? तुझा तो आवडता विषय आहे !"

" रागिणी, तुला खरं सांगूं का ? मला आतांशी असल्या प्रश्नांबद्दल वाद-विवाद करण्याचा अगदीं तिटकारा येऊं लागला आहे, आणि वाद केला म्हणून आपल्या माणसाशीं का कोणी वाद करतं, वेडे ?"

"मी वेडी तर ठरलेलीच आहें ह्मणा ! पण 'आपल्या माणसाशीं' वाद करायला तूं एवढी भितेस, तेव्हां—

उत्तरा मध्येंच म्हणाली " हा भिण्याचा प्रश्न नाहीं, रागिणी ! मला तशी इच्छाच होत नाहीं. वाद न करतां नम्रतेनं प्रश्न विचारावेत, सेवा करीत रहावं, असंच मला वाटतं. त्या तोंडांतून एकादं विधान ऐकलं म्हणजे तें मला खरं वाटतं, व तेंच विचाराचं व समंजसपणाचं भासतं. बोलणं काय, चालणं काय, सगळंच मला गोड वाटतं. मग वाद कशाबद्दल घालायचा ?"

"दादांनीं कांहीं जरी केलं, तरी तें तुला आतां गोड वाटेल, हें मी विसरलेंच. त्यांनीं—"

"रागिणी, तूं आतां लहान का आहेस असं चावटपणानं बोलायला ? मला नाहीं असली तुझी ही थट्टा आवडत !"

"माझी नाहीं आवडूं दे. ज्याची आवडायला पाहिजे, त्याची आवडूं दे ह्मणजे झालं. बरं, तें जाऊं द्या ह्मणा. या पुरुषांचा अधिकार किती नि बायकांचा अधिकार किती, याबद्दल तुझं आतां काय मत आहे?"

"आमच्या दोघांसंबंधानंच हा प्रश्न विचारला, तर हा प्रश्नच निरर्थक आहे, असं मी ह्मणेन. जिथं खरं प्रेम आहे, तिथं कमीअधिक अधिकाराचा प्रश्नच नाहींसा होतो. पतीचा मोठेपणा वाढावा, पतीची सत्कीर्ति वाढावी, त्याला सुख व्हावं, त्याच्या मनाला नेहमीं शान्ति मिळावी, हीच पत्नीची जिथं इच्छा आहे, व पत्नीला सुख व्हावं, तिला आई–बापांचं घर सुटण्याचं जाचक दुःख होऊं नये, तिला आपलं घर ह्मणजे स्वतःचं घर वाटावं, तिला सुशिक्षण मिळून तिची आत्मिक उन्नति व्हावी, दोघांच्या संसाराचा गाडा आनंदांत व सुखासमाधानांत चालावा, अशी जिथं पतीची इच्छा आहे, तिथं अधिकाराच्या प्रश्नाला अर्थ काय उरला? एकमेकांच्या सुखाकरितां व मोठेपणाकरितां स्वार्थत्याग अधिक कोण करतो, अशी पतिपत्नींमध्यें जिथं प्रेम–स्पर्धा आहे, तिथं तुझा प्रश्नच शिल्लक रहात नाहीं."

"हें सगळं खरं; पण जिथं इतकं उच्च प्रेम नसेल, तिथं कसं? तिथं नवऱ्याचाच अंमल बायकोवर नेहमीं चालावा काय?"

"हा प्रश्न वादविवादानं कसा सुटणार? याचं उत्तर एकमेकांच्या वर्तनावर व स्वभावावर अवलंबून आहे. स्त्रीपुरुषांच्या अधिकाराबद्दल तार्किक वृथा वाद करण्यांत कांहीं तरी हंशील आहे का? तूं हा प्रश्न विचारलास; पण तुझ्या स्वतःच्याबद्दल हा प्रश्न कधीं खरोखर उद्भवला आहे का?"

"आमच्यामध्यें हा प्रश्न आलाहि नाहीं, व यायचाहि नाहीं. पण आपल्यासारखी सगळ्यांची स्थिति आहे का ताई?"

"सगळ्यांची असो वा नसो. आपण आपल्या वर्तनानं हा प्रश्न किती अप्रयोजकपणाचा आहे, हें दाखवूं या, ह्मणजे आपलं काम संपलं. उगाच तात्त्विक वाद करून कांहीं तरी फायदा आहे का?"

"फायदा नसेल; पण जोंपर्यंत जग आहे तसंच राहील, तोंपर्यंत हा वाद चालायचाच. जोंपर्यंत उच्च सात्त्विक प्रेमाशिवाय झालेल्या लग्नांचीं मंगलाष्टकें ऐकूं येत आहेत, तोंपर्यंत या प्रश्नाचाहि अमंगल आवाज ऐकूं येत रहाणारच.

जोंपर्यंत तामसी पुरुष बायकांनां छळीत आहेत, तोंपर्यंत हा प्रश्न जगाला छळणारच ! जोंपर्यंत निर्दय नवरे आपल्या बायकोच्या हातून सेवेंत यत्किंचित् अंतर पडल्यास तिच्याकडे एवढाले डोळे करून रागानें पहात आहेत, तोंपर्यंत या प्रश्नाचें भूतहि आपल्याकडे डोळे टवकारून पहात राहीलच."

" ह्मणजे सगळा अपराध पुरुषांचाच आहे, असं ह्मणतेस तूं ?"

" तसं नाहीं. बायकांकडे पुरुषांएवढाच दोष आहे. ज्या बायका अज्ञानानं, कोत्या बुद्धीनं, किंवा तामसी स्वभावानं पुरुषांनां गृहसौख्य कसं तें लागूं देत नाहींत; ज्या बायका पतीच्या उच्च महत्त्वाकांक्षांच्या व त्यांच्या आत्मोन्नतीच्या आड येत आहेत; ज्या बायका पूर्वीच्या पौराणिक स्त्रियांप्रमाणें पतीला सात्त्विक वीर्यकर्म करूं देत नाहींत; त्या बायकांविषयीं त्यांच्या पतीच्या मनांत उच्चतम, सात्त्विक, निरभिमान प्रेम कधींहि असूं शकणार नाहीं, आणि अशी स्थिति जगांत जोंपर्यंत कायम आहे, तोंपर्यंत सुशिक्षित व विवादशील लोकांमध्यें स्त्रीपुरुषांच्या अधिकाराचा प्रश्न कायमच रहाणार !"

" लोकांमध्यें हा प्रश्न राहीना ! आपल्यामध्यें नको तो आतां !" असें म्हणून तो विषय अजिबात बदलण्याकरितां उत्तरा लगेच ह्मणाली "बरं, पण रागिणी, भय्यासाहेब तुला कायकाय ग सांगत होते ?"

" विशेष कांहीं नाहीं. पण एक गोष्ट मात्र तुला सांगण्यासारखी आहे !"

" कोणती ?"

" ह्मणायचं, कीं, 'त्राटिके'चा स्वभाव बदललेला दिसतो आहे." असें ह्मणून तिनें उत्तरेकडे पाहून सार्थ व चतुर हास्य केलें.

" ते नाहीं मला त्राटिका म्हणायला बसले ! तुझ्या मनचीच ही कोटि आहे."

" तुला खोटं वाटतं आहे; पण मजजवळ खरंच असं ह्मणायचं, कीं, 'आनंदरावांनीं त्राटिकेचं मनसुद्धां वश करण्याचा पराक्रम केला आहे, तेव्हां ते सुद्धां एक प्रकारचे सौम्य 'प्रतापराव'च आहेत. त्यांनां उद्यांपासून 'प्रतापराव' अशीच हांक मारली पाहिजे."

" सगळं तुझ्या मनचं आहे हें ! तुझी नि माझी आजची नाहीं ओळख कांहीं !"

" मनचं ह्मण पाहिजे तर; पण बोलणं खरं आहे ना ?"

" खरं आहे, असं कबूल करून मी स्वतःलाच 'त्राटिका' ह्मणवून घेऊं होय ?"

" तूं नाहीं ह्मटलंस, ह्मणून जग तुला 'त्राटिका'च ह्मणत राहील."

रागिणी हें थट्टेनेंच ह्मणाली; पण उत्तरेला हें जरासें लागलें, व ती जराशी ओशाळली. " पण तूं नाहीं ना ह्मणायचीस ?" उत्तरा उदास, प्रेमळ व किंचित् करुण स्वरानें ह्मणाली.

" माझं काय ? मीं तुला कधीं तरी तसं ह्मटलं आहे का ! तुझी आपली मी आतां मस्करी केली, एवढंच !"

" आणि तूंहि ह्मटलंस तरी माझी हरकत नाहीं!" उत्तरा आपल्या पूर्व-वयांतील जोरानें व आवेशानें ह्मणाली. " मला जगाची मुळींच पर्वा वाटत नाहीं! माझं मन शुद्ध असलं, ह्मणजे मला बस्स आहे. जगाला विचारतो कोण ? जगाशीं मला करायचं आहे काय ? जगानं मला कांहींहि ह्मटलं, तरी मला आतां वाईट वाटायचं नाहीं, आणि राग तर मुळींच कधीं यायचा नाहीं. माझं मन हल्लीं इतकं शांत नि सुप्रसन्न झालं आहे, कीं, मला जिकडेतिकडे प्रेम नि आनंद दिसत आहे. माझा द्वेष करणारा असा जगांत कोणी नाहीं. पण असला, तरीसुद्धां मी त्याचा द्वेष करणार नाहीं, इतकं माझं मन शांत नि सात्त्विक झालं आहे. मला जिकडेतिकडे प्रेम नि आनंद दिसत आहे. सर्वत्र आनंदीआनंद आहे !"

" सर्वत्र आनंदराव आहेत ! असा तुझ्या ह्मणण्याचा भावार्थ, खरा ना ?" रागिणी कांहीं तरी विनोद करून ह्मणाली.

याच्यावर उत्तरा कांहीं उत्तर देणार होती, इतक्यांत त्यांनां एका बाजूच्या रस्त्यानें कोणी दोन माणसें येत आहेत, असें दिसलें. दोघींचें हृदय लगेच धडपड करूं लागलें, व त्यांच्या अंगाला घाम सुटला, आणि त्या एकमेकांच्या अंगाला चिकटल्या. परंतु सुदैवानें भयाचें तेथें कांहींच कारण नव्हतें. तीं दोन माणसें ह्मणजे टिल्लू आणि किंनरी हीं होत. तीं दोघेंजणें पूजेला वगैरे फुलें आणि पत्रावळींनां पानें आणण्याच्या निमित्तानें त्या मठांतून या दोन युगलांच्या पाठोपाठच बाहेर पडलीं होतीं, व आतां टोपलीभर फुलें व भारा-भर पानें घेऊन परत येत होतीं. फुलांची टोपली व पानांचा भारा दोन्हीहि

टिल्लूनें पत्नीप्रेमानें बराच वेळ आपल्या डोक्यावरच घेतला होता. परंतु उत्तरेचा व रागिणीचा आवाज ऐकल्याबरोबर त्यानें जनलज्जेस्तव किंनरीच्या डोकीवर फुलांची टोपली दिली, व आपण पानांचा जड भारा घेऊन तो चालूं लागला.

त्या चौघांची गांठ पडून क्षणांतच उत्तरेच्या व रागिणीच्या भयाचें निरसन झाल्यावर "तुह्मी कुणीकडे रे इकडे ?" असें उत्तरेनें टिल्लूला विचारलें.

त्यानें आपल्या डोकीवरचा भारा हळूच खालीं ठेवला, व नंतर आपल्या बायकोच्या डोकीवरची त्यानें टोपली उतरली. लगेच किंनरीनें सहजस्फूर्तीनें रागिणीला व उत्तरेला आपल्या टोपलींतून दोन सुरेख व सुवासिक गजरे काढून दिले. त्या वेळेच्या सौम्य चंद्रप्रकाशांत ते गुच्छ किंचित् अस्पष्ट, पण त्यामुळेंच कीं काय, अतिशय सुंदर दिसत होते, व त्या वेळच्या सौम्य, शांत व सुखस्पर्श मंद वातामध्यें त्या गुच्छांचा व टोपलींतील फुलांचा वास फारच आल्हादकारक होता.

"हे तूं का केलेस?" रागिणीनें किंनरीला विचारलें.

पण मराठी भाषा बोलतां येत नव्हती ह्मणून ह्मणा, किंवा मधुर विनयामुळें ह्मणा, ती नुसती लाजली, व उत्तर न देतां स्वस्थ बसली.

## प्रकरण सव्विसावें.

## गुहेंत.

भय्यासाहेब व आनंदराव यांनां सपत्नीक सहल करावयाला धाडून प्रिय-ब्रह्मस्वामी मनन करावयाला व समाधि लावावयाला आपल्या गुहेंत गेले, असें मागें झटलें होतें, हें वाचकांनां आठवत असेल. स्वामींची गुहा त्या मठा-जवळच होती. ती एकीकडे विविक्त स्थलीं होती; पण तेथें अंधकार वगैरे भयंकर असें कांहीं नव्हतें. एका कोंपऱ्यांत एका लहानशा देवदारी कपाटांत कांहीं पोथ्या व कांहीं पुस्तकें होतीं. दुसऱ्या कोंपऱ्यांत निजण्याची वळकटी व कांहीं उबदार चांगल्या पांढऱ्या धाबळ्या होत्या. तिसऱ्या कोंपऱ्यांत कळशी व पाणी पिण्याचीं भांडीं होतीं. स्वामी चवथ्या कोंपऱ्यांत लांबरुंद व्याघ्रांबरावर आसन घालून ताठ बसले होते. त्यांच्या समोर जवळच एक दत्ताची, एक रामाची व एक त्यांच्या गुरूंची म्हणजे विवेकानंदांची तसबीर होती. कांहीं सुवासिक उदबत्त्या त्यांच्या डाव्या व उजव्या बाजूला जळत होत्या, व सज्जनां-प्रमाणें स्वतः दाह सोसून लोकांनां आनंदित करीत होत्या.

प्रियब्रह्मस्वामी आसन घालून बसल्यावर प्रसन्न चित्तानें मनांत झणाले "इतके दिवस योजलेलें कार्य पुरें झालें. आतां स्वस्थपणें समाधि लावायला आज कांहीं हरकत नाहीं. दुसरीं अशींच कामें आहेत; पण हें काम सर्वांगांनीं उत्तम पार पडलें, यांत शंका नाहीं."

मनांत असें झणून स्वामींनीं आनंदस्मित केलें खरें; पण लगेच त्यांची त्यांनांच एक प्रकारची शंका येऊन त्यांची समाधानवृत्ति किंचित् ढासळली.

" आनंदरावांनीं आपलें देशाभिमानाचें उच्च तत्त्व सोडलें, व आपल्या गळ्यांत विवाहपाश अडकवून घेतले, हें चांगलें झालें काय?" स्वामी स्वतःच्या मनालाच विचारूं लागले. " तसेंच, भय्यासाहेबांनीं श्रेष्ठ धर्मजिज्ञासा सोडून पुनः आपणांला प्रेमपाशांत अडकवून घेतलें, हें त्यांनीं चांगलें केलें काय ? आणि मी त्यांनां कर्मच्युत अथवा योगभ्रष्ट व्हायला अनुमतीच नव्हे, तर उत्तेजन देत आहें, ही गोष्ट तरी स्पृहणीय होत आहे काय ? या गोष्टी उच्चतम धर्माला अनुसरून झाल्या काय ? कोणाला ठाऊक ! ही गोष्ट एका ईश्वरालाच ठाऊक ! धर्माचें गूढ तत्त्व गुहेंत लपविलेलें आहे, तें कोणाला कळायचें

नाहीं, असें जें ह्मणतात, तें खोटें नाहीं. इतका योगाभ्यास करून अनेक सिद्धि मिळविलेल्या मला–प्रियव्रताला–जर धर्माचें तत्त्व कळलेलें नाहीं, तर मग इतरांनां तें कळलेलें असण्याचा कितीसा संभव आहे ? '**किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः**' अशी खरी वस्तुस्थिति आहे ! असो.

"अशी स्थिति असली, ह्मणून उदास होऊन स्वस्थ बसण्याचें कारण नाहीं. भय्यासाहेबानें व आनंदरावानें आपापलें श्रेष्ठ तत्त्व सोडून दिलें, याच एका दृष्टीनें पाहिलें, तर त्यांचें वर्तन दोषार्ह असेल; पण या गोष्टींचा एकाच दृष्टीनें विचार करणें योग्य नाहीं. भय्यासाहेबानें रागिणीशीं विवाह करून जी विशिष्ट जबाबदारी अंगीकारली होती, तिचा त्याग करणें हें धर्मदृष्ट्या योग्य नव्हतें, व जगाच्या कल्याणाच्या दृष्टीनेंहि हें अनिष्ट होतें. तसेंच, आनंदरावानें उत्तरेशीं विवाह केल्यानें त्याला देशहिताच्या कांहीं गोष्टी करतां यायच्या नाहींत, हें जरी खरें असलें, तरी या दोघांचें एकमेकांवर फार दिवसांपासून सात्त्विक प्रेम आहे, या प्रेमाचा उगम केवळ शारीरिक नसून याचा परिपोषहि परस्परांविषयीं असलेल्या आदरबुद्धीनेंच झालेला आहे, दोघेंजणें उन्मादक यौवनावस्थेंत आहेत, दोघांचा यापुढें नित्य सहवास होणार आहे, उत्तराहि देशहिताच्या कोणत्याहि सत्कार्याच्या आड येणारी नाहीं, तर उलट ती स्वतः समंजस व देशाभिमानी असून वीरपत्नी शोभण्यासारखी आहे, इत्यादि गोष्टी लक्ष्यांत घेतल्या, ह्मणजे या अनुरूप तरुण वधूवरांचा विवाह होऊं नये, असें मला तरी वाटत नाहीं. अंतर्दृष्टीनें भविष्यकालाकडे पहातां हा विवाह देशाच्या हिताला कारणीभूत होणार आहे, हें मला ठाऊक आहे, व ही खात्री असल्यामुळेंच मीं तो घडवून आणायला अप्रत्यक्ष रीतीनें साहाय्य केलें. पण मला भविष्यकाल जाणण्याची सिद्धि जरी नसती, तरी मी या अत्यन्त अनुरूप व स्पृहणीय विवाहाला अनुमतीच दिली असती,–निदान दोष तरी दिला नसता. आनंदराव उत्तरेच्या प्रेमाला व यौवनमोहाला बळी पडला, त्यानें श्रेष्ठ देशकार्य अंशतः तरी सोडलें, असा दोष माझ्याच्यानें तरी देववणार नाहीं. हा दोष कदाचित् खरा असेल, कदाचित् नसेल. पण खरा असला, तरी तो क्षम्य नाहीं असें कोण म्हणेल ? आनंदराव झाला ह्मणून तो देव नाहीं, किंवा वसिष्ठवाल्मीकीसारखा ऋषिहि नाहीं; स्खलनशील मनुष्यकोटींतलाच आहे. उत्तरेसारख्या स्त्रीशीं लग्न केल्यानें देशकार्याला अडथळा येणार नाहीं,

अशी त्याची आत्मवंचना झाली असल्यास त्याला मी तरी दोष देणार नाहीं. मीं स्वतः इतका योगाभ्यास केला आहे, इतकें इंद्रियदमन केलें आहे, धर्म-जिज्ञासेनें इतकीं वर्षें श्रवण, मनन व निदिध्यास केला आहे, इतका वृद्ध झालों आहें, तरी माझ्यावर अशा प्रकारचा प्रसंग आल्यास आनंदरावाप्रमाणें माझीहि आत्मवंचना होणार नाहीं, अशी माझी मला खात्री वाटत नाहीं. मग मीं लोकांनां कां दोष द्यावा ? टीका करणें किंवा दोष देणें सोपें आहे, व तें मानवमात्राला प्रिय आहे. परंतु समंजस मनुष्य या अनुदार प्रवृत्तीला आळा घालण्याचा प्रयत्न तरी करील,—पूर्णपणें आळा घालणें हें मानवजातीला बहुधा अशक्यच आहे. पण ही सुद्धां मानवजातीवर अनुदार टीकाच आहे. तेव्हां मनोनियमन करून मनन व आत्मचिंतन केलेलेंच बरें. अथवा, आपल्या विजयगांवकर पाहुण्यांनां या आश्रमांत रहाण्याची मौज दाखवून त्यांचें जीवित अधिक आनंदमय व प्रेममय करण्याच्या मार्गालाच लागावें हें आत्मचिंतनापेक्षांहि चांगलें. पूर्णज्ञानाचा आनंद नसला, म्हणून सात्त्विक कर्मांचा आनंद कां गमवावा ? ”